सचित्र

# भारतीय युद्ध.



यथा समुद्रो भगवानि यथा हि हिमवान् गिरिः ॥
ख्यातावुभौ रत्ननिधी तथा भारतमुच्यते ॥
सौति

हें पुस्तक

रा. रा. दत्तात्रय गोपाळ लिमये,

यांनीं लिहिलें; तें

पुणें येथें

रा. रा. शंकर नरहर जोशी यांनी

'चित्रशाळा' छापखान्यांत ( सदाशिव पेठ १०२६ ) छापून

प्रसिद्ध केलें.

आवृत्ति चवथी



सन १९२५

किंमत सवा रुपया.

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना.



आज सुमारें दोन अडीच हजार वर्षें हिंदुस्थानच्या सर्व प्रांतांतील कवि, पुराणिक, कीर्तनकार वगैरे ज्या ग्रंथावर आपली भिस्त ठेवून आपलीं काव्यें, पुराणें, किंवा कीर्तनें रसभरित करीत आले, तो ग्रंथ **महाभारत** होय. उत्तरेस हिमालय पर्वतापासून तों दक्षिणेस कन्याकुमारीपर्यंत आणि पश्चिमेस सिंधूनदापासून तों पूर्वेस ब्रह्मपुत्रा किंबहुना इरावती नदीपर्यंतहि भरतखंडांतील पूर्वीच्या छप्पन देशांत सर्वमान्य होऊन आबालवृद्धांस एकसारखाच सर्वत्र प्रिय झालेला असा हा ऐकच ग्रंथ आहे. रामायणांतील कथा भारतांतील कथेप्रमाणेंच हिंदुस्थानांत लोकप्रिय झालेली आहे; परंतु राष्ट्रीय दृष्ट्या रामायणापेक्षांहि महाभारताची योग्यता अधिक आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. राष्ट्रांतील लोकांच्या व्यवहारांत नित्यशः जे अनेक प्रसंग उद्भवतात. ज्या ज्या संकटांतून त्यास पार पडावें लागतें किंवा जीं जीं सुखदुःखें त्यांस अनुभवावी लागतात, त्या सर्वांचें यथार्थ वर्णन महाभारतांत आहे; इतकेंच नव्हें, तर अनेक अडचणीच्या प्रसंगी मनुष्यमात्रानें आपले वर्तन कोणत्या रीतीनें ठेवलें असतां इहलोकीं व परलोकीं त्याचें कल्याण होतें; अशा आणीबाणीच्या प्रसंगीं आपले पूर्वज आपलें वर्तन कोणत्या धोरणानें ठेवीत आले; आपला धर्म कोणता, नीति कोणती, आणि या दोहोंचा व्यवहारांत तारतम्यानें उपयोग कसा करावा; इहलोकीच्या वैभवाच्या साधनाहून पारलौकिक सुखाची साधनें केव्हां व कशी अधिक महत्त्वाची असतात, परस्परांचा संबंध काय आणि त्यामधील विरोध कसा टाळता येईल इत्यादि अनेक महत्त्वाचे प्रश्न सोप्या व सरळ भाषेंत, प्रासादिक वाणीनें आणि लहान मुलांस देखील समजेल अशा मनोरंजक उदाहरणांच्या रूपानें या ग्रंथांत वेदव्यासांनीं मार्मिक रीतीनें सोडविलेले आहेत. इतकें असूनहि हा ग्रंथ पंचतंत्राप्रमाणें काल्पनिक गोष्टींनीं भरलेला नाहीं, किंवा मनु अगर याज्ञवल्क्य याच्या स्मृतीप्रमाणें केवळ धर्मविषयक चर्चेचा अतएव एकप्रकारें आबालवृद्धांच्या सामान्य आटोक्याबाहेरचा झालेला नाहीं. महाभारत हा ग्रंथ इतिहासाचे पायावर रचलेला आहे; किंबहुना जुन्या संस्कृत वाङमयांत 'इतिहास' हेंच नांव त्यास दिलेलें आहे. भीष्म, युधिष्ठिर, भीम अर्जुन, श्रीकृष्ण दुर्योधन आदिकरून या आर्ष महाकाव्यांतील जे नायक, उपनायक किंवा प्रतिनायक आहेत, ते सर्व ऐतिहासिक पुरुष होते, अशी अर्वाचीन ऐतहासिक ग्रंथकारांचीहि आतां खात्री झालेली आहे, द्वापारयुग संपून कलीस प्रारंभ होण्याचे संधीस म्हणजे भारत-

वर्षाची अत्यंत वैभवकारक आणि उज्ज्वल स्थिति जाऊन त्याला उतरती कळा लागण्याचे वेळेस या महापुरुषांनीं आर्यावर्त देश पवित्र केला होता; व त्यांची चरित्रें इतकीं उदात्त बोधप्रद आणि मनोरंजक आहेत कीं, त्यांच्या पश्चात्त हिंदुस्थानास प्राप्त होणाऱ्या दैन्यावस्थेत भारतवर्षीय लोकांस सदैव धर्माचरणाकडे प्रवृत्त करण्याकरितां परमेश्वरानें या कलियुगाचे आरंभीं या महापुरुषास मुद्दाम निर्माण केलें होतें कीं काय असेंहि पुष्कळदा मनांत येतें. भगवान वेदव्यास यांची वाणी काव्यदृष्ट्या रसभरित तर खरीच; पण या वाणीच्या कोंदणांत जे हिरे बसविले, आहेत ते तेजानें कांहीं कमी आहेत असें नाहीं. महाभारत ग्रंथ आणि त्यांतील नायक, उपनायक वगैरे थोर पुरुष आर्यभूमींतील आबालवृद्ध स्त्रीपुरुषांस कित्येक शतकेंपर्यंत एकसारखे जे प्रिय होत आले आहेत त्यांतील बीज हेंच होय. थोडक्यांत सांगावयाचें असल्यास महाभारत हा एक अत्युत्तम राष्ट्रीय ग्रंथ आहे. तो आर्यभूमींतील अतिश्रेष्ठ महाकवीनें आपल्या प्रासादिक वाणीनें रचला असल्यामुळें व त्यांतील नायकहि आमच्या पूर्वजांपैकींच थोर पुरुष असल्यामुळें हा राष्ट्रीय ग्रंथ आम्हां हिंदुस्थानवासी लोकांस स्वभावतःच अत्यंत प्रिय होऊन शेंकडों वर्षे चतुर्विध पुरुषार्थ साधण्याचें कामीं अचुक मार्ग--दर्शक झाला आहे इतर राष्ट्रांत अशा प्रकारचे ग्रंथ पूर्वी निर्माण झालेले नाहींत असें नाहीं. पण आम्हां लोकांस महाभारताचे कथानकांत जो कांहीं आपलेपणा वाटतो तो या दुसऱ्या ग्रंथांतील कथानकासंबंधानें वाटणें अशक्य आहे. पृथ्वीमध्यें भागीरथी नदीपेक्षांहि कांहीं मोठ्या नद्या आहेत पण आर्यभूमींत जन्मास आलेल्या मनुष्यास गंगेइतकी इतर कोणतीहि नदी पवित्र वाटणें ज्याप्रमाणें शक्य नाहीं तद्वतच राष्ट्रीय ग्रंथासंबंधानें गोष्ट होय. आज मितीस हिंदुस्थान देशांत आर्यधर्माव्यतिरिक्त दुसरे अनेक धर्म आलेले आहेत, व त्यामुळें एकंदर देशांतील लोकांच्या धर्मसमजुतींत बराच भेद उत्पन्न झालेला आहे. तथापि हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांत हिंदुधर्मानुयायी समाज अद्याप ज्या धर्म-कल्पनांनी, नीतीनें, किंवा व्यवहारतत्त्वांनीं बद्ध झालेला आहे, तीं तत्त्वें, ती नीति, तो धर्म अथवा त्या सर्वांचें मूळ महाभारतांत ग्रंथित झालेलें आहे. हिंदुस्थानच्या दक्षिणेकडील प्रांतांतील द्राविडी भाषा सोडून दिल्या, तर इतर प्रांतांतील भाषाभेद हा प्रायः महाभारत ग्रंथाच्या काव्यानंतरच अधिक प्रचारांत आला असावा, असें, भाषाशास्त्रज्ञांचें सामान्य मत आहे. महाभारत हा ग्रंथ सर्व हिंदुस्थान देशभर, म्हणजे आसेतुहिमाचलापर्यंत सर्वांस सारखाच प्रमाणभूत कां. याचा उलगडा होण्यास हें एक कारण आहे. पांडवांचा काल म्हणजे भारत

भूमीच्या भाग्योत्कर्षाचा काल होय. भरतखंडाच्या बाहेरील पराक्रमी देशांतील लोकांशीं तेव्हां वैदिकधर्मी लोकांचा संबंध येत असे ; आणि तेव्हांच्या सर्व सुधारलेल्या राष्ट्रांत भारतवर्षास अग्रस्थान प्राप्त झालेलें होतें. अशा वेळची नीति, या वेळचा धर्म; या वेळचें व्यवहारशास्त्र आणि याच कालांतील अवतारी थोर-पुरुषांचीं चरित्रें पुढें सुरू झालेल्या उतरत्या काळांतील लोकांस सर्वमान्य होऊन शिरसावंद्य झाल्यास त्यांत नवल तें कोणतें ?

असो ; इतिहास, तत्त्वज्ञान, धर्म किंवा नीति अगर जुन्या शास्त्रीय परिभाषेंत सांगितल्याप्रमाणें धर्मार्थकाममोक्ष ह्या चतुर्विध पुरुषार्थांचें ज्ञान प्राप्त करून घेण्याचे कामीं या ग्रंथाची योग्यता वर्णावी तेवढी थोडीच या कामीं भरतभूमींत चोहोंकडे पसरलेल्या हिंदुसमाजाचा हा ग्रंथ म्हणजे एक जीवात्माच आहे म्हटलें तरी चालेल. याचें अध्ययन व अध्यापन अनेक कारणाकरितां, आमच्या मधील अनेक तऱ्हेचे लोक आतांपर्यंत करीत आलेले आहेत. कालिदासारख्या कवींनीं आपल्या अलौकिक कविताशक्तीस आधारभूत म्हणून जीं कथानकें घेतलीं त्यांतील कांहीं याच 'रत्ननिधी' तून घेतलेलीं आहेत; उत्तर हिंदुस्थानांतील भाटांनीं राज-पुतान्यांतील रजपूत वीरांच्या शौर्याचें उद्दीपन करण्याचे कामीं याच त्रैलोक्य चिंतामणीचा उपयोग केलेला आहे, आणि अर्वाचीन धर्मशास्त्रकारांनीं किंवा राजनीतिज्ञांनीं, धर्म, नीति व व्यवहार यांचे लोकोपयोगी समर्पक दाखले व वचनें याच सर्वोपजीवी आकारांतून उद्धृत केलीं आहेत. तत्त्वज्ञानाकडे पाहिलें तरी त्यास हाच न्याय लागू पडतो. सारांश, 'पांचवा वेद' यांत आहे तेंच सगळ्या संस्कृत वाङ्-मयांत आहे, यांत नाहीं तें सदर वाङ्मयांत कोठेंहि नाहीं* ' असें जें खुद्द व्यासांनींच या ग्रंथाचें वर्णन केलें आहे, तें कांहीं अतिशयोक्तीचें नाहीं. लहान मुलामुलींच्या कोंवळ्या अंतःकरणापासून तों अनुभवानें कठिण झालेल्या जरठांच्या अंतःकरणापर्यंत सर्वांवर ज्या ग्रंथानें हिंदुस्थानांत आजपर्यंत सारखीच छाप बस-विली आहे, त्याच्या कर्त्याचें बुद्धिवैभव, प्रतिमा अगर सामर्थ्य किती अलौकिक असलें पाहिजे हें निराळें सांगावयास नकोच. अगदीं अर्वाचीन काळीं, म्हणजे श्रीशिवाजी महाराजांच्या वेळीं देशोन्नति व धर्मोन्नति करण्यास हाच ग्रंथ कारण झाला; व पेशवाईंतहि धर्म, व्यवहार किंवा राजनीति शिकविण्याचे कामीं आमच्याकडे याच ग्रंथाचा उपयोग करीत असत. धर्माच्या बाबतींत सर्वमान्य झालेली

* यदिहास्ति तदन्यत्र यन्नेहास्ति न तत्क्वचित् ॥

श्रीमद्भगवद्गीता ही मूळची महाभारतांतलीच आहे; व बाराव्या शतकाचे सुमारास धर्मजागृति करण्याचे कामीं तिचेंच भाषांतर कारणीभूत झालेलें आहे. यावरून असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, भारतवर्षांत उन्नत पुरुषार्थांचीं बीजें सदैव कायम ठेवून प्रसंगानुसार सदर बीजांपासून योग्य अंकुर उत्पन्न करण्यास महाभारत हाच राष्ट्रीय ग्रंथ मूळ संस्कृत भाषेंत किंवा प्राकृत भाषांतरद्वारा कारण झालेला आहे. अव्वल इंग्रजींतहि, म्हणजे जोंपर्यंत पूर्वीची परंपरा थोडीबहुत कायम होती तोंपर्यंत, याच ग्रंथांतील कथानकें बखरींच्या रूपानें मुलांस शिकवीत असत. परंतु तो प्रघात हल्लीं मोडत चालला आहे. मोडी अक्षराकडे जर दुर्लक्ष, तर तें घटविण्याकरितां पांडवांची बखर तरी कोण लिहितो? याचा परिणाम असा होत चालला आहे कीं, ज्या सामान्य गोष्टी किंवा नीतीचीं अगर धर्माचीं तत्त्वें स्वराज्याचें वेळीं लहान मुलांस अनायासें अवगत होत असत, तीं तत्त्वें किंवा त्या गोष्टी विद्यार्थी आतां कालेजांत गेल्यावर तो शिकत असलेल्या संस्कृत पुस्तकांत सदर गोष्टींचा किंवा तत्त्वांचा उल्लेख आला म्हणजे तदनूषंगानें त्या मूळच्या कोठल्या हें गुरूपासून समजून घेऊन, किंवा स्वतः कोश धुंडाळून त्यास पाठ कराव्या लागतात! हिंदुस्थान देशास एकराष्ट्रीयत्व येण्यास शक्य तेवढीं साधनें हुडकून काढण्यास आम्हीं सध्यां लागलों असतां आज शेंकडों वर्षें हिंदुसमाज एकत्र बांधण्याचे कामीं ज्या राष्ट्रीय ग्रंथाचा अत्युत्तम उपयोग झाला, त्याची आमच्या नवीन पिढीकडून अशी अनास्था व्हावी, ही शोचनीय गोष्ट होय. ही स्थिति कांहीं अंशानें तरी दूर व्हावी आपल्या पूर्वजांचें वैभव, शौर्य, उदात्त विचार आणि मोठेपणा नवीन पिढीच्या मनांत योग्य काळीं भरून महाभारतासारख्या राष्ट्रीय ग्रंथाबद्दल त्यांचें मनांत आदर उत्पन्न व्हावा; आणि तद्द्वारा त्यांनीं आपल्या वर्तनांत सुधारणा करून देशहित साधण्यास दक्ष व्हावें, अशा हेतूनें अलीकडे या ग्रंथाचीं भाषांतरें किंवा संक्षेप गद्यपद्यरूपानें प्रसिद्ध होऊं लागलीं आहेत. श्रीक्षेत्र काशी येथें थिऑसफिस्टांनीं स्थापलेल्या सेंट्रल हिंदु कालेजांतील विद्यार्थ्यांकरितां विदुषी आनी बिझंटबाईनेंहि अशाच प्रकारचें एक पुस्तक इंग्रजींत तयार केलें आहे. तात्पर्य, स्वराज्याचें वेळीं लहान मुलांस ज्याप्रमाणें या ग्रंथाची ओळख मोडी अक्षर घटवितांना किंवा अन्य तऱ्हेनें म्हणजे कथा किंवा पुराणे यांच्या श्रवणानें—सहज करून दिली जात असे, तशी हल्लींच्या म्हणजे सार्वजनिक शिक्षणाकरितां शाळा स्थापन झालेल्या काळांतहि करून देतां यावी, इकडे बऱ्याच विद्वान व शोधक लोकांचें लक्ष लागलें आहे. अशा स्थितींत मराठी

शाळांतील विद्यार्थ्यांकरितांहि अशा प्रकारचा एकादा लहानसा ग्रंथ असावा, अशी त्यांच्या कांहीं मित्रांनीं सूचना केल्यावरून हें पुस्तक रा. रा. लिमये यांनीं तयार केलें आहे. महाभारतासारख्या विस्तीर्ण ग्रंथाचें एकाच लहानशा पुस्तकांत सर्व रहस्य आणणें अशक्य होय. त्यांतून शाळेंतील विद्यार्थ्यांच्या उपयोगाकरितां या बाबतींत जे ग्रंथ लिहावयाचे ते त्यांच्या ग्राहकशक्तीच्या मगदुराप्रमाणेंच असले पाहिजेत, हें उघड आहे. दहाबारा वर्षांच्या मुलांस गोष्टी जितक्या प्रिय वाटतात तितकीं सदर गोष्टींवरून निघणारीं किंवा त्यांत ग्रथित केलेलीं नीतितत्त्वें प्रिय होत नाहींत. ती समजण्यास व आवडण्यास तत्पूर्वी बुद्धीचा बराच विकास व्हावा लागतो. इसापनीतींतील गोष्ट वाचीत असतां शेवटचें ' तात्पर्य ' सोडून देणारीं पुष्कळ मुलें आहेत. हा मुलांचा स्वभाव लक्षांत आणून हल्लींच्या पुस्तकांत महाभारतांतील मूळ गोष्ट म्हणजे कौरवपांडवांची कथा तेवढीच सोप्या व मनोरंजक भाषेंत दिली आहे. आणि हें पुस्तक लोकांस कसें काय आवडतें तें पाहून दुसऱ्या भागांत महाभारतांतील नीतिविषयक किंवा धर्मसंबंधीं मूळ आख्यानांत किंवा उपाख्यानांत ठिकठिकाणीं गोंवलेल्या कथा अशाच रीतीनें ग्रथित करण्याचा हल्लींच्या पुस्तककर्त्याचा विचार आहे. हे दोनहि भाग मराठी शाळेंतील पांचव्या सहाव्या यत्तेच्या विद्यार्थ्यांस किंवा इंग्रजी शाळेंतल्या पांचव्या यत्तेच्या विद्यार्थ्यांस उपयोगी पडण्यासारखे आहेत. यानंतर, म्हणजे विद्यार्थ्यांची बुद्धि जरा अधिक परिपक्क झाल्यावर, त्यांच्याकरितां महाभारतांतील धर्म, नीति, तत्त्वज्ञान, राज्यव्यवहार वगैरेचीं तत्त्वें सोप्या भाषेनें व प्रसंगविशेषीं मूळ संस्कृत आधार देऊन तिसऱ्या भागांत ग्रथित करण्याचा रा. लिमये याचा हेतु आहे. अशा क्रमानें हे तीनहि ग्रंथ वाचले म्हणजे आमच्या राष्ट्रीय ग्रंथांची पूर्ण ओळख मराठी ६ व्या यत्तेची किंवा इंग्रजी मॅट्रिकची परीक्षा पास होण्यापूर्वी कोणाहि विद्यार्थ्यास स्वभाषेच्या द्वारें अनायासें होणार आहे. अशा रीतीनें स्वधर्माची व त्यांतील नीतितत्त्वांची आणि व्यावहारिक शास्त्राची आमच्या तरुण पिढीस ओळख करून देणें हें राष्ट्रीय शिक्षणाच्या प्रधान अंगांपैकीं एक अंग होय. शाळाखात्यानें हल्लीं देशभाषेंत जी क्रमिक पुस्तकें तयार केलीं आहेत, त्यांत या धोरणाकडे विशेष लक्ष पुरविलें आहे असे दिसत नाहीं. अर्वाचीन शास्त्रें किंवा शोध यांचें ज्ञान महत्त्वाचें नाहीं असें आमचें म्हणणें नाहीं. पण त्याकरतां जुन्या राष्ट्रीय ग्रंथांची अनास्था करणें योग्य नाहीं. हें लक्षांत घेतलें म्हणजे; या पुस्तकाचें महत्त्व व उपयोग ध्यानांत येईल. सारांश, या शाळेंतील क्रमिक पुस्तकाबरोबरचे महा-

भारताची हीं तीनहि पुस्तकें तयार झाल्यावर त्या सर्वांचा उपयोग व्हावा. अशी हें पुस्तक लिहिणाराची व प्रसिद्ध करणाराची इच्छा आहे; व ती तडीस नेणें सर्वस्वी लोकाश्रयांवर अवलंबून आहे. अशा दृष्टीनें पाहिलें म्हणजे हल्लींच्या पुस्तकाचें बाह्य स्वरूप सध्यापेक्षां अधिक मनोरंजक व्हावयास पाहिजे होतें; पण कांहीं कारणामुळें तसें झालें नाहीं. पुढील आवृत्तीची जरूर लागल्यास तींत हा दोष काढून टाकण्यांत येईल. शेवटीं इतकेंच सांगणें आहे कीं, हें पुस्तक मूळ संस्कृत ग्रंथावरूनच लिहिलेलें असून ठिकठिकाणीं मूळ ग्रंथांतील अध्यायांचे जे उल्लेख केलेले आहेत, त्यांवरून मूळ कथा पाहण्यास सोयीवार पडेल. पुढचे भागांह अशाच पद्धतीनें तयार करण्याचा विचार आहे. तथापि पुस्तक वाचून कोणास कांहीं सूचना करणें असल्यास त्यांनीं त्या पुस्तककर्त्याकडे पाठविल्यास त्यांचा आभरपूर्वक स्वीकार करून योग्य विचार करण्यांत येईल.

पुणें, आश्विन शुद्ध १०,
शके १८२९.
} बाळ गंगाधर टिळक.

---

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.



लो. बाळ गंगाधर टिळक यांनीं 'भारतीय युद्धा' ची प्रस्तावना लिहून तद्द्वारा या लेखकास व पुस्तकास प्रोत्साहन व उत्तेजन दिलें; त्यास आज चार वर्षें होऊन गेलीं. महाभारत ग्रंथाचें महत्त्व केवढें आहे व त्याचें मुख्य रहस्य काय ? विद्यार्थ्यांनीं कथाकीर्तनें किंवा पुराणें ऐकण्याची अगर मोडी बखरी वाचण्याची जुनी प्रवृत्ति नष्ट झाल्यामुळें सांप्रत ह्या राष्ट्रीय ग्रंथाची थोडीबहुत ओळख, अशा पुस्तकाचे रूपानें, विद्यार्थ्यांस करून देणें किती अगत्याचें आहे-

याचें विवेचन सदर प्रस्तावनेंत सर्वतोपरी अधिकारी अशा लेखणीनें केलेंच आहे. अर्थात् त्यासंबंधानें प्रस्तुत लेखकांस पुनः कांहीं नवीन लिहितां येणें शक्यच नाहीं. पुस्तक प्रथम छापून प्रसिद्ध करतांना, तें तरुण विद्यार्थिवर्गास कितपत आवडते व त्याची मजल दुसऱ्या आवृत्तीपर्यंत जाते कीं नाहीं, याबद्दल मन कांहींसें साशंक झालें होतें. 'तथापि या पुस्तकाची २००० प्रतींची पहिली आवृत्ती---बाह्यांग विशेष चित्ताकर्षक नसतांहि---चार वर्षांचे आंतच खलास झाली; यावरून या पुस्तकानें शाळांत शिकणाऱ्या तरुण पिढीच्या शिक्षणांतील एक उणीव खरोखरच भरून काढली असून तें तिला बरेंच पसंत पडलें आहे, असा संतोषदायक प्रत्यय लेखकांस व प्रकाशकास आला.या पुस्तकावर वर्तमानपत्रांत व मासिक पुस्तकांत आलेले अभिप्रायहि अनुकूल असेच होते. डेक्कन व्हे. ट्रा. सोसायटीनेंहि हें पुस्तक बक्षिसास लायक ठरविलें. विविधज्ञानविस्तारांतील टीकालेखकानें पुस्तकांतील कांहीं भागांसंबंधानें सूचनाहि केल्या होत्या. धृतराष्ट्र हा अंध, पांडु हा पांढऱ्या वर्णाचा व विदुर बुद्धिमान् कां निपजला हें वाचकांचे लक्षांत यावें म्हणून त्यांच्या जन्माचें वर्णन महाभारतांवरून विस्तारानें दिलें होतें. परंतु हें वर्णन इतक्या विस्तारानें--विशेषतः विद्यार्थ्यांकरितां लिहिलेल्या पुस्तकांत---नसावें, असा सदर टीका लेखकाचा व इतर मित्रांचा अभिप्राय पडल्यामुळे तें वर्णन या आवृत्तींत अगदीं त्रोटक दिलें आहे. पहिल्या आवृत्तींतील मोठ्या झालेल्या एका प्रकरणाचीं दोन प्रकरणें केलीं आहेत. घोषयात्रा---प्रसंगीचा, मूळ महाभारतांत नसलेला,परंतु सर्व हिंदुस्थानांत पाठभेदानें सर्वतोमुखीं झालेला, 'ते शतं हि' हा श्लोक या आवृत्तींत मुद्दाम घातला आहे. शिवाय नव्या आवृत्तींत मूळच्या मजकुरांत, किरकोळ शब्द व वाक्यरचना खेरीज करून, विशेष फरक केलेला नाहीं. पहिल्या आवृत्तींच्या बाह्यांगासंबंधाची वाचकांची सकारण कुरकुर नाहींशी करण्यासाठीं हीं आवृत्ति जाड व चिवट पण वजनानें हलक्या अशा कागदावर आणि नव्या जाड टाइपांत काढली आहे; आणि चित्रेंहि पूर्वीपेक्षां ५ जास्त घातली आहेत. महाभारतांतील मुख्य गोष्टी जेथें घडल्या त्या स्थळांची ओळख बरोबर पटावी म्हणून प्राचीन भरतखंडाचा नकाशाहि या आवृत्तीस जोडला आहे, महाराष्ट्रांतील प्रसिद्ध संशोधक रा. रा. त्र्यंबक गुरुनाथ काळे यांनीं हा नकाशा तयार केला असून तो त्यांनीं या पुस्तकांत घालण्यास दिला, याबद्दल प्रस्तुत लेखक त्यांचा फार आभारी आहे. सारांश, 'पुढील आवृत्तीची जरूर लागल्यास तींत हा दोष काढून टाकण्यांत येईल' असें जें आश्वासन लो. टिळक यांनीं प्रस्तावनेंत

वाचकांस दिलें होतें, त्यास अनुसरून ही आवृत्ति शक्य तितकी वित्ताकर्ष करण्याचा प्रयत्न केला आहे. तो कितपत साधला आहे, हें ठरविणें वाचकांकडेच आहे, लो. टिळक यांनीं प्रस्तावनेंत दिग्दर्शन केल्याप्रमाणें महाभारतांतील मुख्य धर्म नीतिपर कथांचा ' **भारतीय उपकथा** ' हा दुसरा भागहि बहुतेक लिहून तयार झाला असून तोहि लवकरच छापून प्रसिद्ध होईल.

पुणें, ७१५ सदाशिव पेठ.
त्रिपुरी पौर्णिमा, शके १८३३.

**दत्तात्रय गोपाळ लिमये.**

———

# अनुक्रमणिका.





## प्रकरण पहिलें.



## प्रकरण २ रें.

## प्रकरण ३ रें.



## प्रकरण ४ थें.



## प्रकरण ५ वें.

## प्रकरण ६ वें.



## प्रकरण ७ वें,



## प्रकरण ८ वें.



## प्रकरण ९ वें.

## प्रकरण १० वें.



## प्रकरण ११ वें.



## प्रकरण १२ वें.

---

# चित्रांची अनुक्रमणिका.



# भारतीय युद्ध.

## प्रकरण १ लें.

### कौरवपांडवांचें पूर्वजवृत्त, बाल्यदशा व धनुर्विद्याप्राप्ति.




क्ष्वाकु वंशामध्यें महाभिष नांवाचा एक मोठा पुण्यवान् राजा होऊन गेला. त्यानें अश्वमेध, राजसूय इत्यादि अनेक यज्ञ करून स्वर्ग संपादन केला होता. एके समयीं सर्व देव, ब्रह्मर्षि व राजर्षि ब्रह्मलोकीं गेले होते; त्या वेळीं त्यांचेबरोबर महाभिष राजाहि गेला होता. त्या ठिकाणीं पवित्र नदी गंगाहि आली होती. तेथें ब्रह्मदेवाचे सभेंत तिचें पांढरें शुभ्र वस्त्र वाऱ्यानें उडालें, व पदर थोडासा खालीं पडून तिचा उरोभाग किंचित् उघडा झाला. तेव्हां तिला लज्जा वाटूं नये म्हणून, तेथें जमलेल्या सर्व देवांनीं आणि ब्रह्मर्षिराजर्षींनीं खालीं माना घातल्या. परंतु महाभिष राजा तिजकडे सारखी टक लावून निःशंकपणें पहात राहिला ! हें त्याचें असभ्य वर्तन पाहून ब्रह्मदेवानें त्याला असा शाप दिला कीं, ' तुझ्या मनामध्यें गंगेविषयीं पापवासना आल्यामुळें तूं मृत्युलोकीं जन्म घेशील; आणि तेथें ही गंगाहि जन्म घेऊन तुला न आवडणारीं अशीं कृत्यें करून तुला दुःख देईल ! ' ब्रह्मदेवानें राजास असा शाप दिल्यानंतर गंगा तेथून निघून गेली. तेव्हां वाटेंत तिला अष्टवसु भेटले. पूर्वी या अष्टवसूंपैकीं ' द्यु ' नांवाच्या वसूनें वसिष्ठ ऋषींची ' नंदिनी ' नांवाची कामधेनु चोरून आणली व तिला ते अष्टवसु घेऊन गेले. या पातकाबद्दल ' तुम्ही मृत्युलोकीं जन्म घ्याल ' असा त्यांना वसिष्ठांनीं शाप दिला होता. परंतु, त्या सर्वांच्या विनंतीवरून ' जन्मल्यापासून एक वर्षाचे आंत तुम्ही शापमुक्त होऊन स्वर्गी परत याल; परंतु ' द्यू ' ला मात्र या चोरीच्या पातकाबद्दल मृत्युलोकीं पुष्कळ वर्षें राहावें लागेल, ' असा वसिष्ठांनीं त्यांस उःशाप दिला होता. मृत्युलोकीं जेव्हां गंगा अवतार

घेईल तेव्हां तिचेच पोटीं जन्म घ्यावयाचा, असें ठरवून या गोष्टीस गंगेचीहि त्यांनीं संमति मिळविली. ' आम्ही तुझे पोटीं जन्मास आल्यानंतर एक वर्षाचे आंतच तूं आम्हांस नदींत बुडवून टाक; म्हणजे आम्ही मानवी शरीररूपीं दुःखदायक कारागृहांतून सुटून लवकर मुक्त होऊं व स्वर्गास परत जाऊं. ' असेंहि त्यांनीं गंगेस सांगितलें व त्याप्रमाणें वागण्याचें तिनेंहि कबूल केलें. ( आदिपर्व अध्याय ९६ )

इकडे कुरु, दुष्यंत, भरत, ययाति, पुरु, इत्यादि पुण्यशील व महात्म्या राजांच्या जन्मामुळें पुनीत झालेल्या कुरुकुलांतील प्रतीप नांवाचा राजा गंगाद्वारीं बहुत वर्षे तपश्चर्या करीत होता. एके दिवशीं गंगानदी, अत्यंत सुस्वरूप व तरुण स्त्रीचें रूप धारण करून एकदम तेथें आली व प्रतीप राजाच्या उजव्या मांडीवर बसली; आणि ' माझें मन आपल्या पायीं जडलें आहे; मी कुलीन देवकन्या आहे; आपण माझा स्वीकार करावा ' असें म्हणूं लागली. अशा समयीं दुसरा एकादा सामान्य राजा असता तर त्यानें तिचें म्हणणें तेव्हांच ऐकिलें असतें. परंतु प्रतीप राजा पापभीरु, सदाचरणी आणि धर्मशील होता. म्हणून तिचा निषेध करून तो तिला म्हणालाः–' पुरुषाची डावी मांडी भार्येची असून उजवी मांडी हे मुलांमुलींचें किंवा सुनांचें स्थान आहे. तूं आपण होऊनच जर माझ्या उजव्या मांडीवर येऊन बसली आहेस, तर तुझा पत्नी या नात्यानें मला स्वीकार करतां येत नाहीं. तुझी इच्छा असल्यास मी तुला आपली सून करून घेईन. ' प्रतीप राजाचें हें बोलणें मान्य करून व आपण प्रतीपाची सून कोणत्या अटीवर होणार, हेंहि त्यास कळवून गंगा गुप्त झाली. यानंतर प्रतीप राजा आपल्या राणीसह पुत्रप्राप्तीसाठीं तपश्चर्या करूं लागला. कांहीं दिवसांनीं ब्रह्मदेवाचे शापानें स्वर्गभ्रष्ट झालेल्या महाभिष राजानें राणीचे पोटीं जन्म घेतला. तरुणपणांतील सर्व प्रकारच्या उच्छृंखल मनोवृत्ति तपानें शांत झाल्यानंतर हा पुत्र झाला, म्हणून राजानें त्याचें नांव ' शांतनु ' असें ठेविलें. शांतनु तारुण्यांत आल्यानंतर, पूर्वी गंगाद्वारीं घडलेली हकीकत त्यास सांगून प्रतीप राजा म्हणालाः–'ती सुंदर स्त्री जेव्हां तुजकडे येईल तेव्हां ' तूं कोण ? कोणाची ? कोठून आलीस ? ' वगैरे कांहींएक तूं तिला विचारूं नको. माझ्या आज्ञेवरून तिला आपली भार्या समजून तिचा स्वीकार कर. तिनें कोणतेंही कृत्य केलें तरी तिला तूं ' असें कां केलेंस ? ' असेंहि विचारूं नको. असल्या विलक्षण अटी घालून आपणास लग्न करावयास सांगणाऱ्या

बापाचे, तो काळ हल्लींसारखा असतां तर, या तरुण राजपुत्रानें एकलें नसतें. पण तो आज्ञाधारकतेचा, स्वार्थत्यागाचा व कर्तव्यनिष्ठेचा काल असल्यामुळें शांतनूनें बापाची आज्ञा शिरसामान्य केली. नंतर कांहीं दिवसांनीं त्यास राज्याभिषेक करून, प्रतीप आपल्या भार्येसह पुनः तपोवनांत निघून गेला.

पुढें एके दिवशीं शांतनु राजा गंगानदीच्या तीरानें शिकार करीत एकटाच फिरत असतां एक अत्यंत लावण्यवती, कमलाच्या अंतर्भागाप्रमाणें शरीरकांति असलेली, आणि अतिशय नाजूक व तलम वस्त्र नेसलेली दिव्य स्त्री तेथें आली. उभयतांची दृष्टादृष्ट होतांच एकमेकांचें सौंदर्य व तारुण्य पाहून दोघेंहि प्रेममोहित होऊन गेलीं! शांतनूनें, 'माझी भार्या हो' अशी तिला विनंती केली. तेव्हां गंगा म्हणाली:— 'माझें कोणतेंहि वर्तन तुम्हांला आवडो वा न आवडो, तुम्हीं माझ्या कोणत्याहि कृत्याचे आड येऊं नये; व कधींहि अप्रिय भाषण करून मला दुःख देऊं नये. ही अट तुम्हांला मान्य असल्यास मी तुमची पट्टराणी होण्यास कबूल आहे. तुम्ही जेव्हां मला अमुक गोष्ट करूं नको, असें म्हणाल किंवा अप्रिय भाषण कराल, तेव्हां तात्काळ मी तुम्हांस सोडून जाईन.' पित्याची आज्ञा व गंगेचें लावण्य ह्या दोहोंनीं बद्ध झाल्यामुळें शांतनु राजानें तिची ही अट कबूल केली; व तिला बरोबर घेऊन तो आपल्या राजधानीस परत आला. पुढें शांतनूपासून गंगेला मुलगा झाला कीं, 'मी तुझ्या मनासारखी गोष्ट करितें' असें म्हणून ती त्याला पाण्यांत बुडवून टाकी! याप्रमाणें एकामागून एक सात पुत्र तिनें मारून टाकिले! हें भयंकर व अमानुष कृत्य पाहून शांतनु राजास अर्थात् अति राग येई व दुःख होई. परंतु गंगा आपणास सोडून जाईल, या भीतीनें बिचारा तिला कांहींच बोलत नसे. आठवा मुलगा झाल्यावर जेव्हां गंगा त्यालाहि नदींत बुडवून टाकूं लागली, तेव्हां शांतनु राजा, पुत्रप्रेमानें मोहित होऊन आपल्या बापाची आज्ञा व तिजशीं केलेला करार विसरून गेला; आणि तिला क्रोधानें व दुःखानें म्हणाला:—'अगे दुष्टे! तूं कोण राक्षसी आहेस कीं पिशाची आहेस? आपल्या मुलांचा तूं विनाकारण कां जीव घेतेस? अगे चांडाळणी, तुझें पातक फारच भयंकर झालें आहे!' राजाचें हें रागाचें भाषण ऐकून, आपण कोण आहों, आपल्या पोटीं जन्मलेली पुत्र पूर्वजन्मीं कोण होते, हा आठवा पुत्र 'द्यु' नांवाचा वसु असून त्यास कोणत्या शापामुळें मृत्युलोकांत जन्म घ्यावा लागला. हें सर्व गंगेनें शांतनूस सांगितलें. आणि या आठव्या मुलास न मारण्याचें वचन देऊन व राजानें पूर्वीं कबूल केलेल्या अटीची त्यास

मुलासह आठवण देऊन गंगा एकदम गुप्त झाली ! ह्या मुलाचें नांव पुढें 'देवव्रत' असें ठेवण्यांत आलें. वसिष्ठ, जामदग्न्य इत्यादि तपोनिष्ठ महान् ऋषींपासून देवव्रत वेदविद्या व अस्त्रविद्या शिकला. शांतनु राजास गंगा सोडून गेल्यावर बरींच वर्षे लोटल्यानंतर एके दिवशीं शांतनु राजा वनामध्यें शिकार करीत फिरत असतां, गंगानदीचा प्रवाह फारच लहान झालेला त्याचे दृष्टीस पडला. असें होण्याचें कारण काय असावें हें समजण्यासाठीं तो इकडेतिकडे पाहूं लागतो तों, एका मुलानें आपल्या अस्त्रसामर्थ्यानें बाणांच्या राशी उत्पन्न करून त्यांचे योगानें नदीचा जल-प्रवाह आडवून टाकिला आहे. असें त्याचे दृष्टीस पडलें ! शांतनूनें त्या मुलास मुळींच ओळखिलें नाहीं. परंतु इतक्यांत गंगा तेथें आली; व 'माझे पोटीं तुम्हांस झालेला आठवा मुलगा तो हाच आहे' असें सांगून तिनें त्यास राजाचे हवालीं केलें. शांतनु राजा त्या मुलास बरोबर घेऊन आपल्या नगरास परत आला. पुढें त्याची धनुर्विद्या, अस्त्रविद्या व राजनीतीचें ज्ञान पाहून शांतनूनें राज्याभिषेक करून त्यास आपला युवराज केलें. ( आदिपर्व अ० ९७–१०० )

उपरिचर नांवाचा एक राजा वनामध्यें मृगया करीत असतां, त्यास गिरिका नांवाच्या आपल्या तरुण व ऋतुस्नांत भार्येची आठवण होऊन त्याचें वीर्य एका वृक्षाच्या पानावर पडलें. हें पान घेऊन एक बहिरी ससाणा आकाशांत उडाला असतां, तें यमुना नदीच्या पाण्यामध्यें पडलें. तेथें, अद्रिका नांवाची एक अप्सरा ब्रह्मदेवाचे शापानें मासा ( मादी ) झाली होती, तिच्या पोटांत तें अमोघ वीर्य जाऊन तिला गर्भ राहिला. पुढें तिला एका कोळ्यानें जाळ्यांत धरून घरीं आणलें; व चिरून पाहतो तों तिचे पोटामध्यें एक मुलगा व एक मुलगी असें जुळें निघालें ! हा चमत्कार त्यानें उपरिचर राजास कळविला. राजानें मुलगा आपणापाशीं ठेवून घेतला आणि मुलीस त्या कोळ्याचे स्वाधीन करून, तिचें आपल्या पोटच्या मुलीप्रमाणें पालनपोषण करण्यास त्यास सांगितलें हाच मुलगा पुढें 'मत्स्य' या नांवाचा प्रख्यात राजा झाला. इकडे ही मुलगी ( सत्यवती ) यमुना नदीवर आपल्या बापाची नाव चालविण्याचें काम करूं लागली. पुढें एके समयीं पराशर ऋषि तीर्थयात्रा करीत करीत तेथें आले असतां, सत्यवतीचें तें अप्रतिम लावण्य पाहून त्या तपोनिष्ठ ऋषीचेंहि मन चंचल झालें. पराशर ऋषींनीं आपल्या तपोबलानें नावेमध्यें व भोंवतालीं दाट धुकें उत्पन्न केलें; व तुझें कौमार्य नष्ट होणार नाहीं, तुझ्या अंगाची

दुर्गंधी नाहींशी होऊन शरीरास उत्तम सुवास प्राप्त होईल व तो सुगंध भोंवतालीं एक योजनपर्यंत वाहत राहील ' असा वर देऊन तिला आपल्या हेतूस अनुकूल करून घेतलें. ( या वरामुळेंच **स**त्यवतीस ' **गंधवती** ' ' **यो**जनगंधा ' अशीं नांवें पडलीं. ) **प**राशरापासून तिला जो मुलगा झाल तो तिनें **य**मुना नदीच्या एका द्वीपा ( बेटा ) वर टाकून दिला; म्हणून त्याचें ' **द्वैपायन** ' असें नांव पडलें. हाच पुढें महान् ऋषि झाला व त्यानें वेदांना व्यवस्थित स्वरूप दिलें; म्हणून त्यास ' **वे**दव्यास ' असेंहि म्हणत. त्याचा वर्ण काळा होता म्हणून त्यास ' **कृ**ष्ण ' हेंहि नांव होतें. ( आदिपर्व, अ० ६३ )

इकडे देवव्रतास यौवराज्याभिषेक होऊन तीन चार वर्षें लोटल्यानंतर, **शां**तनु राजा **यमुना** नदीचे तीरानें फिरत असतां, वाऱ्याचे झुळकेबरोबर मनास मोहित करणारा उत्कृष्ट सुवास येत असल्याचें त्याला कळून आलें. तो सुवास कोठून येत आहे, हें पहात असतां त्यास नावेंत बसलेली कोळ्याची मुलगी **सत्यवती** दिसली. तिचें तें रूप व तारुण्य आणि तिच्या शरीराचा तो अलौकिक सुगंध पाहून हा चंचलमनाचा, वृद्ध व विलासी राजा तिजवर अगदीं भुलून पडला; आणि त्यानें कोळ्याकडे जाऊन तिजशीं विवाह करण्याविषयींची आपली इच्छा त्यास कळविली. तेव्हां ' हिच्या पोटीं जो पुत्र होईल त्यालाच आपल्या मागें सिंहासनावर बसविण्याचें जर आपण अभिवचन द्याल, तर मी **स**त्यवती आपणांस देण्यास कबूल आहे ' असें कोळ्यानें उत्तर दिलें. राजा जरी **स**त्यवतीच्या प्रेमपाशांत पुरा सांपडला होता, तरी **दे**वव्रतास राज्य न देण्याचा विचार त्याला आवडेना. म्हणून कोळ्याचे म्हणण्यास रुकार न देतां, अत्यंत उद्विग्न होऊन तो राजवाड्यांत परत आला. पित्याच्या उद्विग्नतेचें कारण **दे**वव्रतानें मोठ्या नम्रपणानें त्यास पुशिलें. परंतु **दे**वव्रता, तुझ्यावांचून मला दुसरा मुलगा नाहीं. ज्याला एकच मुलगा असतो तो पुरुष निपुत्रिकच समजावा, असें धर्मशील पुरुषांचें म्हणणें आहे. तुझ्यासारख्या शूराला युद्धांतच खास मरण येणार. अशा रीतीनें तुला मरण आल्यावर, तुझ्यामागें आमच्या या **भा**रत वंशाचें व एवढ्या **रा**ज्याचें काय होईल, असें मनांत येऊन माझें चित्त उद्विग्न झालें आहे. ' यावांचून दुसरें सयुक्तिक उत्तर राजास देत आलें नाहीं. परंतु राजाच्या एका वृद्ध अमात्याकडून त्याच्या खिन्नतेचें खरें कारण **देवव्रतास** समजलें. तेव्हां बरोबर कांहीं जुने व अनुभविक मंत्री घेऊन **दे**वव्रत तात्काळ

त्या कोळ्याचे घरीं गेला; आणि त्यानें आपल्या बापाचें मनोगत त्यास कळविलें. तेव्हां, ' घरांत सावत्रपणा असणें फारच तापदायक होत असतें; तुझ्या-सारखा शूर व वडील सावत्र भाऊ असतां सत्यवतीच्या पुत्रांस शांतनूच्या मागें राज्य मिळण्याचा मुळींच संभव नाहीं ' इत्यादि प्रकारानें कोळ्यानें आपली इच्छा त्यास कळविली. तेव्हां, शांतनु राजास सत्यवतीचे पोटीं जो पुत्र होईल त्यासच आम्ही राजा करूं, असें देवव्रतानें त्यास प्रतिज्ञा-पूर्वक वचन दिलें. तथापि, सत्यवतीचे प्राप्तीसाठीं यानें जें वचन दिलें तें हा कदाचित् पाळील; परंतु, ह्याचे पुत्र या वचनाप्रमाणें वागतील कीं नाहीं, याविषयीं त्या धूर्त व व्यवहारचतुर कोळ्यास संशय येऊन तो त्यानें देवव्रतास स्पष्टपणें कळविला. त्यावर त्यानें उत्तर केलें:--

राज्यं तावत्पूर्वमेव मया त्यक्तं नराधिपाः ॥
अपत्यहेतोरपि च करिष्येऽद्य विनिश्चयं ॥
अद्यप्रभृति मे दाश ब्रह्मचर्यं भविष्यति ॥.

' राज्यावरचा माझा हक्क मी आतांच सोडून दिला आहे. पण मला पुढें पुत्र होऊन त्यांचेमुळें सत्यवतीचे मुलांना राज्य मिळण्याचे कामीं विघ्न येईल, अशी जी तुम्हांला शंका आली आहे तिचेंहि निरसन मी आतांच करितों. मी आजपासून आमरणांत ब्रह्मचर्यानें राहीन, हें तुम्हांस प्रतिज्ञापूर्वक सांगतों ! ! ' हें भाषण ऐकून कोळ्याचें समाधान झालें; व त्यानें शांतनूस सत्यवती देण्याचें कबूल केलें. देवव्रताची ही पितृभक्ति व त्याचा हा स्वार्थत्याग पाहून आणि पित्याचें सुखासाठीं हक्काचें राज्यवैभव व स्त्रीसुख आमरणांत सेवावयाचें नाहीं, अशी त्यानें केलेली घोर प्रतिज्ञा ऐकून आकाशांतून देवांनीं त्याजवर पुष्पवृष्टि केली ! आणि ' भीष्मोऽयं ' ( हा घोर प्रतिज्ञा करणारा-भीष्म-आहे. ) अशी आकाशवाणीहि झाली ! नंतर भीष्मानीं आपली सत्यवती ' माता ' रथांतून हस्तिनापुरास आणून शांतनु राजास अर्पण केली. पुत्राचें हें वर्तन पाहून राजानें संतुष्ट होऊन त्यास ' इच्छामरणा ' चा वर दिला. पुढें कांहीं वर्षांनीं शांतनु राजास सत्यवतीपासून चित्रांगद व विचित्रवीर्य असे दोन पुत्र झाले. विचित्रवीर्य लहान असतानांच शांतनुराजा मरण पावला. तेव्हां भीष्मानीं चित्रांगदास सिंहासनावर बसविलें. त्याचें व चित्रांगद नांवाच्याच एका गंधर्वाचें कुरुक्षेत्राचे रणमैदानांत सरस्वतीच्या तीरीं सारखें तीन वर्षें तुंबळ युद्ध होऊन अखेर चित्रांगद युद्धांत मृत्यु पावला. त्याचे मागें भीष्मानीं

अल्पवयीं विचित्रवीर्यास गादीवर बसवून त्याचे नांवानें स्वतः राज्यकारभार चालविला. विचित्रवीर्य तारुण्यांत आल्यानंतर काशीराजाच्या अंबा, आंबिका व अंबालिका या तीन राजकन्यांचें स्वयंवर होणार आहे, असें भीष्मास समजलें. तेव्हां ते रथ सज्ज करून तिकडे गेले. आणि त्या काळच्या क्षत्रियांच्या पद्धतीप्रमाणें तिन्हीं कन्या बलात्कारानें आपल्या रथांत घालून त्यांनीं स्वयंवरास आलेल्या सर्व राजांना युद्धास आव्हान केलें ! त्या सर्वांशीं एकट्या भीष्मानीं युद्ध करून त्यांचा पराभव केला. राजकन्यांना घेऊन विजयी भीष्म हस्तिनापुराकडे जात असतां शाल्व देशच्या राजानें त्यांस वाटेंत गांठून त्यांशीं युद्ध केलें. त्यांत त्यासहि पराभूत करून भीष्म कन्यांना घेऊन हास्तिनापुरीं आले. तिन्ही कन्यांचा विचित्रवीर्याशीं विवाह करून टाकण्याचा त्यांनीं प्रथमतः निश्चय केला होता ; परंतु त्या तिघींपैकीं थोरली राजकन्या अंबा हिचें मन शाल्व देशच्या राजावर बसलें होतें, स्वयंवरामध्येंहि ती त्यासच वरणार होती व तिच्या बापांचाहि मानस तसाच होता ! असें तिच्याच तोंडून कळल्यावरून, धर्मज्ञ भीष्मानीं तिला शाल्व राजाकडे जाण्याची परवानगी दिली व धाकट्या दोघींचाच विचित्रवीर्याशीं विवाह केला. आंबिका व अंबालिका या दोन स्त्रियांसमवेत राज्यसुख फक्त सातच वर्षे उपभोगिल्यानंतर विचित्रवीर्यास भर तारुण्यामध्यें यक्ष्मरोगानें पछाडलें व शेवटीं त्यांतच त्याचा अंत झाला ! (आदिपर्व,अ.१००,१०१)

शांतनु राजाचे दोघेहि पुत्र संतती न होतां याप्रमाणें मरण पावलेले पाहून सत्यवतीचे दुःखास पारावार राहिला नाहीं. सगळ्या भरत कुलास व राज्यास भीष्मावांचून आतां दुसरा आधार नाहीं, असें पाहून सत्यवती त्यास म्हणालीः— ' माझी दोन्ही मुलें संतति न होतांच मरण पावलीं आहेत ; आतां आपल्या कुलाची संतानवृद्धि व राष्ट्राचें हित सर्वथैव तुजवरच अवलंबून आहे. तर तूं या दोन राजकन्यांचे पोटीं नियोगानें पुत्रोत्पत्ति कर. किंवा आपणा स्वतांस राज्याभिषेक करून घे, आणि विवाह करून, आपलें भरतकुल समूळ नष्ट होणार नाहीं अशी तजवीज कर. ' इतर नातलगांनीं व इष्टमित्रांनींहि त्यास सत्यवतीप्रमाणेंच आग्रह केला. याप्रमाणें राज्यसुख व पत्नीसुख उजळ माथ्यानें उपभोगण्याची संधी भीष्मास अनायासें प्राप्त झालीं असतांहि **आपली प्रतिज्ञा खरी करण्यासाठीं, मनुष्याच्या मनास अतिशय मोह पाडणारी हीं दोन्हीं सुखें त्यांनीं लाथेनें झुगारून दिलीं !** सत्यवती व शांतनु यांचें विवाह—समयीं आपण कोळ्यापाशीं केलेल्या

प्रतिज्ञेची भीष्मानीं तिला आठवण दिली. तथापि आपल्या दोघीं सुना निपुत्रिक राहून आपलें कुल व राज्य यांचाहि नाश होणार हा विचार मनांत येऊन सत्यवतीला रडें आवरेना. आपलें म्हणणें मान्य करण्याविषयीं ती पुनः भीष्मास आग्रह करूं लागली. परंतु भीष्मानीं आपलें प्रतिज्ञापालनाचें व्रत सोडलें नाहीं, ते म्हणाले:—' सत्यवती, तूं सत्याचा व धर्माचा असा त्याग करूं नको.

**सत्याच्च्युतिः क्षत्रियस्य न धर्मेषु प्रशस्यते ॥**

**क्षत्रियानें केव्हांहि सत्यभ्रष्ट होऊं नये**, असें धर्मशास्त्राचें सांगणें आहे. आपला सर्वांचा नाश करणारी ही गोष्ट करण्याचा तूं मला आग्रह करूं नको. पंचमहाभूते कदाचित् आपापले गंध, रूप, स्पर्श इत्यादी गुण सोडतलि, सूर्याचें तेजहि नाहींसें होईल. चंद्र आपला थंडपणा टाकून देईल; परंतु आपलें सत्यव्रत मी केव्हांहि सोडणार नाहीं ! फार काय सांगूं ?

**परित्यजेयं त्रैलोक्यं राज्यं देवेषु वा पुनः ।**
**यद्वाप्यधिकमेताभ्या न तु सत्यं कथंचन ॥**

सर्व पृथ्वीचें राज्य व मृत्युलोकांतील सर्व सुखें यांच्याकरतां तर नाहींच, पण **प्रत्यक्ष त्रैलोक्याच्या राज्याकरिता किंवा त्याहूनहि अधिक श्रेष्ठ अशा दुसऱ्या कोणत्याहि सुखाकरितां मी सत्य सोडणार नाहीं ! !** राष्ट्राचा उद्धार होण्यास कशा प्रकारचे करारी, बाणेदार व सत्यनिष्ठ पुरुष कारणीभूत होत असतात, हें या उत्तरावरून चांगलें दिसून येतें. असो; कुलाचें निसंतान होण्याचा असा दुर्धर प्रसंग आला असतां वेदवेत्त्या व तपोनिष्ठ ब्राह्मणाकडून नियोगानें पुत्रोत्पत्ति करविण्याची ( त्या काळच्या ) क्षत्रियांना शास्त्राची अनुज्ञा असल्याचें भीष्मानीं सत्यवतीस सांगितलें. तिनेंहि कोळ्याचे घरीं असतांना आपणांस पराशरापासून झालेल्या व्यास नामक पुत्राची हकीकत भीष्मास सांगून त्याची या कामीं योजना करण्याविषयींचें बोलणें काढिलें. तें भीष्मास पसंत पडल्यावर सत्यवतीनें व्यासांचें स्मरण करितांच, ते तेथें आले ! त्यांना तिनें स्मरण करण्याचें कारण सांगितलें; तेव्हां व्यास म्हणाले:—"आधीं या दोघी राजकन्यांनीं एक वर्षपर्यंत व्रतस्थ राहिलें पाहिजे. " परंतु एक वर्षपर्यंत वाट पाहण्यास सत्यवती कबूल नव्हती. तेव्हां, ' या राजकन्या जर माझें हें असलें वेडेंविद्रें रूप, माझा हा असला वेष व माझ्या शरीराचा असला हा दुर्गंध सहन करितील तर तुझ्या इच्छेप्रमाणें वर्षभर

न थांबतां मी आतांच तुमची इच्छा पुरी करीन ' असें त्यांनीं सांगितलें. याप्रमाणें बेत ठरल्यानंतर. या गोष्टीस सत्यवतीनें आपल्या दोघी सुनांची, मोठ्या पराकाष्ठेनें व मिनतवारीनें संमती मिळविली. पुढें योग्य वेळीं व्यासांपासून नियोगविधीनें अंबिकेला धृतराष्ट्र अंबालिके हा पांडू व अंबिकेच्या दासीला विदुर असे तीन पुत्र झाले. गर्भधारणाकाळीं त्यांची जशी स्थिति झाली तिला अनुसरून प्रत्येकीस पुत्र होईल असें व्यासांनीं भविष्य सांगितलें होतें. त्याप्रमाणें अंबिकेचा पुत्र जन्मांध व अंबालिकेचा पांढऱ्या फिकट तोंडाचा झाला; व म्हणूनच त्याचें नांव पांडू असें ठेविलें. तिसरा दासीपुत्र विदुर हा मात्र सद्गुणी, धर्मात्मा व बुद्धिमान् निपजला. ( आदिपर्व अ० १०५, १०६ )

धृतराष्ट्र पांडु व विदुर या तिन्ही पुतण्यांचें भीष्मांनीं आपल्या पुत्राप्रमाणें पालनपोषण केलें; आणि त्यांना मोठमोठ्या तपस्वी व ज्ञानी ऋषींकडून वेद, इतिहास, पुराण, नीतिशास्त्र, धनुर्विद्या व अस्त्रविद्या यांमध्यें प्रवीण करविलें. धनुर्विद्येंत पांडु विशेष कुशल होता; धृतराष्ट्राचें शरीरसामर्थ्य अप्रतिम होतें; आणि विदुर बुद्धिविषयक कामांमध्यें श्रेष्ठ होता; तिघेहि पुत्र तारुण्यांत आल्यावर भीष्मांनीं राज्य त्यांचे स्वाधीन करण्याचें ठरविलें. धृतराष्ट्र जन्मांध असल्यामुळें व विदुर पारसव ( ब्राह्मणापासून शूद्र स्त्रीचे पोटीं जन्मलेला ) असल्यामुळें, त्यांचे हवालीं राज्य करणें योग्य नव्हतें; म्हणून भीष्मांनीं पांडूस राज्याभिषेक केला. गांधार देशाचा ' सुबल ' नांवाचा राजा असून त्यांची गांधारी नामक राजकन्या होती; तिजशीं धृतराष्ट्राचें लग्न करण्याचें भीष्मांनीं ठरविलें. त्याप्रमाणें तिचा भाऊ शकुनी तिला हस्तिनापुरीं घेऊन आल्यावर लग्न झालें. गांधारीच्या निःसीम पतिप्रेमाची एक गोष्ट भारतांत सांगितली आहे, ती लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. आपला भावी पति जन्मांध आहे असें समजतांच, आपल्या पतीस जर जन्मापासून दृष्टिसुख नाहीं तर तें आपणास तरी घेऊन काय करावयाचें आहे, असा विचार करून त्या दिवसापासून तिनें मरेपर्यंत आपले डोळे एका वस्त्राच्या पट्टीनें घट्ट बांधून ठेविले होते ! ! ( आदिपर्व अ० १०९, ११० )

यादवकुलांत जन्मलेला शूर नांवाचा एक राजा होता. त्याला वसुदेवनामक एक पुत्र व पृथा नांवाची एक कन्या होती; ती त्यानें आपला आतेभाऊ कुंतिभोज राजा यास दत्तक दिली होती. तिचें स्वयंवर होणार आहे, असें ऐकून भीष्मांनीं पांडु राजाला तिकडे पाठविलें. स्वयंवराचे समयीं कुंतीनें पांडुराजास वरिलें; व तिला घेऊन पांडुराजा हस्तिनापुरास परत आला. पुढें कांहीं

दिवसांनीं **पां**डुराजाचें दुसरें लग्न करण्याचें ठरवून **भीष्म मद्र**देशाच्या राजधानीस गेले; व त्या देशच्या राजाची बहीण **माद्री** उपवर झाली होती. तिची त्यांनीं मागणी केली. त्या राजानें आपल्या कुलाचाराप्रमाणें मुलीचें ' शुल्क ' मागितलें ; तें देऊन **भीष्**मानीं **मा**द्रीस **ह**स्तिनापुरीं आणून तिजशीं **पां**डूचा विवाह केला. या लग्नानंतर सुमारें एक महिन्यानें, **भीष्म** आदिकरून वडील माणसांचे आशिर्वाद घेऊन **पां**डु सैन्यांसह दिग्विजय करण्यास निघाला. त्यानें दशार्ण, **मग**ध, **वि**देह, **सुम्ह**, **पुंड्र** वगैरे देशांचे राजे जिंकून अगणित संपत्ती व पुष्कळ कारभार हस्तिनापुरास आणला; व तें सर्व धन, आपला वडील भाऊ धृतराष्ट्र याच्या आज्ञेनें **भीष्म**, **स**त्यवती व आपल्या माता यांचे चरणीं अर्पण केलें ! **वडील माणसांविषयींचें हें प्रेम व ही पूज्यबुद्धी भरतखंडांतील राजपुरुषांचेहि मनांत जितकी दिसून येते तितकी इतर कोणत्याही देशांत आढळणार नाहीं.** देवक नांवाच्या राजाची एक पारसवी कन्या होती, तिजशीं **भी**ष्मानीं **वि**दुराचा विवाह करून दिला. तिचेपासून **वि**दुरास त्याचे सद्गुणांस शोभतील असे विनयशील पुत्र झाले. दिग्विजय करून आल्यानंतर कांहीं दिवसांनीं **पां**डुराजा शिकार करण्याकरितां हिमालयाचे दक्षिण उतरणीवरील अरण्यामध्यें दोघीं स्त्रियांसह जाऊन राहिला. ( आदिपर्व, अ० ११३, ११४ )

एकदां कृष्णद्वैपायन श्रमानें व भुकेनें व्याकूळ होऊन राजवाड्यांत आले असतां **गां**धारीनें त्याचें उत्तम प्रकारचें आदरातिथ्य करून त्यांस भोजन घातलें. तेव्हां त्यांनीं संतुष्ट होऊन ' तुला शंभर पुत्र होतील ' असा आशिर्वाद दिला. कांहीं कालानें **गां**धारी गर्भवती झाली; पण तो गर्भ तिचे पोटांत दोन वर्षे राहिला, तरी ती प्रसूत होण्याचें कांहींच चिन्ह दिसेना ! यामुळें **गां**धारीस अतिशय वाईट वाटलें. तशांत वनामध्यें **कुं**तीला **युधिष्ठिर** झाल्याचें समजलें; मग तें दुःख काय विचारावें ! **गां**धारी कितीहि पतिव्रता असली तरी स्त्रीजातीचे हेवा, मत्सरादि दुर्गुण तिचे अंगांत अगदींच नव्हते असें नाहीं. धृतराष्ट्र वगैरे कोणासहि न कळवितां तिनें दुःखानें आपल्या पोटावर मारून घेतलें यामुळें ती प्रसूत होऊन लोखंडाच्या गोळ्याप्रमाणें कठिण अशी एक मांसपेशी ( मांसाची पिशवी ) तिला झाली ! ही मांसपेशी दासी बाहेर नेऊन टाकून देणार, इतक्यांत **व्यास** तेथें आले. त्यांनीं त्या मांसपेशीवर थंड पाणी शिंपडतांच, तिचे आंगठ्याएवढे एकशें एक तुकडे झाले ! नंतर एका चांगल्या बंदोबस्ताचे जागीं एकशें एक कुंडें तयार

करून व त्यांत तूप घालून त्यांमध्यें हे गर्भाचे तुकडे घातलें व कुंडें बंद केलीं. अशा रीतीनें कांहीं दिवस त्यांचें रक्षण केल्यावर पहिलें कुंड उघडतांच दुर्योधन जन्मास आला. त्यावेळीं त्याचें रडणें गाढवाच्या ओरडण्यासारखें भासलें ! राजवाड्यानजीक गाढवें. गिधाडें, कावळे, व कोल्हीं हीं भयंकर रीतीनें शब्द करूं लागलीं; वारा सोसाट्यानें वाहूं लागला; व दिशा आगीनें जळल्याप्रमाणें भयाण दिसूं लागल्या ! त्याचे जन्माचे वेळीं झालेले हे उत्पात व अपशकून पाहून विदुर, विद्वान्, ब्राह्मण व मोठमोठे ऋषी यांनीं ' या मुलामुळें तुमचा कुलक्षय होईल व आपल्या राष्ट्रावर भयंकर संकटें ओढवतील; तर यास आतांच टाकून द्या ' असें परोपरीनें धृतराष्ट्रास सांगितलें. परंतु **पुत्रप्रेमांत बद्ध झाल्यामुळें कुल व राष्ट्र यासंबंधाचें आपलें कर्तव्य धृतराष्ट्राचें लक्षांत आलें नाहीं;** व त्यानें त्या वडील मुलाचा त्याग करण्याचें नाकारिलें. असो; याप्रमाणें एका मागून एक कुंडें उघडल्यावर एक महिन्याचे अवकाशांत त्यांतून शंभर पुत्र व एक कन्या निघाली ! धृतराष्ट्राचे सेवेस एक वैश्य स्त्री होती, तिचे पासूनहि धृतराष्ट्रास याच वेळीं पुत्र झाला; त्याचें ' युयुत्सु ' असें नांव ठेविलें. याप्रमाणें झालेल्या एकशें एक पुत्रांचें धृतराष्ट्रानें योग्य वेळीं विवाह केले; आणि दुःशीला कन्या सिंधुदेशाच्या जयद्रथ राजपुत्रास दिली. ( आदिपर्व अ० ११५, ११७ )

इकडे कुंती व माद्री यांसह पांडुराज मृगयेसाठीं हिमालयाचें अरण्यांत राहिला असतां. एके दिवशीं किंदम नांवाचा ऋषि हरिणाचें रूप घेऊन हरिणीचें रूप घेतलेल्या आपल्या स्त्रीशीं रममाण झाला होता. तें हरिणच आहेत असें समजून पांडुराजानें पांच तीक्ष्ण बाण सोडून त्या दोघांना त्या स्थितीतच जखमा करून जमीनीवर पाडिलें! त्या जखमांनीं विव्हल होऊन तो मृग मनुष्यवाणीनें पांडुराजास म्हणाला:—'राजा तूं येवढा धर्मशील असून असें क्रूर कृत्य कसें केलेंस ? आम्ही मृग—रूप धारण केलें होतें, म्हणून तुला ब्रह्महत्येचें पातक लागणार नाहीं; पण जुगलेल्या मृगांचें जोडप्याला ठार मारूं नये, हा मृगयेचा नियम तूं अविचारानें मोडिला असल्यामुळें, यापुढें जेव्हां तूं आपल्या स्त्रियांशीं रममाण होऊं लागशील, तेव्हां तुझ्या माझ्याप्रमाणेंच तात्काळ अंत होईल, असा माझा तुला शाप आहे' असें म्हणून त्या मृगरूप ऋषीनें व त्याचे पत्नीनें प्राण सोडिले ! आपल्या हातून चुकून एका ऋषीचा व ऋषिपत्नीचा झालेला हा वध पाहून व त्यांनीं दिलेला शाप ऐकून पांडुराजास अत्यंत वाईट वाटले. आपला बाप विचित्रवीर्य अतिशय विषयोपभोगामुळेंच यक्ष्मरोग होऊन मरण पावला, व आपणहि भार्येशीं संग करावयास जातांच

मरून जाणार; हा विचार मनांत येऊन त्याचें मन अत्यंत उद्विग्न होऊन गेलें म्हणून हस्तिनापुरास परत न जातां अरण्यामध्येंच तपश्चर्या करण्याचा निश्चय करून, कुंती व माद्री यांना हस्तिनापुरीं धृतराष्ट्राकडे परत पाठविण्याचा त्यानें विचार केला. परंतु त्या साध्वी स्त्रियांना तें मुळींच आवडलें नाहीं. आपल्या पतीबरोबर वनांतच राहून तपश्चर्या करण्याचें कुंती व माद्री यांनीं ठरविलें. नंतर तिघांनींहि आपापलीं मौल्यवान् वस्त्रें व बहुमोल दागदागीनें यांचें ब्राह्मणांना दान केलें; आणि तपस्व्यांना योग्य असा वेष धारण करून व शतशृंग पर्वतावर जाऊन त्यांनीं तपाचरणास प्रारंभ केला. ( आदिपर्व अ० ११८, ११९ )

याप्रमाणें त्या तपोवनांत तपश्चर्या करीत असतांहि पांडु राजाचे मनास समाधान वाटेना. आपणांस आजपर्यंत पुत्रसंतान झालें नाहीं व यापुढें होण्याची आशाहि समूळ नष्ट झाली, असें पाहून त्यास अतिशय खेद वाटूं लागला. कितीहि तप केलें तरी निपुत्रिक असल्यामुळें आपणांस स्वर्गप्राप्ति होणार नाहीं, असें त्याचे मनांत येई. पुढें एके दिवशीं, नियोगविधीनें ब्राह्मणाकडून पुत्रोत्पत्ति करण्याची गोष्ट त्यानें कुंतीजवळ काढली. या गोष्टीस तिची अनुकूलता दिसेना; म्हणून, प्राचीनकाळीं नियोगविधीनें पतीचे आज्ञेवरून पुत्रोत्पत्ति केलेल्या स्त्रियांची अनेक उदाहरणें सांगून तिची समजूत घालण्याचा त्यानें प्रयत्न केला; तरी तिचा निश्चय ढळला नाहीं. पण शेवटीं राजाचा फारच आग्रह दिसल्यावरून, माहेरीं असतांना आपणांस मिळालेल्या वराची हकीकत कुंतीनें पतीस सांगितली ती म्हणाली:—' माहेरीं असतांना मी दुर्वास महर्षींची सेवा करून त्यास प्रसन्न केलें होतें. त्यांनीं मला कांहीं मंत्र दिले आहेत; व ते जपून ज्या ज्या देवास मी बोलावीन तो तो देव मला दर्शन देईल व त्याचे कृपेनें मला पुत्र होतील, असा त्यांनीं वर दिला आहे. तेव्हां आतां, आपली आज्ञा असल्यास, त्या मंत्रांचा उपयोग करण्याची ही वेळ आहे. ' कुंतीच्या या म्हणण्यास पांडूनें रुकार दिल्यावर ( या वेळीं गांधारी गर्भवती होऊन एक वर्ष झालें होतें ) तिनें एके दिवशीं यमधर्माचे नांवानें बलिदान करून दुर्वासांनीं दिलेल्या मंत्राचा विधिपूर्वक जप केला. तेव्हां यमधर्मानें तिला प्रत्यक्ष दर्शन दिलें, त्याजपासून कुंतीस गर्भ राहून योग्य कालीं तिला पुत्र झाला. पुढें कांहीं दिवसांनीं पांडूनें ' बलज्येष्ठ ' पुत्र उत्पन्न करण्याविषयीं तिला सांगितल्यावरून, तिनें मंत्र जपून वायूस बोलाविलें; व त्याजपासून तिला दुसरा पुत्र झाला. त्याच दिवशीं हस्तिनापुरीं गांधारीला दुर्योधन झाला. राजानें पुन्हां 'लोकश्रेष्ठ, व पराक्रमी पुत्र उत्पन्न करण्याविषयीं सांगितलें, तेव्हां कुंतीनें मंत्र जपून इंद्रास

बोलाविलें; त्याजपासून तिला तिसरा मुलगा झाला. याचप्रमाणें पांडूला शाप झाला असतांहि कुंतीला तीन पुत्र झाले. गांधारीलाहि शंभर पुत्र व एक कन्या झाली; पण आपणांस अजून मूल नाहीं. हें मनांत येऊन माद्रीला फार दुःख होऊं लागलें. तिनें आपलें हें दुःख एकांतीं पांडुराजाला सांगून, आपणांस कुंती मंत्र देईल तर आपणांसहि पुत्रसुख अनुभवण्यास सांपडेल. असें तिनें सुचविलें. कुंतीनें राजाच्या आज्ञेवरून माद्रीला एक मंत्र शिकविला. तिनें त्या मंत्राचा जप करून आश्विनीकुमारांना बोलाविलें; त्यांचेपासून तिला दोन जुळे मुलगे झाले. याप्रमाणें एकेक वर्षाच्या अंतरानें पांडु राजाला पांच पुत्र झाले. त्या तपोवनांतील ऋषींनीं त्यांची युधिष्ठिर, भीमसेन, अर्जुन, नकुल व सहदेव अशीं अनुक्रमें नांवे ठेविली ( आदिपर्व अ० १२१-१२३ )

पुढें कांहीं काळ लोटल्यानंतर, कामी पुरषांची अंतःकरणें उचंबळून सोडणारा वसंत ऋतु प्राप्त झाला. त्या शतशृंग पर्वतावरील सर्व वृक्ष नवीन पालवीनें व फुलांनीं भरून गेले, आणि सुगंधीत व शीतल वारा चोहोंकडे मंद मंद वाहूं लागला. अशा समयीं अरण्यांत फिरत असतां पांडुराजाचें मन मदनानें अति विव्हळ करून सोडिलें. तशांत त्या वेळीं त्याजबरोबर अतिशय झिराझिरत असें एकच वस्त्र नेसलेली माद्री ही एकटीच होती. त्यामुळें तर त्याचें मन अनावर होऊन ऋषीनें दिलेल्या शापाचाहि त्यास विसर पडला ! त्यानें एकदम माद्रीजवळ जाऊन तिला गाढ आलिंगन दिलें. तिनें आपल्याकडून होईल तितकें त्याचें निवारण केलें; परंतु त्याचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. शेवटीं माद्रीशीं बलात्कारानें रममाण होत असतांना पांडुराजाचा अंत झाला ! आपल्या पतीचें प्रेतास कवटाळून माद्री तशीच अरण्यामध्यें शोक करीत बसली. कांहीं वेळानें कुंती आपल्या मुलांसह तेथें येऊन पाहते, तों तो भयंकर प्रकार तिचे दृष्टीस पडला ! पतिशोकाच्या पहिल्या वेगाबरोबर कुंती माद्रीस म्हणालीः-- 'राजास झालेला शाप जर चांडाळिणी तुला माहीत होता, तर त्याचें मन चंचल होणार नाहीं, अशीं तूं खबरदारी घ्यावयास पाहिजे होती. ते सोडून तूं राजाला मुद्दाम मोह पाडून व एकांतस्थळीं आणून त्याचा असा घात कसा गे केलास ? ' असा शोक करून ती माद्रीसच दोष देऊं लागली. परंतु तिनें खरा प्रकार कळविल्यानंतर, तिजकडे कांहीं दोष नाही असें कुंतीला कळून आलें यानंतर राजाबरोबर सती कोणी जावें, याविषयीं त्या दोघी पतिव्रता व साध्वी स्त्रियांमध्ये बराच वादविवाद झाला. शेवटी, ज्याअर्थीं एका प्रकारें माद्रीच

त्याच्या मरण्यास कारणीभूत झाली आणि **पांडुराजा** तिच्याच आलिंगनसुखांत निमग्न असतां मृत्यु पावला, त्याअर्थी **माद्रीनें**च त्याजबरोबर सती जावें असें ठरलें. तिनें आपलीं दोन्ही लहान लहान मुलें कुंतीच्या स्वाधीन केलीं; व त्यांचें आपल्या पोटच्या मुलांप्रमाणें पालनपोषण करण्यास सांगून, ती **पांडुराजाबरोबर** सती गेली. तरुण वय आणि तशांत नुकतेंच दोन जुळे मुलगे झालेले; पुत्रसुखाचा पुरता अनुभवहि मिळालेला नाहीं; अशा स्थितींत एकादी सामान्य स्त्री सती न जातां व आपलीं लहान लेंकरें सवतीच्या स्वाधीन न करतां वैधव्यच पत्करून राहिली असती. पण **पुत्रप्रेमापेक्षां माद्रीचें पतिप्रेम जास्त असल्यामुळें ती आनंदानें सती गेली** ! नंतर **शतशृंग** पर्वताच्या तपोपवनांतील सर्व ऋषि **कुंतीला** व पांच **पांडवांना** बरोबर घेऊन **हस्तिनापुरीं** येण्यास निघाले, ते सतरा दिवसांनीं त्या नगरास येऊन पोंचले. तेथें त्यांनीं **पांडवांच्या** जन्माची व **पांडुराजाच्या** मरणाची इत्थंभूत हकीकत सांगितली; आणि **कुंतीला** व **पांडवांना** **भीष्माचे** हवालीं करून सर्व ऋषि निघून गेले. नंतर **भीष्म**, धृतराष्ट्र व **विदुर** यांनीं **गंगातीरीं** जाऊन **पांडु** व **माद्री** यांची उत्तरक्रिया व श्राद्ध यथाविधि केलें. कांहीं दिवसांनीं **व्यासांच्या** सांगण्यावरून **सत्यवती** आपल्या दोघी सुनांना बरोबर घेऊन तपोवनांत निघून गेली; व तेथेंच त्या सर्वांचें कांहीं दिवसांनीं देहावसान झालें. ( आदिपर्व अ० १२५, १२८ )

धृतराष्ट्राचे एकशें एक पुत्र व पांच पांडव हे आतां एके ठिकाणीं राहूं लागले. बालपणांतील श्रमाच्या व व्यायामाच्या खेळांमध्यें, हिमालयाच्या वनांतच जन्मून वाढलेले पांडव राजवाड्यांमध्यें जन्मलेल्या व वाढलेल्या कौरवांपेक्षां पुष्कळच वरचढ होते. त्यांत भीमसेन तर सर्वांहून अधिक सशक्त असल्यमुळें सामर्थ्याचे कामांत त्याची बरोबरी करणारा कोणीहि नव्हता. भीमाचे अंगांत खोडकरपणाहि थोडा होता असें नाहीं. कौरवांपैकीं पांचसातजणांना काखेंत मारून त्यांसह त्यानें पाण्यांत बुडी मारावी, आणि त्यांचे नाकातोंडांत पाणी जाऊन ते घाबरून गेले म्हणजे मग त्यांना सोडून द्यावें ! झाडावर चढून ते फळें तोडूं लागले असतां, त्यानें खालीं जाऊन इतक्या जोरानें तें झाड हलवावें कीं ते सर्व कोलमडून झाडावरून खालीं पडत ! असल्या खोड्यामुळें सर्व कौरव विशेषतः दुर्योधन—बालपणापासूनच भीमसेनाचा द्वेष करूं लागला. पांडवांमध्यें सर्वांहून शक्तिमान् अशा भीमास कोणत्या तरी युक्तीनें नाहींसें करण्याचा विचार करून दुर्योधनानें एके दिवशीं गंगानदीवर जाऊन जलक्रीडा करण्याचा बेत केला

व पांडवासहि तिकडे बोलाविलें. त्याप्रमाणे कौरव व पांडव नेमलेल्या दिवशीं चाकरनोकर बरोबर घेऊन गंगानदीतीरावरील रमणीय बागेंत गेले. तेथे सर्वांचें जेवण चाललें असतां, दुर्योधनानें कालकूट विष घालून तयार केलेलें रुचकर व स्वादिष्ट अन्न भीमसेनास वाढविलें. **ज्याचें स्वतांचें मन शुद्ध व निष्पाप असतें त्यास दुसरे कपटी असतील असा संशय सहसा येत नाहीं**, या न्यायानें भीमास कपटाची शंका न आल्यामुळें त्यानें आपल्या नेहमींच्या रीतीप्रमाणें त्या अन्नावर सपाटून ताव मारला. जेवण झाल्यानंतर सर्वजण नदी-वर जाऊन पाण्यामध्यें पुष्कळ वेळ पोहले. संध्याकाळीं हीं सर्व मुलें वर आलीं व कोरडीं वस्त्रें नेसून त्याच बागेंतील वाड्यांत रात्रीचि रात्र राहिलीं. इकडे सर्वजण वाड्यांत गेलें, तरी विषाची गुंगी आल्यामुळें भीमसेन तसाच नदीच्या कांठावर निजून राहिला होता; त्यास दुर्योधनानें बळकट वेलींनीं चांगलें जखडून बांधून नदींत टाकून दिलें; आणि सर्वांचें मागून तो आनंदानें वाड्यांत परत आला! दुसरे दिवशीं सकाळीं कौरव हस्तिनापुरास निघून गेले; परंतु, पांडव भीमाचा शोध करूं लागले. त्यांनीं उद्यानामध्यें व नदीकांठानें त्याचा पुष्कळ तपास केला, परंतु तो कोठेंच सांपडला नाहीं. तेव्हां तो आधींच नगरास निघून गेला असेल. असें वाटून तेहि हस्तिनापुरास परत आले. परंतु तेथेंहि भीमसेन नसल्याचें कळतांच पांडवांना व कुंतीला अत्यंत दुःख झालें दुर्योधन दुष्ट आहे, त्यानेंच भीमसेनाचा कांहीं तरी घात केला असावा, असा आपला संशय कुंतीनें विदुरास कळविला. परंतु, भीमसेनाचे आयुष्याची दोरी फार बळकट आहे, त्यास कांहीं एक अपाय होणार नाहीं, वगैरे सांगून विदुरानें तिचें कसेंबसें समाधन केलें.

इकडे दुर्योधनानें भीमसेनास नदींत टाकिल्यानंतर तो पाण्यांत बुडून तळाशीं गेला. तेथें त्यास डोहांतील मोठमोठ्या नागांनीं दंश केल्यामुळें त्यांच्या विषानें त्याचे अंगांतील कालकूट ‘ विषस्य विषमौषधं ’ या न्यायानें नाहींसें झालें व भीम शुद्धीवर आला ! त्यास त्या नागांनीं नागलोकीं वासुकीकडे नेलें. वासुकी हा कुंतीचा मातामह ( आईचे बाजूस आजा ) असल्यामुळें आपल्या या पणतुला पाहून वासुकीस फार आनंद झाला. अतुल बळ उत्पन्न करणारा एक प्रकारचा अमृतरस त्यानें भीमास पुष्कळ प्यावयास दिला व भीमसेनानेंहि पणजोबांच्या शद्वास मान देऊन त्या रसाची आठ कुंडें फस्त केलीं ! नंतर तो रस जिरविण्याचाहीं भीमसेनाची स्वारी जी एकदां तेथें निजली ती आठ दिवसांनीं पुनः जागी झाली ! नंतर स्नान वगैरे आटोपून व पणजोबांचे घरीं

अखेरचें भोजन करून भीमसेन त्या उद्यानाजवळच नदीचे पाण्यांतून वर आला! नंतर हस्तिनापुरास येऊन कुंतीला व धर्मराजाला भीमानें नमस्कार केला, तेव्हां पांडवांस अत्यानंद झाला. दुर्योधनाचें हें सगळें कपट भीमसेनानें युधिष्ठिरास सांगितलें; परंतु ही गोष्ट कोणापाशींहि बोलूं नका. असें आपल्या भावांस युधिष्ठिरानें बजावलें. यानंतर पुनः एकदोनदां दुर्योधनानें भीमाच्या अन्नांत विष घातलें. परंतु नागलोकांच्या अमृतरसपानानें त्या विषाचा त्याच्या शरीरावर कांहींच परिणाम झाला नाहीं. इश्वरी कृपा असली म्हणजे विषाचें अमृत होतें, हेंच खरें. ( आदिपर्व अ० १२८, १२९ )

अशा प्रकारच्या दुष्टपणाच्या खोड्या करण्यांत राजपुत्राचे हे दिवस व्यर्थ जाणें योग्य नव्हे, असें लक्षांत आणून धृतराष्ट्रानें हीं सर्व मुलें शिक्षणासाठीं कृपाचार्यांचे ताब्यांत दिलीं. कृपाचर्यांचें पूर्ववृत असें होतें:--गौतम महर्षींना ' शारद्वान् ' नांवाचा एक पुत्र होता. वेदाभ्यासापेक्षां धनुर्वेदाच्या अध्ययनाकडेच याचें लक्ष जास्त असे. इतर ऋषि जसे तपोबलानें वेदविद्या संपादन करीत, तशी यानें तप करून अस्त्रविद्या संपादन केली होती. त्याच्या ह्या सामर्थ्यामुळें भयभीत होऊन, इंद्रानें ' जानपदी ' नांवाची एक अप्सरा त्याचें सत्त्व हरण करण्यास पाठविली. तिला पहातांच शारद्वानाचें मन चंचल होऊन त्याचे हातांतून धनुष्यबाण खालीं गळून पडले; आणि त्यास न कळत त्याचें वीर्य खालीं बाणांचे दोहों बाजूंस पडलें. धनुष्य, बाण, कृष्णाजिन वगैरे तेथेंच टाकून शारद्वान् त्या अप्सरेच्या मागोमाग निघूंन गेला. इकडे त्या द्विधा झालेल्या अमोघ वीर्यापासून मुलगा-मुलगीचें एक जुळें उत्पन्न झालें! तें वनामध्यें शांतनुराजाच्या एका सेनारक्षकास सांपडून तें त्यानें राजाकडे आणून दिलें. राजानें त्या जुळ्याचें मोठ्या ' कृपेनें ' पालनपोषण केलें; म्हणून त्यांचीं नांवें, पुढें स्वतः शारद्वानानें राजाकडे येऊन ' कृप ' व ' कृपी ' अशीं ठेविलीं. कृपाचार्य आपला पिता शारद्वान् याजपाशींच धनुर्विद्या शिकले. असो; कौरव-पांडव यांजबरोबरच यादव व इतर राजपुत्रहि कृपाचार्यांकडे येऊन धनुर्विद्या शिकूं लागले.

भगवान् भरद्वाज ऋषि गंगाद्वारीं एके दिवशीं गंगेवर स्नानास गेले असतां त्यांनी आधीं नदीवर येऊन स्नान करीत असलेली घृताची नांवाची सौंदर्यसंपन्न अप्सरा त्यांचे दृष्टीस पडली. त्या वेळीं त्यांचें अमोघ वीर्य ' द्रोणकलश ' नांवाच्या एका यज्ञ-पात्रांत पडून त्यापासून एक पुत्र झाला. त्याचें नांव त्यांनीं ' द्रोण ' असें ठेविलें. आपल्या पित्याचेच आश्रमामध्यें द्रोण वेदविद्या व धनुर्विद्या



‘ मी गाईचं दूध प्यायलो ’ म्हणत अश्वत्थामा आनंदाने नाचूं बागडूं लागला. [ पृ. १७

शिकले. भरद्वाजानीं अग्निवेशास शिकविलेलें आग्नेयास्त्र अग्निवेशापासून द्रोणाचार्य शिकले. नंतर महेंद्र पर्वतावर जाऊन परशुरामापासून त्यांनीं दुसरींहि कित्येक अस्त्रें संपादन केलीं. द्रोणाचार्य अग्निवेशाचे आश्रमामध्यें धनुर्विद्या शिकत असतां, भरद्वाजऋषींचा मित्र जो पांचाल देशाचा पृषत् राजा त्याचा पुत्र द्रुपद हा त्यांचा सहाध्यायी होता. त्याचें व द्रोणाचें अत्यंत सख्य व प्रेम होतें. पुढें पृषत् राजा मरण पावल्यावर द्रुपद सिंहासनावर बसला. द्रोणांनीं आपल्या पित्याचे सांगण्यावरून कृपाचार्यांची बहीण कृपी इजशीं लग्न केलें; तिजपासून त्यांना अश्वत्थामा पुत्र झाला. एकदां द्रोणाचार्य आपली भार्या व पुत्र यांसह एका नगरांत रहात असतां अश्वत्थाम्यानें श्रीमंतांचीं मुलें गाईचें दूध पितांना पाहिलीं. तेव्हां तो बापाकडे येऊन रडत रडत दूध मागूं लागला. परंतु त्या निर्धन ब्राह्मणाजवळ गाय कोठून असणार? आपणांस एकादा गोप्रदान करणारा धर्मात्मा भेटेल या आशेनें द्रोण नगरांत पुष्कळ हिंडले, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं त्यांनीं आपल्या भार्येकडून पाण्यामध्यें थोडेंसें पीठ कालवून तें अश्वत्थाम्यास पिण्यास दिलें; तें पिऊन 'मी गाईचें दूध प्यालों' असें म्हणत तो आनंदानें नाचूं बागडूं लागला! हें पाहून द्रोणास आपल्या दारिद्र्याबद्दल अत्यंत वाईट वाटलें. आपला मित्र जो पांचाल देशाचा द्रुपद राजा त्याजकडे जाऊन कांहीं द्रव्य मागावें, म्हणजे आपल्या कुटुंबाचा निर्वाह होईल; असें वाटून ते त्याजकडे गेले. आणि 'तुमचा मित्र द्रोण आला आहे' असें त्यांनीं राजास कळविलें. परंतु "राज्यमदानें धुंद झालेले राजे आईबापासहि जाणत नाहींत, तेथें दरिद्री ब्राह्मण मित्राचा पाड काय!" राजानें उत्तर केलें:—'अरे ब्राह्मणा, तुझें माझें मित्रत्व असणें मुळींच संभवनीय नाहीं. दरिद्री मनुष्य श्रीमंताचा, मूर्ख विद्वानाचा व क्लीब शूराचा कधींहि मित्र असत नाहीं. त्याचप्रमाणें जो स्वतः राजा नाहीं तोहि राजाचा मित्र असूं शकत नाहीं!' द्रुपदाचें हें उद्धटपणाचें उत्तर ऐकून द्रोणाचार्यांना अतिशय क्रोध आला. परंतु राजाचे बोलण्यास त्यावेळीं कांहींच उत्तर न करितां, ते तेथून निघाले; आणि कुरुजांगल देशातून प्रवास करीत करीत हस्तिनापुराजवळ येऊन ठेपले.

त्या दिवशीं कौरव व पांडव हस्तिनापुराचे बाहेरील मैदानांत विटीदांडूचा खेळ खेळत होते. खेळ ऐन रंगांत आला असतां विटी एकदम उडून जाऊन एका कोरड्या पण खोल विहिरींत पडली. ती वर काढण्यासाठीं त्यांनीं हरप्रयत्न केले, परंतु कांहीं इलाज चालेना. तेव्हां काय करावें हें न समजून

ते एकमेकांचे तोंडाकडे पाहूं लागले. इतक्यांत तिकडून एक वृद्ध ब्राह्मण ( द्रोण ) जात होता, त्यानें हा सर्व प्रकार पाहिला. नंतर तो त्यांजजवळ येऊन म्हणालाः—' कौरववंशांत व क्षत्रिय जातींत उत्पन्न होऊन आणि अस्त्रविद्या शिकून येवढी विटी तुम्हांला विहिरींतून वर काढतां येत नाहीं, हें काय ? तुम्हीं शिकलेली सर्व विद्या फुकट आहे. ' अशी त्यांची निर्भर्त्सना करून द्रोणांनीं आपल्या बोटांतील अंगठी विहिरींत टाकून दिली ! आणि, ' ती विटी व ही आंगठी हीं दोन्हीं बाहेर काढतों ' असें म्हणून त्यांनीं मूठभर ' ईषिका ' ( गवताच्या काड्या ) हातांत घेतल्या; आणि ऐषिक अस्त्रानें त्या मंत्रून विहिरींत फेंकल्या. तों असा चमत्कार झाला कीं, गवताची एक काडी विटींत जाऊन घुसली; गवताच्या त्या काडींत दुसरी जाऊन घुसली, दुसरींत तिसरी घुसली; याप्रमाणें वरपर्यंत ईषिकांची मालिका लागल्यावर त्यांनीं ती विटी अचानक वर ओढून घेतली ! नंतर धनुष्य सज्ज करून त्यांनीं एक बाण त्यास लाविला; व तो अशा शिताफीनें विहिरींत सोडला कीं तो त्या अंगठींतून जाऊन तीसह पुनः वर येऊन पडला ! हें हस्तलाघव पाहून त्या राजपुत्रांना फारच आश्चर्य वाटलें व त्यांनीं द्रोणाचार्यांस भीष्माकडे नेलें. भीष्मांनीं त्यांना सन्मानपूर्वक आपले जवळ ठेवून घेऊन, सर्व राजपुत्रांना अस्त्रविद्या शिकविण्याचें काम त्यांजकडे सोंपविलें. ( आदिपर्व अ० १३०, १३१ )

ह्या राजपुत्रांना धनुर्विद्या व अस्त्रविद्या शिकवीत असतां, अर्जुनाची बुद्धिमत्ता, ग्राहकशक्ति व चातुर्य पाहून द्रोणाचार्यांची मर्जी त्याजवर विशेष बसली. एकदां त्यांनीं प्रत्येक राजपुत्रास एकेक कमंडलु देऊन तो पाण्यानें आधीं कोण भरून आणतो, याची परीक्षा पाहिली. कमंडलु पाण्यानें भरून आणण्यासाठीं सर्व राजपुत्र नदीवर गेले. परंतु अर्जुनानें ' वारुणास्त्राचा ' जप करून कमंडलु तेथल्या तेथेंच एकदम पाण्यानें भरून गुरुजीपुढें ठेविला ! एकदां भोजनाचे वेळीं वाऱ्यानें दिवा गेला असतां अर्जुन तसाच अंधारांत जेवला. त्या वेळीं त्याचे मनांत अशी कल्पना आली कीं, अंधारामध्यें आपला हात चुकूनहि दुसरीकडे न जातां नेमका तोंडाकडेच येतो. हें जर केवळ दृढ अभ्यासाचेंच

* विहिरींतून विटी वर काढणें, शद्ववेधित्व इ० विशेष कौशल्याच्या प्रयोगांचा जो उल्लेख महाभारतांत अनेकदां आला आहे, तो काल्पनिक नाहीं. पुणें येथें कांहीं दिवसांपूर्वीं राणा सरतानसिंह यांनीं केलेले प्रयोग ज्यांनीं पाहिले असतील त्यांचे लक्षांत ही गोष्ट सहज येईल.

फळ आहे. तर आपण तितका दृढ अभ्यास केल्यास आपणास अंधारांत निशाणहि मारितां येईल ! असा विचार करून त्या दिवसापासून अर्जुन रात्रीं अंधारामध्यें निशाण मारण्याचा सराव करूं लागला. हा अभ्यास करितां करितां त्यास 'शब्दवेधित्व* ' प्राप्त झालें. पुढें एके दिवशीं द्रोणाचार्यांनीं एका कुशल कारागिराकडून कृत्रिम भासपक्षी तयार करून आणिला; व तो एका झाडाचे शेंड्यावर ठेविला. नंतर सर्व राजपुत्रांना बोलावून आणून प्रत्येकास 'धनुष्य सज्ज करून, त्यास बाण लावून, दोरी ओढून, भासपक्ष्याचे डोक्यावर नेम धरून दोन घटकापर्यंत तसाच उभा राहा; व मी बाण सोडण्यास सांगतांच बाण सोड' असें सांगितलें. प्रथमतः युधिष्ठिर धनुष्य सज्ज करून व नेम धरून तितका वेळ उभा राहिल्यावर 'आतां तुला हा वृक्ष, भासपक्षी, येथें उभे असलेले तुझे भाऊ व मी यांपैकीं कोण कोण दिसत आहे ?' असा त्यास द्रोणांनीं प्रश्न केला. त्यावर 'तुम्ही, माझे भाऊ, हा वृक्ष व भासपक्षी हीं सर्व मला दिसत आहेत' असें धर्मानें उत्तर केलें. तें ऐकून हा शिष्य पक्का नाहीं असें समजून त्यांनीं युधिष्ठिरास धनुष्य खालीं ठेवण्यास सांगितलें. याप्रमाणें सर्वांची परीक्षा घेतल्यावर, सर्वजण त्यांत 'नापास' ठरले ! इतरांप्रमाणें अर्जुनासहि शरसंधान करून उभें राहण्यास त्यांनीं सांगितलें. दोन घटका होतांच त्यांनीं अर्जुनास तोच प्रश्न विचारला. तेव्हां, 'मला तुम्ही, माझे भाऊ, हा वृक्ष किंवा भासपक्षी, यांपैकीं कांहींच दिसत नसून भासपक्ष्याचें डोकें मात्र दिसत आहे' असें अर्जुनानें उत्तर केलें ! हें उत्तर ऐकतांच हाच शिष्य खरा व पक्का, आणि यानेंच आपल्या श्रमाचें चीज केलें, असें द्रोणाचार्यांना वाटून त्यांनीं आनंदानें 'बाण सोड' म्हणतांच, अर्जुनानें बाण सोडला; तो भासपक्ष्याचें शीर तात्काळ उडून जमिनीवर पडलें ! ही गोष्ट लहानच आहे; परंतु तीवरून पुष्कळ बोध घेण्यासारखा आहे. कोणत्याहि कामामध्यें, **मनाच्या एकाग्रतेचें किती महत्व आहे, हें या गोष्टीवरून कळून येणार आहे.** कोणतेंहि महत्वाचें कृत्य हातीं घेतलें असतां त्या वेळीं जर दुसऱ्या चारपांच गोष्टींकडे लक्ष गेलें तर कोणतीच गोष्ट धड पार पडत नाहीं. कोणत्याहि एकाच गोष्टीमध्यें मन जर इतकें गढून गेलें कीं, तीवांचून इतरांचें अस्तित्वहि भासेनासें झालें, तर त्या कामांत यशःप्राप्ति खात्रीनें व्हावयाचीच हें तत्व या लहान पण खुबीदार गोष्टीवरून चांगलें लक्षांत येणार आहे.

असो; तसेंच पुढें एके दिवशीं द्रोणाचार्य गंगेवर स्नानास गेले असतां, एका सुसरीनें त्यांचा पाय धरून त्यांना पाण्यांत ओढून नेलें. द्रोणांनीं आपल्या शिष्यांना हांका मारिल्या; परंतु आपल्या ह्या भक्ष्यासह पाण्यांत गेलेल्या सुसरीस ठार कसें मारावें, हें न सुचून सर्व राजपुत्र एकमेकांकडे पहात उभे राहिले. परंतु अर्जुनानें आपल्या शब्दवेधित्वाचा उपयोग करून पाण्यांत बाण मारला. त्या बाणानें पाण्यांतील सुसर ठार झाली, पण द्रोणाचार्यांना यत्किंचित्‌हि दुखापत न होतां त्यांचे प्राण वांचले ! अर्जुनाचें असें हस्तकौशल्य पाहून व इतर गोष्टींवरूनहि त्याची योग्यता लक्षांत आल्यानंतर द्रोणाचार्यांनीं त्यास ‘ ब्रह्मशिरस ’ नांवाचें अस्त्र शिकविलें.

भारत कुलांतील राजपुत्रांना याप्रमाणें धनुर्विद्या शिकवीत असतां, निषादांच्या ( भिल्ल, कोळी वगैरे जातींच्या ) राजाचा ‘ एकलव्य ’ नांवाचा एक राजपुत्र द्रोणाचार्यांकडे येऊन ‘ मला धनुर्विद्या शिकवा ’ असें म्हणूं लागला. परंतु धनुर्विद्येचें शिक्षण देतांना अस्त्रें शिकविण्याचे वेळीं मंत्रहि शिकवावे लागतात. तें मंत्र शिकण्यास एकलव्य निषाद असल्यामुळें पात्र नव्हता; म्हणून त्याला धनुर्विद्या शिकविण्याचें त्यांनीं मान्य केलें नाहीं. तेव्हां एकलव्य आपल्या वनांत परत आला; आणि द्रोणाचार्यांची एक मातीची प्रतिमा करून व तिलाच आपला गुरु समजून, तिजजवळ धनुर्विद्येचा अभ्यास करूं लागला. कांहीं दिवसांनीं केवळ आपल्या या गुरुभक्तीच्या व एकानिष्ठेच्या जोरावर तो त्या विद्येंत अत्यंत प्रवीण झाला. एकदां कौरव व पांडव त्या निषादाच्या अरण्यांत शिकारीस गेले असतां त्यांचा शिकारी कुत्रा एकलव्याच्या अंगावर भुंकूं लागला. तेव्हां एकलव्यानें धनुष्य सज्ज करून, भुंकतांना कुत्र्यानें तोंड उघडलें असतां अशा शिताफीनें सात बाण मारिले कीं, ते त्या कुत्र्याच्या तोंडांत, त्यास अगदीं इजा न करतां, बोळ्याप्रमाणें जाऊन बसले; व यामुळें कुत्र्याचें तोंड बंद होऊन त्यास भुंकतां येईनासें झालें ! हें त्याचें हस्तलाघव व धनुर्विद्या शिकण्याची ही रीत पाहून राजपुत्रांना फार कौतुक वाटलें; व त्यांनीं ही हकीकत द्रोणाचार्यांना कळविली. तेव्हां द्रोणाचार्य अर्जुनास बरोबर घेऊन त्या निषाद राजपुत्राकडे आले. त्यानें भक्तिपुरःसर द्रोणांस दंडवत केल्यावर त्यास द्रोणाचार्य म्हणाले:–‘ जर मजला तूं गुरु समजत आहेस व त्यामुळेंच जर तुझी विद्या पूर्ण झाली आहे तर आतां मला गुरु–दक्षिणा दे. ’ द्रोणाचार्य मागतील ती गुरुदक्षिणा देण्याचें एकलव्यानें कबूल केल्यावर द्रोणांनीं गुरुदक्षिणेबद्दल त्याच्या

उजव्या हाताचा अंगठा कापून मागितला;* व तो त्यानेंहि न डगमगतां तात्काळ कापून दिला ! ! ( आदिपर्व अ० १३२, १३३ )

*अद्युनहि भिल्ल वगैरे जंगली लोक जेव्हां धनुष्यास तीर लावून दोरी ओढतात, तेव्हां बाणास अंगठ्याचा स्पर्श न करितां मधलें बोट व अंगठ्या-जवळचे बोट यांनींच तीर ओढतात, ही गोष्ट वरील एकलव्याच्या कथेसंबंधानें लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

आपण शिकविलेली विद्या राजपुत्रांना कशी काय येत आहे, हें भीष्म, धृतराष्ट्र, इत्यादिकांना दाखविण्याचें मनांत आणून द्रोणाचार्यांनीं नगराबाहेर विस्तीर्ण रंगभूमि तयार करविली. राजे लोक, कुंती, गांधारी व इतर राज-स्त्रिया आणि नगरांतील सामान्य जनसमूह या सर्वांसाठीं एक ' प्रेक्षागार ' हि तयार करविलें. नेमलेल्या दिवशीं सर्व लोक जमल्यावर निरनिराळ्या राज-पुत्रांनीं तेथें आपापलें शस्त्रास्त्र-कौशल्य यथाशक्ति दाखविलें; तेव्हां सर्व समाज ' शाबास शाबास ' असा घोष करूं लागला. नंतर भीम व दुर्योधन यांचे-मध्यें गदायुद्ध सुरू झालें. तें कांहीं वेळ चालल्यावर, ते कदाचित् चुरशीनें एकमेकांचा घात करतील असा सुमार दिसल्यामुळें, द्रोणाचार्यांनीं अश्वत्थाम्या-कडून तें युद्ध बंद करविलें. नंतर अंगांत सोन्याचें चिलखत चढवून व

या कथेसंबंधानें आनीबिझांटबाईनीं पुढील आशयाचें लिहिलें आहे:—द्रोणाचार्यांचें हें कृत्य कित्येकांना क्रूरपणाचें वाटणार आहे. परंतु त्यांच्या या कृत्याचे मुळाशीं एक महत्त्वाचा हेतु होता. मनुष्याला जो जन्म प्राप्त होतो, तो त्याचीं पूर्वजन्मांतील कर्में व वासना यांच्या अनुरोधानें प्राप्त होत असतो. त्याचें शरीरहि त्याच्या पूर्व वासना-कर्मांचेंच फळ असतें. द्रोणाचार्य फक्त ब्राह्मण-क्षत्रियांनाच धनुर्विद्या शिकवीत, इतरांना शिकवीत नसत; यांतील हेतु हा होता कीं, ज्यांनीं ज्यांनीं आपल्या अनेक पूर्वजन्मांतील वासना व कर्में उच्च प्रतीचीं ठेविलीं होतीं, व म्हणूनच ज्यांना ब्राह्मण-क्षत्रिय यांचे जन्म प्राप्त झालें होतें, त्यांनाच त्यांच्या त्या उच्च कर्मवासनांबद्दल धनुर्विद्यारूप बक्षीस मिळणें रास्त होतें. एकलव्यास जो निषादाचा जन्म प्राप्त झाला होता, तोहि त्यास त्याच्या पूर्व वासनांमुळेंच प्राप्त झाला होता. त्याच्या पूर्वजन्मांतील वासना व कर्में जर धनुर्विद्या प्राप्त करून घेण्याच्या योग्य-तेचीं नव्हतीं, तर त्यानें ती मिळविण्याची इच्छा करणें रास्त नव्हतें. त्यास

जर ती विद्या हवी होती, तर त्यानें अनेक जन्म ती वासना आपले मनांत दृढ ठेवून व क्षात्रियाचा जन्म येण्यासारखीं कर्मे करून, ती मिळवावयाची होती. परंतु इतके जन्म वाट पहाण्याचे एकलव्यास न आवडून, ज्या विद्येस तो अधिकारी नव्हता ती त्यानें एक प्रकारें बलात्कारानेंच मिळविली ! या त्याच्या शारीरिक पातकाबद्दल शरीरासच शासन करणें अवश्य दिसल्यावरून व बलात्कारानें संपादिलेल्या विद्येमध्यें कांहीं तरी व्यंग ठेवणें योग्य वाटल्यावरून, द्रोणांनीं गुरुदक्षिणा म्हणून त्याच्या हातचा आंगठा कापून मागितला.

धनुष्यबाण घेऊन अर्जुन रंगभूमीवर येतांच प्रेक्षकांनीं हर्षानें जयघोष केला. अर्जुनानें आपलें शस्त्रास्त्र-कौशल्य जनसमूहास दाखविलें. धनुर्विद्येच्या निरनिराळ्या अंगांमध्यें अर्जुनाचें सर्व राजपुत्रांपेक्षां अधिक हस्तकौशल्य दिसून आल्यावरून सर्व लोक त्याचीच विशेष वाहवा करूं लागले. ती ऐकून कुंतीचे डोळ्यांतून आनंदाश्रू वाहूं लागले; दुर्योधनादि कौरवांना अर्जुनाची ही वाहवा ऐकून विषाद वाटला. इतक्यांत रणांगणामध्यें कर्ण उतरला. आणि 'पार्था, धनुर्विद्येचे जे जे चमत्कार तूं करून दाखविलेस ते ते मी तुजपेक्षांहि जास्त कौशल्यानें करून दाखवितों पाहा. आपल्या हस्तलाघवाची उगाच घमेंड मारूं नको' अशा आशयाचें बरेंच गर्वयुक्त भाषण करून, अर्जुनानें शस्त्रास्त्रांचे जे जे प्रयोग करून दाखविले होते, ते ते सर्व त्यानेंहि दाखविले. हें पाहून कौरवांना—विशेषतः दुर्योधनास—बरेंच समाधान झालें. 'रंगभूमीवर अस्त्रकौशल्य दाखविण्यास तुला कोणीहि बोलाविलें नसतां तूं आगांतुकी केलीस' असें अर्जुनानें कर्णास म्हटलें. तेव्हां 'रंगभूमि ही सर्वांस सारखीच आहे; येथें येण्यास हवी त्यास मोकळीक आहे. येथें माझ्याशीं प्रसंग आहे; व्यर्थ बडबड करून येथें कांहीं चालावयाचें नाहीं. तुला जर कांहीं करावयाचें असेल तर तें शब्दांऐवजीं बाणांनींच करून दाखीव' असें कर्णानें उत्तर केलें. नंतर त्या काळच्या युद्धशास्त्राच्या नियमांप्रमाणें अर्जुन व कर्ण यांचें द्वंद्वयुद्ध होण्याचें ठरलें. कृपाचार्यांनीं पुढें होऊन, अर्जुनाचें नांव, कुल व आईबापांचीं नांवें यांचा उच्चार केला; आणि तूंहि आपल्या आईबापांच्या नांवांचा व आपल्या कुलाचा उच्चार कर; हीन कुलांत उत्पन्न झालेल्या व राजा नसलेल्या कोणाहि पुरुषाशीं अर्जुनासारखा राजपुत्र युद्ध करणार नाहीं ! असेंहि त्यांनीं कर्णास धिक्कारानें म्हटलें. तें ऐकतांच दुर्योधन म्हणालाः—'राजांची योग्यता जन्म, शौर्य व सेनानायकत्व या तीन गुणांवरून ठरवावयाची

असते; **केवळ उत्तम कुलांत जन्म झाल्यानेंच योग्यता येत नाहीं.** राजा नसलेल्या क्षत्रियाबरोबर अर्जुनास युद्ध करणें नसेल तर मी आतांच **क**र्णास राजा करतों.' असें म्हणून त्यानें तात्काळ अंग देशाचें राज्य कर्णास देऊन त्यास तेथल्या तेथेंच राज्याभिषेक केला ! तेव्हां आमरणांत **दु**र्योधनाचा पक्ष सोडावयाचा नाहीं, अशी **क**र्णानें शपथ वाहिली. इतक्यांत **क**र्णाचा वृद्ध पिता **आ**धिरथ, हातांतील काठी टेंकीत तेथें आला. त्यास पाहतांच **कर्णा**नें धनुष्यबाण खालीं ठेवून राज्याभिषेकानें ओलें झालेलें आपलें मस्तक **आ**धिरथाचे चरणांवर ठेविलें; आणि त्याचा आशीर्वाद घेऊन तो द्वंद्वयुद्धास सिद्ध झाला ! हें पाहतांच **भीम** पुढें येऊन म्हणाला:--' **कर्णा**, अंग देशाचा राज्यशकट हांकण्याची तुझी योग्यता नाहीं. राजदंड हातीं घेऊन राज्यशकट चालविण्यापेक्षां किंवा धनुष्यबाण घेऊन युद्ध करण्यापेक्षां तूं आपला वडिलोपार्जित चाबूक हातांत घेऊन रथ हांकण्याचेंच काम कर ! ' **भी**माचें हें मर्मभेदक भाषण ऐकून **कर्णा**नें फक्त दीर्घ श्वास सोडून सूर्याकडे पाहिलें. पण दुर्योधनानें प्रत्युत्तर केलें:— **क्षत्रियांचा मुख्य गुण उत्तम कुल हा नसून शौर्य हा आहे.** शस्त्र घेऊन क्षत्रिय पुढें आला असतां त्याशीं युद्ध करणें हें खऱ्या क्षत्रियाचें कर्तव्य आहे. **क**र्णास अंग देशाचें राज्य मीं दिलें, हें कृत्य ज्यास पसंत नसेल त्यानें रथावर आरूढ होऊन व धनुष्य सज्ज करून मजबरोबर युद्ध करण्यास सिद्ध व्हावें ! ' याप्रमाणें हें भांडण विकोपास जाण्याचें बेतांत आलें होतें. परंतु इतक्यांत सूर्य अस्तास गेल्यामुळें तें सर्व जेथल्या तेथेंच राहून सर्व लोक प्रेक्षगारांतून बाहेर पडलें; व भावी भारतीय युद्धाची जणुं काय नांदीच असा हा समारंभ आटोपला. ( आदिपर्व अ० १३४, १३७ )

सर्व शिष्यांचें धनुर्विद्येचें अध्ययन याप्रमाणें पूर्ण झाल्यावर **द्रो**णांनीं त्यांच्नजवळ गुरुदक्षिणा मागितली; ती अशी कीं, त्या सर्वांनीं मिळून पांचाल देशावर स्वारी करावी, व **द्रु**पदराजास जिवंत धरून आणावें. **द्रो**णास ही गुरुदक्षिणा देण्याचा विचार सर्वांना पसंत पडल्यावर, **कौरवपां**डवांना बरोबर घेऊन **द्रो**णाचार्य पांचाल देशाकडे निघाले. प्रथमतः सर्वांनीं मिळून सगळा पांचाल देश पादाक्रांत केल्यानंतर **कौ**रवांनीं त्या देशचे राजधानीवर हल्ला केला. परंतु **द्रु**पदानें सर्व **कौ**रवांचा पराभव करून त्यांना पिटाळून लाविलें. नगरापासून अर्ध कोशावर **पां**डवांचें शिबिर होतें, तेथें **कौ**रव आश्रयास आले. तेव्हां युद्धिष्ठिरखेरीज करून बाकीचे चौघे **पां**डव **द्रु**पदराजावर चाल करून गेले. त्याचें सैन्य बाणांनीं व

अस्त्रांनीं मारीत मारीत अर्जुनानें आपला रथ द्रुपद राजाचे रथास नेऊन भिडविला। प्रथमतः द्रुपदराजाच्या रथाचे घोडे मारून नंतर सारथि, ध्वज व धनुष्य यांचा त्यानें नाश केला. इतकें झाल्यावर अर्जुनानें हातांत तरवार घेऊन द्रुपदाचे रथा-वर उडी घालून त्यास पकडलें; व आपल्या रथावर घालून द्रोणांकडे नेलें. राज्यमदानें धुंद झाला असतांना आपला ज्यानें अपमान केला तो द्रुपदराजा कैद्यासारखा पुढें येऊन उभा राहिल्यावर द्रोण त्यास म्हणाले:—'तुझें सर्व राज्य आणि हें नगर माझ्या या शिष्यांनीं जिंकिलें आहे; आणि आतां तुझा प्राणहि माझे हातीं आला आहे. ' मित्रा ' आतां तुझी काय इच्छा आहे ? याप्रमाणें खोंचदार प्रश्न विचारून व नंतर किंचित् हंसून ते म्हणाले— ' हे वीरा, माझे शिष्य तुझा प्राण घेतील अशी भीति तूं मनांत बाळगूं नको, आम्ही ब्राह्मण क्षमाशील आहों. अग्निवेशाचे आश्रमामध्यें असतांना आपण एके ठिकाणींच खेळलों आहों. व धनुर्विद्या शिकलों आहों; म्हणून माझें तुझ्यावरचें प्रेम पूर्वीप्रमाणेंच कायम आहे. अझुनहि तुझा माझा पूर्वीचा स्नेह कायम असावा, अशी माझी इच्छा आहे. परंतु ' ज्याला राज्य नाहीं तो राजाचा मित्र असूं शकत नाहीं ' असें तूंच म्हटलें असल्यामुळें, तुजपासून जिंकून घेतलेल्या राज्यापैकीं गंगेच्या दक्षिणेकडील अर्धा पांचाल देश मी तुला परत देतों व उत्तरेकडील अर्धा मी आपल्याकडे ठेवितों ! आतां आपण दोघेहि राजे झालों; आतां आपलें सख्य होण्यास कांहीं हरकत नाहीं ! ' हें भाषण ऐकून द्रुपदराजा अतिशय खजिल होऊन कांहींच उत्तर न देतां आपल्या नगरास परत गेला. ( आदिपर्व अ० १३८ )

———

# प्रकरण दुसरें.



## संकटें, त्यांतून सुटका, उत्कर्ष व विवाह.



मागील प्रकरणांत सांगितलेल्या गोष्टी घडल्यानंतर एक वर्षाचे आंतच धृतराष्ट्रानें सर्व भावांत वडील म्हणून युधिष्ठिरास युवराज करून अभिषेक केला. खड्गयुद्ध, रथयुद्ध, विशेषतः गदायुद्ध यामध्यें भीमास दुर्योधनाबरोबरच बलरामाकडून शिक्षण मिळूं लागलें; नकुलहि चित्रयोधी व अतिरथि म्हणून गाजूं लागला, अर्जुन तर धनुर्धरांत अत्यंत श्रेष्ठ, अशी त्याची दिगंतकीर्ति झाली. बलाढ्य सौवीर राजा, पांडूसहि अजिंक्य झालेला यवनाधिपति आणि पाश्चात्य व दाक्षिणात्य राजे पांडवांनीं जिंकिले. याप्रमाणें पांडवांनीं दिग्विजय करून व चोहोंदिशांकडील राजे जिंकून पुष्कळ व बहुमोल कारभार आणला. शौर्य, साहस, पराक्रम इत्यादि गुणांनीं पांडवच श्रेष्ठ होत आहेत व सर्वत्र त्यांचीच वाखाणणी चालली आहे, आणि आपले पुत्र मात्र मागें पडत आहेत, असें पाहून अंधळ्या धृतराष्ट्राचे चित्तास वाईट वाटूं लागलें; व त्याचे मनांत पांडवांविषयीं पापबुद्धि घोळूं लागली. कोणत्या उपायानें आपल्या पुत्रांची वाहवा होईल व महती वाढेल याविषयीं त्याचे मनांत वारंवार विचार चाले, तरी त्यास कांहींच उपाय सुचेना. शेवटीं त्यानें कणिक नांवाच्या कुटिल राजनीतिशास्त्र जाणणाऱ्या ब्राम्हणास बोलावून आणलें; व पांडवांच्या उत्कर्षाचे ओघास खळ पडेल असा उपाय कोणता, असें त्यास एकांतीं विचारलें. तेव्हां कणिकानें धृतराष्ट्रास जो उपदेश केला तो कणिकनीति या नांवानें प्रसिद्ध आहे. पांडवांच्या नाशाचा उपाय विचारिला असतां, बलिष्ठ शत्रूचा निर्बलानें पाडाव कसा करावा हें कणिकानें सांगितलें. तो म्हणालाः— ‘ आपल्या शत्रूंचीं छिद्रें नेहमीं हुडकून काढित असावें; आणि आपले दोष कोणासहि कळणार नाहींत असें आपलें वर्तन काळजीपूर्वक ठेवावें. शत्रूचा नाश करावयाचा तो अर्धवट न करितां, समूळ करावा; नाहीं तर तोच शत्रू अर्धवट काढलेल्या कांट्याप्रमाणें दुःखदायक होतो. जेव्हां आंधळेपणा किंवा बहिरेपणा स्वीकारल्यापासून फायदा आहे असें वाटेल, तेव्हां आंधळें व बहिरें असल्याप्रमाणें वर्तन करावें. पारधी

ज्याप्रमाणें हरिणाचे मनांत विश्वास उत्पन्न करण्यासाठीं धनुर्‍याचें भोंवतीं गवत गुंडाळून व झोंपेचें सोंग घेऊन जमीनीवर दाट-गवतांत पडून राहतात व हरिण जवळ येतांच बाण सोडून त्याचा वध करितात, त्याप्रमाणें शत्रूंशीं वर्तन करावें. प्रसंग पडल्यास शत्रूंशीं सख्यहि करावें; पण तो हातीं येतांच दयामाया न दाखवितां त्याचा समूळ नाश करावा. फळांनीं गजबजलेली झाडाची फांदी एकाद्या आंकडीनें वांकवून जशीं पक्क फळें काढून घेतात, त्याप्रमाणें यज्ञकर्मे, भगवीं वस्त्रें, जटा इत्यादि साधनांनीं लोकांना आपणापुढें नम्र करून मग त्यांना खुशाल लुटावें!

**वहेदमित्रं स्कंधेन यावत्कालस्य पर्ययः ॥**
**ततः प्रत्यागते काले भिन्द्याद्घटमिवाश्मनि॥**

शत्रू शिरजोर होऊन डोक्यावर बसला, तर त्यास तसाच डोक्यावर घेऊन नाचावें; परंतु योग्य वेळ आली म्हणजे डोक्यावरची मातीची घागर दगडावर अपटून जशी फोडून टाकावी, तसें त्या शत्रूस एकदम खालीं झुगारून देऊन जमीनदोस्त करावें ! शत्रूचा नाश करावयाचा तो नुसत्या दंडा (युद्धा) नेंच करूं नये; तर वेळ येईल त्याप्रमाणें साम ( सख्य ), दान ( लांच ) अगर भेद (फितूर) यांचाहि उपयोग करावा. राग आला तरी राग आलासें दाखवूं नये, व जें बोलावयाचें तें हांसत हांसत बोलावें. कारण आपला राग बाहेर दिसल्यास शत्रू सावध होतो. वेळ येईपर्यंत प्रबळ शत्रूपुढें हात जोडावे, शपथा वाहाव्या, गोड गोड भाषणें करावीं, आपलें डोकें त्याच्या पायावर ठेवावें, त्यास आशा दाखवावी, पुढें आल्यास त्यास सामोरें जावें आणि आसन पुढें करावें. आणि याप्रमाणें विश्वास उत्पन्न होतांच योग्य संधि पाहून आपले तीक्ष्ण दांत व नखें त्याच्या शरीरांत खोल रोंवावीं ! ज्या शत्रूचा पाडाव लवकर करावयाचा असेल त्याचें घरास आग लावून त्याचा नायनाट करावा. "शत्रूसंबंधानें नेहमीं आपल्या वाणींत मऊपणा पण हृदयांत कठोरपणा ठेवावा."

**प्रहरिष्यन् प्रियं ब्रूयात् प्रहृत्यैव प्रियोत्तरम् ॥**
**असिनापि शिरश्छित्वा शोचेत च रुदेत च ॥**

शत्रूस प्रहार करण्याचा निश्चय केला तरी त्याशीं गोड बोलावें; प्रहार करितांनासुद्धां गोड बोलावें आणि प्रहार करून त्याचा वध केल्यावरहि, मोठी दया दाखवावी, शोक करावा व रडूंहि लागावें !

**नाच्छित्वा परमर्माणि नाकृत्वा कर्म दारुणम् ॥**
**नाहत्वा मत्स्यघातीव प्राप्नोति महतीं श्रियम् ॥**

सारांश, दुसऱ्याची मर्मस्थानें व छिद्रें माहीत असल्यावांचून, दारुण कर्म केल्यावांचून आणि धीवर लोक मासे धरितात त्या कृतीचें अवलंबन केल्यावांचून केव्हांहि मोठें वैभव प्राप्त होत नाहीं, हें तत्त्व सदा लक्षांत बाळगावें, ' याप्रमाणें कुटिल नीतीचा उपदेश करून शेवटीं कणिकानें धृतराष्ट्रास एक कल्पित गोष्ट सांगितली, ती अशी:–' एका वनांत कोल्हा, वाघ, उंदीर, लांडगा आणि मुंगूस हे मोठ्या मैत्रीनें रहात होते. त्यांनीं एके दिवशीं एक पुष्ट काळवीट पाहून त्यास ठार मारण्याचें ठरविलें. कोल्होबांनीं सुचविलेल्या युक्तीप्रमाणें, काळवीट निजला असतां उंदरानें त्याचे खूर कुरतडले ! यामुळें त्यास पळतां येईनासें होतांच वाघानें त्यास ठार केले. नंतर त्याचे मांसावर ताव मारण्यापूर्वी सर्वांना नदीवर स्नानास जाण्यास सांगून कोल्होबा प्रेताचें रक्षण करीत बसला. नदीवरून वाघोबाची स्वारी प्रथमतः तेथें आली; त्यास कोल्हा म्हणालाः–" मघां उंदीर असें म्हणत होता कीं, ' एवढा वाघ, पण त्याचे अंगांत काळविटाचा सारखा पाठलाग करून त्यास ठार मारण्याचें सामर्थ्य नाहीं. त्याचे खूर मीं कुरतुडलें तेव्हांच त्याला ठार मारतां आलें. आज माझ्या बाहुबळानें मिळविलेलें मांस खाऊन वाघोबा व माझे इतर स्नेही तृप्त होणार ! ' असें मोठ्या आढ्यतेनें उंदीर म्हणाल्यामुळें मला हें मांस खाऊं नयेसें वाटतें आहे. " हें ऐकून मानी वाघ स्वसामर्थ्यानें भक्ष्य मिळविण्यास चालतां झाला ! नंतर नदीवरून स्नान करून उंदीरमामांची स्वारी आली; त्यास कोल्हा म्हणाला:–" काळविटाचें मांस विषारी असल्यामुळें, तें कांहीं आपण खाणार नाहीं. आज आपण आपली क्षुधा उंदरालाच खाऊन भागविणार. ' असें आतांच मुंगूस म्हणत होतें. हें मी आपलें तुला आधींच कळवून ठेवतों, आतां तुला आपला जीव बचावण्याची काय तजवीज करावयाची असेल ती कर. " हें ऐकून उंदीर पळून जाऊन बिळांत लपून बसला ! नंतर लांडगा आला; त्यास कोल्हा म्हणाला:–' वाघोबाची स्वारी फार रागावली आहे. तो हें मांस खाण्यासाठीं आपल्या वाघिणीस आणावयास गेला आहे. तेव्हां तो यावयाचे आधींच आपण पलायन करावें हें बरें ! ' हें ऐकून कोल्ह्यानें सांगितलेल्या मार्गाचेंच लांडग्यानें अवलंबन केलें ! शेवटीं मुंगूस तेथें आलें; त्यास कोल्हा मोठ्या ऐटीनें म्हणतो:–' उंदीर लांडगा व वाघ यांशीं युद्ध करून मीं त्यांना जिंकून पळवून लाविलें आहे. तुला जर हें मांस पाहिजे असेल तर आधीं माझ्याशीं युद्ध कर. ' अत्यंत बलवान् वाघ, क्रूर लांडगा आणि चपळ व लबाड

उंदीर यांसाहि ज्यानें जिंकिलें त्यापुढें आपला निभाव लागणार नाहीं; असें वाटून मुंगूसहि तेथून चालतें झालें. नंतर कोल्ह्यानें तें मांस एकट्यानेंच यथेच्छ भक्षण केलें! सारांश, **जसा शत्रू भेटेल तसें वर्तन करावें** म्हणजे कोल्ह्याप्रमाणें यशःप्राप्ति होते.' ( आदिपर्व अ० १३९, १४० )

पांडवांचें वैभव व सामर्थ्य जसजसें दिवसेंदिवस वाढत चाललें, तसतसा दुर्योधनादिकांचे मनांत पांडवांविषयींचा द्वेषाग्नि अधिकाधिकच भडकत चालला. विचित्रवीर्याचे धृतराष्ट्र, पांडु व विदुर हे तीन पुत्र होते. विदुर दासीपुत्र म्हणून त्यास तर राज्य मिळावयाचेंच नव्हतें. बाकी उरलेल्या दोघांपैकीं धृतराष्ट्र जन्मांध म्हणून पांडूला राज्य मिळालें होतें; धृतराष्ट्र अंधळा नसतां तर, तो वडील भाऊ असल्यामुळें, त्यासच राज्य मिळालें असतें; व त्याचे मागून क्रमानें पुढें दुर्योधनास मिळून त्याची अनावर राज्यतृष्णा भागली असती. परंतु धृतराष्ट्राचा अंधळेपणा आड आल्यामुळें धाकट्या चुलत्याच्याच मुलांना राज्य मिळून, राजकुलांत उत्पन्न होऊनहि दुर्योधनास सामान्य क्षत्रियाप्रमाणें रहावें लागणार होतें; व त्याप्रमाणें कांहीं गोष्टी घडूनहि येऊं लागल्या होत्या. धृतराष्ट्रानें युधिष्ठिरासच युवराज केलें; व इतर पांडवांनीं दिग्विजय करून त्याची कीर्ति चोहोंकडे पसरली. धर्माचा दयाळूपणा व न्यायबुद्धि आणि भीमार्जुनांचें सामर्थ्य व पराक्रम यांबद्दल लोकांत दहावा होऊन धर्मच आपला राजा व्हावा असें ते उघड उघड बोलूं लागले! याप्रमाणें राज्यलक्ष्मी पांडवांनाच वरणार व आपण मात्र राज्यहीन राहून मागें पडणार! अशा प्रकारचे विचार दुर्योधनाचे मनांत वारंवार घोळूं लागून दुःखानें त्याचें चित्त पोळून गेलें. या दुःखाचा परिहार त्यास न्यायाच्या उपायांनीं करितां आला असता पितृपरंपरागत राज्याचे कौरवपांडव सारखेच मालक आहेत, म्हणून उभयतांनीं राज्याची अर्धी वांटणी करून घ्यावी, हा न्याय्य उपाय सहज योजतां आला असता. परंतु "आपल्या दुःस्थितीविषयीं दुष्टांस तीजकें दुःख होतें तितकाच त्यांस सज्जनांच्या सुस्थितीबद्दल मत्सर वाटत असतो." दुर्योधनास सगळें राज्य बळकावयास हवें होतें. यासाठीं कोणत्या तरी उपायानें पांडवांना हस्तिनापुरांतून बाहेर पाठवून, आपण कांहीं दिवस राज्य आपलें हातीं घ्यावें; आणि मंत्री व इतर अधिकारी लोक अनुकूल करून घेऊन आपलीं पाळेंमुळें खोल रुजवावीं; मग जरी पांडव परत आले तरी त्यांना आपणांपासून राज्य हरण करतां येणार नाहीं; असा दुर्योधन, कर्ण, शकुनि व दुःशासन या चौकडीनें आपसांत विचार केला!

नंतर प्रसंग पाहून दुर्योधनानें आपलें मनोगत धृतराष्ट्रास सांगितलें. ' पितृपरंपरा क्रमानें राज्याचे तुम्हीच खरे वारस आहां. पण केवळ तुमचे जन्मांधपणामुळें-राज्य पांडूकडे गेलें. वास्तविक तेवढ्यानें राज्यावरील आमचा हक्क नाहींसा होत नाहीं पण पांडूकडे गेलेलें राज्य त्याचेमागून परत आमचेकडे न येतां, पांडव पराक्रमी व शूर असल्यामुळें व प्रजाजनांचा ओढा त्यांचेकडे असल्यामुळें, त्यांसच मिळणार; आणि आम्ही राजकुलोत्पन्न असूनहि पराधीन बनणार. हा प्रसंग आम्हां शंभर भावावर–तुमच्या शंभर लेंकरांवर–येणार नाहीं, अशी कांहीं तजवीज करा.' असें दुर्योधनानें धृतराष्ट्रापाशीं बोलणें चालविलें. आपणांस व आपल्या पुत्रांस राज्य नाहीं हें पाहून धृतराष्ट्राचें मनांत आधींच कपट आलें होतें; परंतु पांडव शूर व सद्गुणी असून न्यायानें राज्य त्यांचेंच असल्यामुळें त्यांच्याविषयींचा द्वेष त्यानें उघडपणें व्यक्त केला नव्हता. शेवटीं दुर्योधन, कर्ण, दुःशासन शकुनि व धृतराष्ट्र यांचें खलबत होऊन दुर्योधनानें आपले कांहीं लोभी मंत्री द्रव्यानें वश करून घेतले व पांडवांजवळ जाऊन ' वारणावत नगरांत महादेवाचा मोठा उत्सव होणार आहे; तो देश व ते नगर पाहण्यासारखें आहे ' इत्यादि गोष्टी काढण्यास त्यांना सांगितलें. धृतराष्ट्रानेंहि तो उत्सव पाहण्यास पांडवांनीं कुंतीसह जावें, अशी आपली इच्छा दर्शविली. यांत कांहीं तरी कपट असावे, असा संशय युधिष्ठिराचे मनांत आल्यावांचून राहिला नाहीं; तथापि धृतराष्ट्र कसाहि असला तरी **वडिलांच्या आज्ञेप्रमाणें वागलें पाहिजे, मग त्यामुळें आपलें कांहीं होवो**, असा विचार करून उत्सवाला जाण्याचें त्यानें कबूल केलें, पांडव तिकडे जाणार असें समजतांच दुर्योधनानें आपला विश्वासू मंत्री पुरोचन यास बोलावून आणिलें आणि पांडव येण्यापूर्वी वारणावतास जाऊन तेथें त्यांच्यासाठीं, ' लवकर पेट घेणारीं लांकडें व इतर द्रव्यें यांचा वाडा तयार करून राळ, लाख इत्यादि ज्वालाग्राहि पदार्थांच्या भिंती बांधीव; व पांडव तेथें राहूं लागल्यावर त्यांना न समजतां रात्रीं वाड्यास सर्वत्र आग लाव ' अशी त्यास आज्ञा केली ! दुष्टबुद्धि पुरोचनानें हें सर्व कबूल केलें; व गाढवांचे रथांत बसून पांडवांचे आधीं वारणावतास जाऊन दुर्योधनानें सांगितल्याप्रमाणें त्यानें वाडा तयार करून ठेविला.

इकडे आपली आई कुंती व भाऊ यांसह युधिष्ठिरही, भीष्म वगैरे वडील माणसांचा निरोप घेऊन वारणावतास जाण्यास निघाला. दुर्योधन पुरोचन यांचा दुष्टपणाचा बेत विदुरास समजून आला होता. युधिष्ठिरास पोचवून परत फिरण्यापूर्वीं

विदुरानें म्लेंच्छ भाषेंत " अलोह (बिनलोखंडाच्या) शस्त्राविषयीं सावध रहा आणि वननाशक व हिमनाशक अशा पदार्थां ( अग्नि ) पासून कोल्ह्याप्रमाणें ( जमीनींतून बिळें करून ) आपलें रक्षण करून घ्या" असें सुचविलें. यांवर धर्मानेंहि त्याच भाषेंत ' समजलें ' असें उत्तर दिलें; आणि ही सर्व हकीकत कुंती व आपले भाऊ यांना सांगून नेहमीं सावध राहण्याविषयीं त्यांस ताकीद दिली, कांहीं दिवस वाट चालल्यावर ते सर्व वारणावतास येऊन पोंचले; पुरोचनानें तयार वाड्यांत राहूं लागले. प्रसंग पडल्यास रात्रींहि अरण्यांतील वाटा सांपडाव्या म्हणून शिकारीच्या निमित्तानें ते दररोज वनांतून हिंडूं लागले. पुढें कांहीं दिवसांनीं लाक्षागृहांतून बाहेर निघून जातां यावें म्हणून एक विवर खणण्यासाठीं विदुरानें आपला विश्वासू खनक ( खणणारा ) पांडवांकडे पाठविला. पांडवांनीं त्याजकडून वाड्याचे मध्यभागीं एक चांगलें मोठें विवर तयार करवून तें पोखरीत नेत नेत त्याचे दुसरें तोंड अरण्यांत नेऊन पोंचविलें; आणि वाड्यांतील हें द्वार कोणास कळूं नये म्हणून दक्षतेनें बंद करून टाकिलें. याप्रमाणें सावधपणानें व बंदोबस्तानें त्या वाड्यामध्यें पांडव सरासरी एक वर्षभर राहिले. आतां पांडव बेसावध आहेत व आपलें काम करण्यास हाच समय चांगला आहे, असें पाहून पुरोचन त्या वाड्यास लवकरच आग लावणार होता. पण " परमेश्वर सज्जनांचा पाठीराखा असतो व तो **त्यांस संकटांतून मुक्त करितो**, हें त्या बिचाऱ्यास काय माहीत ? पांडवांनीं त्याचीच युक्ति त्याचे गळ्यांत घातली ! एका कृष्णपक्षांतील चतुर्दशीचे दिवशीं कुंतीनें ब्राह्मणभोजन घातलें असतां त्या वेळीं एक निषादी ( भिल्लीण ) आपल्या पांच मुलांसह तेथें आली. हीं सहा माणसें अतिशय दारू पिऊन व धुंद होऊन त्या रात्रीं त्या वाड्यांतच निजलीं; पण ही गोष्ट भीमसेनास ठाऊक नव्हती. त्या दिवशीं सभोंवार गर्द काळोख पडून चोहोंकडे सामसूम झाल्यावर मध्यरात्रीचे सुमारास भीमसेनानें दरवाजाजवळच्या ज्या आयुधागारांत ( शस्त्रें ठेवण्याची जागा ) दुष्ट पुरोचन गाढ निजला होता त्यालाच प्रथमतः बत्ती लावून नंतर सर्व वाड्यास इतर ठिकाणींहि आगी लाविल्या ! नंतर विवराचें द्वार उघडून त्यांतून आपले भाऊ व कुंती यांना घेऊन भीमसेन अरण्यांतील दुसऱ्या द्वारानें निघून बाहेर पडला. रातोरात जलदीनें वाट चालून ते गंगानदीजवळ येऊन पोंचले. त्या ठिकाणीं विदुरानें आपल्या एका विश्वासू कोळ्याकडून नांव तयार ठेविली होती. तींत बसून ते पैल तीरास गेले; व पुन्हां रात्रींच झपाट्यानें वाट चालूं

लागले. इकडे पांडवांच्या राहत्या वाड्यास आग लागलेली पाहून वारणावतांतील नागरिक धांवून आले. कोणत्या तरी निमित्तानें पांडवांना हस्तिनापुरांतून बाहेर पाठवून देण्यांत धृतराष्ट्राचा कांहीं तरी दुष्ट हेतु असावा, असें त्याच वेळीं लोकांना वाटलें होतें. आतां तर ज्या वाड्यांत ते रहात होते त्यासच आग लागलेली पाहून कौरवांच्या दुष्टपणाविषयीं सर्वांची खात्री झाली. दुसरे दिवशीं आग विझल्यावर तेथें पुरोचन, व एक स्त्री आणि पांच पुरुष यांचीं प्रेतें सांपडलीं. तीं कुंती-पांडवांचींच आहेत असें वाटून सर्व लोकांस अत्यंत दुःख झालें. हें वर्तमान हस्तिनापुरास समजतांच कणिक गुरूच्या उपदेशाप्रमाणें धृतराष्ट्र-दुर्योधनादिकांनीं पुष्कळ शोक केला; आणि कुंती व पांडव यांच्या राजकुलास शोभेल अशी त्यांची उत्तरक्रिया केली. विदुरास मात्र खरी हकीकत माहीत असल्यामुळें, त्यानें विशेष शोक न करितां इतरांबरोबर थोडेंसें दुःख झालेंसें दाखविलें !

इकडे कुंती व पांडव यांना बरोबर घेऊन भीमसेन अरण्यांतून मार्गक्रमण करीत असतां, एके दिवशीं कुंतीला फार तहान लागली. तेव्हां त्या सर्वांना एका वडाचे झाडाखालीं उतरून भीम पाण्याचा शोध करीत हिंडूं लागला. पाणी सांपडल्यावर तें पिऊन आणि आपल्या भावाकरितां व मातेकरितां थोडेंसें वस्त्राचे पिळ्यांतून घेऊन तो परत आला. परंतु तो यावयाचे आधींच श्रमामुळें पांडवांना व कुंतीला झोंप लागली होती. कुंतीसारख्या राजस्त्रीला व पांडवांसारख्या राजपुत्रांना अरण्यामध्यें झाडाखालीं जमिनीवर निजण्याची पाळी कपटी, राज्यलोभी व दुष्ट कौरवांनीं आणलेली पाहून भीमसेनास फारच वाईट वाटलें. या दुःखदायक विचारामुळें त्यास झोंप येईना; म्हणून तो त्यांचेजवळच जागत बसला. अरण्यामध्यें हिडिंब नांवाचा एक नरमांसभक्षक क्रूर राक्षस आपल्या बहिणीसह रहात होता. वनांत येऊन पांडव विश्रांति घेत असतां त्या राक्षसाला मनुष्याचा वास येऊन त्याचे तोंडास पाणी सुटलें. वडाच्या झाडाखालीं कोण व किती मनुष्यें बसलीं आहेत तें पाहून येण्यास त्यानें हिडिंबेला पाठविलें. पण तेथें येऊन भीमाचें तें शरीर व सौंदर्य पहातांच ती तात्काळ मोहित होऊन गेली; आणि मनोहर रूप करून व आपल्या भावांचा दुष्ट हेतू भीमाला कळवून ती म्हणाली:—‘ माझें मन तुम्हांवर बसलें आहे; माझ्या भावापासून तुम्हां सर्वांचें संरक्षण करण्यासाठीं, तुमची इच्छा असल्यास, तुम्हां सर्वांना पाठीवर घेऊन मी अंतरिक्षांत निघून जातें. ’ परंतु झोंपीं गेलेल्या आपल्या आईला व भावांना जागे करण्याचें व जिवाचे आशेनें भिऊन पळून जाण्याचें त्या

सद्गुणी व शूर भीमसेनास मुळींच पसंत पडलें नाहीं. इकडे आपल्या बहिणीस यावयास उशीर लागलेला पाहून हिडिंब राक्षस स्वतःच तेथें आला; तो त्यानें आपल्या बहिणीचें वरील बोलणें ऐकिलें. आपली बहीण राक्षसी असून मनुष्यास वश होत आहे, असें पाहून संतापून जाऊन तो आधीं तिलाच ठार मारण्यासाठीं तिचे अंगावर धांवून गेला. इतक्यांत, प्रेमानें वेडावलेल्या परंतु निरपराधी अशा स्त्रीला–बहिणीला–ठार मारण्यास सरसावल्याबद्दल हिडिंबाची भीमानें निर्भर्त्सना केली; आणि नरमांस–भक्षणास सवकलेल्या ह्या राक्षसाचा कांटा उपटून टाकून तें वन भोंवतालचा प्रदेश निर्भय करण्याची आलेली ही सुसंधि साधण्याचा निश्चय करून भीमसेनानें बहिणीवर उगारलेला त्याचा हात धरिला व लागलीच दोघांचें आवेशानें बाहुयुद्ध सुरू झालें ! तें बराच वेळ चालल्यावर त्या गलबल्यानें कुंती व पांडव जागे झाले; व पहातात तों एक अत्यंत सुस्वरूप स्त्री आपल्या पुढें उभी असलेली त्यांस दिसली ! कुंतीने विचारल्यावरून तिनें आपली सर्व हकीकत सांगून भीम व हिडिंब यांचें बाहुयुद्ध चालू असल्याचें त्यांस कळविलें. तें ऐकतांच चौघे पांडव युद्ध चालू होतें तिकडे गेले. " संध्याकाळसारख्या रौद्रमुहुर्ताचे वेळीं राक्षस अधिक प्रबल होतात; तेव्हां त्या वेळेच्या आधींच या राक्षसास ठार कर " असें अर्जुनानें भीमास सुचविलें. तेव्हां भीमसेनानें राक्षसास एकदम वर उचलून व वेगानें गरगर फिरवून जोरानें जमिनीवर आपटलें ! तेव्हां तो राक्षस ' आर्द्र ( पाण्यानें भिजलेल्या ) दुंदुभी ' प्रमाणें दुःखानें आरोळी ठोकून मरण पावला.

**निर्बल मनुष्यांना छळणारे क्रूर पुरुष जेव्हां फार प्रबल होतात, तेव्हां त्यांचा संहार करून पृथ्वीचा भार हलका करण्यासाठीं परमेश्वर भीमसेनासारखीं शक्तिमान् व दुर्बलांना सहाय्य करणारीं माणसें उत्पन्न करितो** " भीमसेनाचे हातून हिडिंबासारखे आणखी पुष्कळ राक्षस यमसदनीं जावयाचे होते, व या सत्कार्याचा ' श्रीगणेशायनमः ' च त्यानें हिडिंबास ठार मारून केला ! असो, राक्षसांची जात मायावी व दीर्घद्वेषी असते, असें मनांत आणून भीमसेन हिडिंबेलाहि तिच्या भावाचे मागोमाग यमलोकीं पाठविणार होता. परंतु हिडिंबराक्षसास ठार मारणाऱ्या भीमाला हिडिंबेची भीति बाळगावयास नको, त्यांतूनहि स्त्रीहत्या करणें योग्य नव्हे, असें युधिष्ठिरानें त्यास सांगितलें. राक्षसीनेंहि कुंतीची अत्यंत दीनवाणीनें विनवणी केल्यामुळें, तिनेंहि तिला जिवंत ठेवावी असें भीमाला

सांगितलें. भीमाविषयींचें आपलें मनोगत तिनें कुंतीस पुर्वीच कळविलें होतें. तेव्हां सर्वांचें विचारानें, ' संध्याकाळ होईपर्यंत तिनें भीमास हवें तेथें घेऊन जावें; परंतु रात्रीं त्याला पांडवांजवळ आणून पोंचवावें ' असें ठरलें. तिला पुत्र होईपर्यंतच तिजशीं असला संबंध ठेवण्याची आपली अट भीमानेंहि तिला कळविली. या दोन्ही अटी मान्य करून हिडिंबा त्या दिवसापासून दिवसा भीमाला वनांतील रम्यस्थानीं घेऊन जात असे; आणि रात्रीं त्यास कुंती व पांडव असत तेथें पोंचवीत असे. याप्रमाणें कांहीं दिवस लोटल्यानंतर, तिला एक मुलगा झाला. त्याचें नांव तिनें ' घटोत्कच ' असें ठेविलें. यानंतर पांडवांनीं जटावल्कलें धारण करून तपस्व्यांचा वेष घेतला; आणि मत्स्य, त्रिगर्त, पांचाल, कीचक इत्यादि देशांतून ते प्रवास करीत चालले. प्रवासांत फावल्या-वेळीं ते उपनिषदें व वेदांगें यांचें अध्ययन करीत. पुढें भगवान् व्यासानीं येऊन त्यांस दर्शन दिलें. ' या वनवासापासून तुमचें कल्याणच होणार आहे; सर्व संकटांतून मुक्त होऊन धर्मराजा पृथ्वीपति होईल, असा आशीर्वाद देऊन त्यांनीं कुंतीचें व पांडवांचें समाधान केलें. नंतर जवळच्या एकचक्रा नांवाच्या नगरीमध्यें त्यांस नेऊन व्यासानीं एक ब्राह्मणाचें घर दाखविलें व तेथें एक महिनाभर त्यांस राहण्यास सांगून, ते आपल्या आश्रमास परत गेले. ( आदिपर्व अ० १५२-१५६ )

एकचक्रा नगरीमध्यें ब्राह्मणाचें घरीं राहत असतां, पांडव दिवसा भिक्षा मागून आणीत; आणि संध्याकाळीं कुंती तें अन्न सर्वांना वांटून देई. भिक्षेचा अर्धा भाग भीमसेनास देऊन बाकीच्या अर्ध्यांत चौघे पांडव व कुंती आपला निर्वाह करी. एके दिवशीं तिसरें प्रहरीं भीमसेन व कुंती हीं घरांतच राहिलीं होतीं; व चौघे पांडव भिक्षा मागण्यास नगरांत गेले होते. त्या वेळीं ब्राह्मणाच्या घरांत एकाएकीं रडण्याचा आर्त स्वर ऐकूं आला. कुंतीनें त्याविषयीं विचारपूस केल्यावर तिला असें कळलें कीं, त्या नगरीजवळच्या अरण्यामध्यें बकासुर नांवाचा एक राक्षस राहत असून तो त्या नगरास व भोंवतालच्या प्रदेशास फार त्रास देत असल्यामुळें वीस खोरी तांदुळाचा भात, दोन रेडे व एक मनुष्य इतकें अन्न त्यास रोज नियमितपणें देण्याचें नागरिकांनीं कबूल केलें होतें. राक्ष-साला हें अन्न देण्याची पाळी रोज एका घरावर येत असे; ती जो कोणी चुकवूं पाहील त्याचा तो राक्षस समूळ नाश करी ! दुसऱ्या दिवसाची पाळी त्या ब्राह्मणाचे घरावर आली असल्यामुळें राक्षसाचे भक्ष्यस्थानीं कोणी पडावें, या-

विषयीं त्या गरीब व सात्त्विक ब्राम्हणाचे कुटुंबांत वाटाघाट चालली होती. तो ब्राम्हण, त्याची बायको व एक मुलगी अशीं तीनच मोठीं माणसें त्या कुटुंबांत होतीं, प्रत्येकजण ' मीं मरण्यास तयार आहे, तुम्हींच जिवंत राहणें योग्य आहे ' असें म्हणून आपल्या म्हणण्याचें समर्थन करीत होता. तीं तीन माणसें याप्रमाणें बोलत व अश्रु ढाळीत बसलीं असतां त्या ब्राम्हणाचा एक लहान मुलगा हातांत गवताची काडी घेऊन आला; व मी आतां त्या राक्षसाला या तरवारीनें ठार करितों, तुम्ही रडूं नका ' असें बोबड्या शब्दानें म्हणत आईबापांची व बहिणींची समजूत करूं लागला ! राक्षसाकडून येणारें भयंकर मरण जरी प्रत्येकाचे डोळ्यांसमोर मूर्तिमंत उभें होतें, तरी त्या मुलाचें तें बोबडें भाषण ऐकून त्यांना तशा वेळींहि अभिमान, हर्ष व कौतुक वाटलें. तो ब्राह्मण दरिद्री असल्यामुळें २० खोरी भात तयार करण्याचेंहि त्यास सामर्थ्य नव्हतें, मग एकादा दास विकत घेऊन राक्षसाकडे पाठविण्याइतकें द्रव्य त्याजजवळ कोठून असणार ? राक्षसाची ही हकीकत ऐकून ' त्याजकडे अन्न घेऊन जाण्यास मी आपला पुत्र भीमसेन याला पाठवितें, असें कुंती म्हणूं लागली. परंतु आपल्या घरीं चार दिवस पाहुणे म्हणून राहिलेल्या ब्राह्मणाला आपल्याबद्दल मरण्यासाठीं राक्षसाकडे पाठविण्यास तो सात्त्विक ब्राह्मण कबूल होईना. ' माझा पुत्र मंत्रविद्या जाणणारा आहे, त्यानें पूर्वी पुष्कळ राक्षस मारिले आहेत; यालाहि तो आपल्या मंत्रसामर्थ्यानें ठार मारील ' असें अनेक प्रकारें सांगून कुंतीनें शेवटीं त्या ब्राह्मणाचें मन वळविलें; व दुसरे दिवशीं राक्षसाकडे भीमसेनास पाठविण्याचें ठरलें. भिक्षा मागून चौघे पांडव घरीं आल्यावर त्यांना ही हकीकत समजली. तेव्हां, दुसऱ्याचा जीव वांचविण्यासाठीं आपल्या मुलाला बळि देण्याचें साहस केल्याबद्दल धर्मानें कुंतीस पुष्कळ दोष दिला. परंतु ' **क्षत्रियाचें कर्तव्य काय, प्राणाची पर्वा कोणत्या बाबतींत व केव्हां करावयाची, परोपकार करतांना क्षत्रियानें किती निर्धार करावा लागतो, हे ती धर्मापेक्षां अधिक चांगलें जाणत होती.** ' भीमाच्या अतुल बलाची स्तुति करून कुंती म्हणाली:— ' आपण या ब्राह्मणाचे घरीं आज इतके दिवस राहिलों आहों, तर त्याचें संरक्षण आपणांस केलेंच पाहिजे. शिवाय ' **लोकांना संकटांतून मुक्त करणें हें क्षत्रियाचें कर्तव्यच आहे; तें करण्यास आपल्या जीवाकडे न पाहतां आपण तयार असले पाहिजे.**' यावर धर्मानें तिला विशेष कांहीं म्हटलें नाहीं.



‘ मी आतां त्या राक्षसाला या तरवारीनं ठार करतो. ’ [ पृ ३४

दुसरे दिवशीं पहांट होतांच वीस खोरी भात एका गाडीवर घालून व तिला दोन रेडे जुंपून, तींत बसून भीमसेन राक्षसाच्या वनामध्यें गेला. त्यास आधीं बऱ्याच हाका मारून राक्षसासाठीं नेलेल्या अन्नाची सकाळची न्याहारी करण्यास भीमसेनानें प्रारंभ केला ! गाडीबरोबर आलेला मनुष्य नेहमींप्रमाणें भीतीनें मृतप्राय न होतां आपणासाठीं आणलेलें अन्न स्वतःच खात बसला आहे, असें पाहून तो राक्षस फारच रागावला; व मोठमोठ्या आरोळ्या ठोकीतच तेथें आला. त्याच्या त्या गर्जनेकडे मुळींच लक्ष न देतां भीमानें त्याजकडे पाठ करून भातावर ताव मारण्याचें काम तसेंच चालविलें ! हें पाहून तर राक्षसास पराकाष्ठेचा क्रोध येऊन, त्यानें भीमाचे पाठीवर सारखे मुष्टिप्रहार केले. परंतु न्याहारी संपेपर्यंत भमानें तिकडे फारसें लक्ष्य दिलें नाहीं ! नंतर तो राक्षस एक झाड उपटून घेऊन भमाकडे वेगानें धांवून येऊं लागला. इतक्यांत ही आपली सकाळची न्याहारी आटपून, हाततोंड धुवून व ढेंकर देऊन भीमसेनाची स्वारी युद्धास सिद्ध झाली! दोघांचें बराच वेळ वृक्ष व शिला यांनीं भयंकर युद्ध होऊन शेवटीं, भीमानें त्या राक्षसास जमिनीवर पालथें पाडलें. नंतर आपला उजवा हात त्याचे गळ्याखालीं घालून व डाव्या हातानें त्याचा कमरपट्टा धरून भीमानें त्याचे पाठीवर गुडघा रोंविला; व दोन्ही हातांनी दुमडून त्याचें शरीराची घडी केली ! नंतर भीमसेनानें तें प्रेत ओढीत आणून नगराच्या वेशींत आडवें ठेवलें; व कोणास न कळत लोक जागे होण्यापूर्वींच तो आपल्या बिऱ्हाडी परत आला. सकाळीं राक्षसाचें तें भयंकर प्रेत वेशींत पडलेलें पाहून सर्व लोकांना अतिशय आश्चर्य वाटलें व आनंद झाला. या राक्षसास कोणी मारलें असावें याचा शोध करण्यासाठीं कांहीं लोक त्या ब्राह्मणाकडे येऊन चौकशी करूं लागले. तेव्हां 'कोणा एका सिद्ध पुरुषानें येऊन आजचें अन्न नेलें होतें; त्यानें तो राक्षस मारिला असेल असें उत्तर देऊन पांडवांच्या यजमानानें त्यांना वाटेस लाविलें. भीमाच्या या कृत्यामुळें आसपासच्या त्या राक्षसांच्या जातीमध्यें इतकी दहशत उत्पन्न झाली कीं, त्या दिवसापासून नरमांसभक्षणाचें क्रूर कर्म त्यांनीं अगदीं सोडून दिलें. ( आदिपर्व अ० १५७–१६४ )

एकचक्रा नगरीमध्यें कांहीं काळ राहिल्यानंतर एके दिवशीं पांडवांचे घरीं एक पांथस्थ ब्राह्मण आला. त्याचे सांगण्यावरून पांचाल देशाची राजकन्या द्रौपदी हिचें स्वयंवर होणार आहे, असें पांडवांना समजलें. द्रुपदराजास धृष्टद्युम्न पुत्र व द्रौपदी कन्या कशीं झालीं, याविषयींची पुढील कथा त्या ब्राह्मणानें

पांडवांस सांगितली:-' द्रोणाचार्यांनीं द्रुपदराजास जिंकून त्याचें अर्धें राज्य घेतल्यामुळें त्याचें मन फार उद्विग्न झालें, व द्रोणाचार्यांचा वध करून सूड उगविणारा पुत्र आपणांस कसा होईल, या विवंचनेंत तो पडला. असा पुत्र होण्यासाठीं काय उपाय करावा, असें सर्व ब्राह्मणांना विचारीत तो चोहोंकडे हिंडूं लागला. ' उपजाय ' नांवाच्या ऋषीची याच हेतूनें त्यानें वर्षभर सेवा केली. त्यानें त्यास आपला भाऊ जो ' याज ' त्याजकडे पाठविलें. याजानें त्यास पुत्रकामेष्टि यज्ञ करावयास सांगितलें. त्याप्रमाणें द्रुपदानें हा यज्ञ याजाचेच हातून करण्यास प्रारंभ केला. त्या वेळीं यज्ञामध्यें तयार केलेल्या हविर्भागाचें सेवन करण्यास याजानें द्रुपदाचे राणीस बोलाविलें; पण तेव्हां तिनें स्नान वगैरे केलें नसल्यामुळें ती वेळेवर आली नाहीं. इकडे याजानें राणी येत नाहीं असें पाहून, तो हविर्भाग अग्नीसच अर्पण केला. तों खड्ग, कवच व धनुष्य धारण केलेला कुमार रथावर आरूढ होऊन अग्नींतून बाहेर पडला ! आणि वेदीमधूनहि एक काळीसांवळी पण अत्यंत सुंदर कन्या प्रकट झाली ! त्यावेळीं ' ही सर्व स्त्रियांहून श्रेष्ठ होऊन हिचेमुळें सर्व कौरवांचा व क्षत्रियांचा नाश होईल; आणि या मुलाचे हातून द्रोणाचार्यांचा वध होईल ' अशी आकाशवाणी झाली. कुमाराचें नांव " धृष्टद्युम्न " व मुलीचें " कृष्णा " असें ठेवलें. " ब्राह्मणाच्या या भाषणावरून व द्रौपदीचें स्वयंवर होणार असें ऐकून तिकडे आपण जावें असें पांडवांचे मनांत आलें. व्यासांनींहि तेथें येऊन द्रौपदीच्या पूर्वजन्माची हकीकत त्यांना सांगितली. ते म्हणाले:-' पूर्वी एका ऋषीला एक सुस्वरूप कन्या होती. परंतु दुर्दैवानें तिला नवरा न मिळाल्यामुळें तिचें लग्न झालें नाहीं; म्हणून तिनें तप करून शंकरास प्रसन्न केलें. वर मागतांना ' पतिं देहि ' ( नवरा द्या ) असें ती पांचदां म्हणाली. तेव्हां ' तुला पुढच्या जन्मीं पांच पति होतील ' असा शंकरांनीं वर दिला. तीच कन्या सांप्रत द्रुपदराजाचे यज्ञांतील वेदींतून बाहेर आली आहे. ती पुन्हां पांचांची भार्या व्हावयाची आहे; तर तुम्हीं तिचे स्वयंवरास जावें ' असें सांगून व्यास तेथून निघून गेले. यानंतर एका शुभ दिवशीं द्रुपदाचे राजधानीस जाण्यासाठीं पांडव व कुंती हीं निघाले. प्रवासांत रात्रीं वाट दिसावी म्हणून दिवटी हातांत घेऊन अर्जुन सर्वांचे पुढें चाले. याप्रमाणें मार्ग क्रमीत असतां ते गंगानदीच्या तीरावर येऊन पोंचले. रात्रीच्या त्या शांत वेळीं सोमाश्रयण तीर्थाजवळ अंगारपर्ण नांवाचा गंधर्व आपल्या स्त्रीयांसह जलक्रीडा करीत होता. पांडवांच्या येण्यानें

या क्रीडेस व्यत्यय आल्यामुळें क्रोधायमान होऊन तो पांडवांवर सारखे बाण सोडूं लागला. पण समुद्रकिनारा, नदीचें तीर व हिमालय पर्वताचा पायथा यांवर सत्ता कोणाचीच नसून तेथें येण्यास सर्वांस सारखाच हक्क आहे, असें गंधर्वास बजावून अर्जुनानेंहि उलट आग्नेयास्त्र सोडून त्याचा रथ जाळून टाकिला; तो पळून जाऊं लागला असतां त्याची शेंडी धरून त्यास मागें खेंचलें; व कैद करून युधिष्ठिराकडे नेलें. त्याची स्त्री कुंभीनसी हिनें आपल्या पतीस जीवदान देण्याविषयीं युधिष्ठिराची प्रार्थना केली. **शत्रु हातीं लागला तरी शरणागताचें रक्षण करण्याचें क्षत्रियाचें ब्रीद धर्महि जाणत होता;** म्हणून त्याचे आज्ञेवरून अर्जुनानें त्यास जीवदान दिलें. अर्जुनानें आपला रथ जाळिला म्हणून यापुढें त्यानें 'चित्ररथ' हें नांव धारण केलें. अर्जुन व गंधर्व यांचें सख्य होऊन अर्जुनानें त्यास आग्नेयास्त्र दिलें व त्याजपासून गंधर्वास्त्र घेतलें. तसेंच गंधर्वानें त्यास चक्षुर्विद्या देऊन शिवाय शंभर जातिवंत घोडे नजर केलें. ( आदिपर्व अ० १६५–१७० )

नंतर चित्ररथाचे सांगण्यावरून ते सर्वजण 'उत्कोचक' तीर्थास गेले. त्या ठिकाणीं देवल ऋषीचा धाकटा भाऊ धौम्य होता; त्यास आपला पुरोहित करून पांडवांनीं बरोबर घेतलें व ते पुन्हां वाट चालूं लागले. मार्गामध्यें त्यांना स्वयंवरासाठींच पांचाल देशास जाणारे कांहीं ब्राह्मण भेटले. त्यांचेच मेळ्यांतून हे ब्राह्मणवेषधारी क्षत्रिय पांडवहि जाऊं लागलें. नंतर दक्षिण पांचाल देशांतून मजल दरमजल करीत सर्वजण कांहीं दिवसांनीं द्रुपदाचे राजधानीस जाऊन पोंचले पांडवांनीं त्या नगरांतील एका कुंभाराचे घरीं आपलें बिऱ्हाड ठेवून पुन्हां आपली पूर्वींची भिक्षावृत्ति स्वीकारली. ( आदिपर्व अ० १८३ )

नगराचे ईशान्य दिशेस एक विस्तीर्ण, भव्य व सुंदर स्वयंवर–मंडप आणि उत्तर दिशेस स्वयंवरासाठीं आलेल्या राजांची शिबिरें द्रुपदानें तयार करविलीं होतीं. त्याचे मनांत आपली कन्या वीरश्रेष्ठ अर्जुन यासच द्यावयाची होती. म्हणून त्यानें एक बळकट धनुष्य तयार करवून एक 'वैहायस' ( आकाशांत फिरणारें ) यंत्रहि बनविलें; व तें स्वयंवरमंडपांत उभें केलें. त्या धनुष्यानें त्या फिरत्या यंत्राचे छिद्रांतून पांच बाण घालवून जो पुरुष यंत्राचे वरील मत्स्य भेदून खालीं पाडील त्यास द्रौपदी द्यावयाची, असें द्रुपदानें जाहीर केलें; हेतु हा कीं, अर्जुनानेंच हा अवघड पण जिंकून द्रौपदी मिळवावी. याप्रमाणें सर्व सिद्धता झाल्यावर नेमिल्या वेळीं राजे, राजपुत्र, ब्राह्मण, ऋषि, पौरजन व

इतर प्रेक्षक या सर्वांनीं तो मंडप गजबजून गेला. द्रुपदाच्या पुरोहितानें आरंभीं यथाविधि स्वस्तिवाचन करून होमहवन केलें. नंतर न्हाऊन व पांढरें शुभ्र पातळ नेसून हातांत सुवर्णमाला घेतलेल्या आपल्या बहिणीसह धृष्टद्युम्न रंगमंडपामध्यें आला. सर्व वाद्यें बंद होऊन चोहोंकडे शांतता झाल्यानंतर आपल्या बहिणीचें नांव, कुल व गोत्र यांचा उच्चार करून धृष्टद्युम्न म्हणाला:— ' येथें असलेलें धनुष्य वांकवून व त्यांस प्रत्यंचा चढवून हे पांच बाण फिरत्या यंत्राच्या छिद्रांतून घालवून वरचें लक्ष्य भेदून खालीं पाडणाऱ्या, व कुल, रूप आणि बल यांनीं युक्त असलेल्या पुरुषास द्रौपदी वरील. ' यानंतर जमलेल्या सर्व राजांचीं नांवें धृष्टद्युम्नानें द्रौपदीस सांगितलीं. त्या ठिकाणीं बलरामासह श्रीकृष्णहि आले होते. इतर कोणास समजलें नव्हतें, तरी ब्राह्मणाच्या समुदायांत बसलेल्या आपल्या आतेभावांना श्रीकृष्णानीं ओळखून ते बलरामांसहि दाखविले. पणाप्रमाणें लक्ष्यभेद करून द्रौपदीसारखें राजकन्यारत्न मिळविण्यासाठीं अनेक राजे मोठ्या उत्साहाने पुढें झाले. पण तें धनुष्य पुष्कळ प्रयत्न करूनहि कोणास वांकवितां आलें नाहीं; मग मत्स्यभेदाची गोष्ट दूरच. बहुतेक राजांची या कामीं निराशा झाल्यावर कर्ण पुढें सरसावला; आणि त्यानें धनुष्य तेव्हांच वांकवून व तें सज्ज करून त्यास बाण तर लावला ! कर्ण बाण सोडणार इतक्यांत ' नाहं वरयामि सूतम् ' ( मी सारथ्याचे मुलास वरणार नाहीं ) असें द्रौपदीनें सांगितलें. तें ऐकून कर्णानें किंचित् हांसून व सूर्याकडे पाहून धनुष्य खालीं ठेविलें. यानंतर शिशुपाल, जरासंध, शल्य इत्यादि राजांच्याहि बलाची परीक्षा झाली. याप्रमाणें सर्व राजांचे प्रयत्न निष्फळ होऊन ते लज्जित झाले असतां ब्राम्हण मंडळींत अर्जुन उभा राहिला. त्यास पाहतांच ' अरे, हा तर अगदींच लहान पोर आहे ! जें काम मोठमोठ्या क्षत्रियांच्या हातूनहि पार पडलें नाहीं, तें करावयास जाऊन सर्व ब्राह्मणांची या राजमंडळामध्यें उपहास्यता करण्यास यानें कारण होऊं नये' असें कांहीं ब्राम्हण आपसांत बोलूं लागले. दुसऱ्या कित्येकांनीं त्याच्या तेजाची, सामर्थ्याची व 'सिंहखेलगतीची' तारीफ केली; व हा द्रौपदीस खचित मिळविणार असें वाटून, आनंदानें आपलीं मृगासनें वर उडविलीं ! अर्जुनानें मंडपाचें मध्यभागीं जाऊन प्रथमतः धनुष्यास प्रदक्षिणा केली; आणि " **सर्व सामर्थ्य व यश हें ईश्वरी कृपेचें फळ आहे,** असे जाणून महादेवास भक्तिपूर्वक नमस्कार करून व श्रीकृष्णाचें स्मरण करून धनुष्य हातीं घेतलें ! आणि लीलेनें एका क्षणांत तें सज्ज करून पांचहि बाण यंत्राचे छिद्रांतून

पार घालून वरच्या मस्त्याचा भेद करून तो खालीं पाडिला! तेव्हां चोहोंकडून अर्जुनावर पुष्पवृष्टि झाली. द्रौपदीनेंहि, अर्जुनाचें तें हस्तकौशल्य, तें तेज व तें सौंदर्य पाहून हर्षानें पुढें येऊन त्यास माळ घातली. नंतर पांडवांसह अर्जून स्वयंवरमंडपांतून बाहेर निघतांच द्रौपदीहि आपल्या पतीचे पाठोपाठ बाहेर पडली. 'स्वयंवर हें क्षत्रियांकरितां असून ब्राह्मणानें त्यामध्यें पडून ढवळाढवळ करावी हें अयोग्य आहे. ब्राह्मणानें पण जिंकून क्षत्रिय राजकन्या द्रौपदी मिळवावी हा क्षत्रियांचा उपमर्द आहे' असें म्हणत सर्व राजे द्रुपदाशीं व त्या ब्राह्मणरूपी पांडवांशीं युद्ध करण्यास तयार झाले. द्रौपदीबरोबर शुल्क (हुंडा) म्हणून प्राप्त झालेलें तें धनुष्य अर्जुनानें हातांत घेतलें आणि भीमसेनानें जवळचा एक वृक्ष उपटून हातीं घेतला; आणि दोघांनीं सारखें रणकंदन चालविलें; थोड्याच वेळांत अर्जुनानें कर्णास रणांगण सोडून पळून जावयास लाविलें; आणि दुसरीकडे भीमसेनानें शल्यास बाहुयुद्धांत जिंकिलें. यानंतर, द्रौपदी ज्यांनीं मिळविली त्यांनीं ती न्यायानेंच मिळविली आहे, अशी श्रीकृष्णांनीं सर्वांची खात्री करून दिल्यामुळें सर्व राजे युद्ध बंद करून आपल्या देशीं परत गेले. इकडे द्रौपदीला बरोबर घेऊन पांडवहि कुंभाराचे घरीं आले, त्या वेळीं कुंती आंतल्या बाजूस होती तिला हांक मारून 'आजची भिक्षा आणली आहे" असें ते थट्टेनें म्हणाले. तेव्हां ती आंतूनच 'सर्वे समेत्य भुंक्त' (सर्वजण मिळून वांटून घ्या) असें म्हणाली! व बाहेर येऊन पाहते तों पांडव राजकन्या द्रौपदीस घेऊन आले आहेत! हें पाहून तिला आश्चर्य व दुःख झालें. आपलें भाषण तर खोटें होऊं नये व हातून अधर्महि होऊं नये, अशी तजवीज करण्यास काय करावें असें तिनें युधिष्ठिरास विचारिलें. परंतु 'अर्जुनानें ज्या अर्थी द्रौपदीला स्वपराक्रमानें मिळविलें आहे त्या अर्थीं त्यानेंच तिला वरावें' असें धर्माचें मत पडलें. पण धर्मराज व भीमसेन यांचे आधी विवाह करणें अर्जुनास आवडलें नाहीं. शेवटीं तिला पाहून सर्वांचेच मनांत तिचेविषयीं प्रेमभाव उत्पन्न झालेला दिसून आल्यावरून व व्यासांच्या भविष्याचें स्मरण होऊन 'द्रौपदी ही आपली सर्वांचीच भार्या होईल' असें युधिष्ठिरानें सांगितलें; व तें सर्वांनीं मान्य केलें. इतक्यांत बलराम व श्रीकृष्ण आपल्या आतेला व आतेभावांना भेटण्यास तेथें आले. त्यांनीं कुंती, धर्म व भीमसेन यांना नमस्कार करून इतरांना कुशल पुसलें. थोडा वेळ तेथें राहून, इतरांना संशय येऊं नये म्हणून ते लवकरच निघून गेले. कुंतीचे आज्ञेवरून त्या दिवशींच्या भिक्षेची वांटणी द्रौपदीनें

केली. पांडवांचें भोजन झाल्यावर द्रौपदी व कुंती याहि जेवल्या. रात्रीं दर्भांच्या शय्यांवर पांचहि पांडव एकमेकांशेजारीं ओळीनें निजले. आणि त्यांचे उशाशीं कुंती व पायांकडील बाजूस द्रौपदी निजली. ब्राह्मणवेषधारी पांडव अस्त्रें, रथ, खड्ग, गदा, युद्ध इत्यादिकांविषयीं एकमेकांत बोलत झोंपी गेले.

इकडे, आपल्या बहिणीस घेऊन जाणारा ब्राह्मण कोण आहे, याचा शोध करण्यासाठीं धृष्टद्युम्न गुप्तपणें कुंभाराच्या घरांत शिरून लपून बसला होता, त्यानें त्यांचें वरील सर्व भाषण ऐकिलें; व त्यावरून हे ब्राह्मण, वैश्य किंवा शूद्र नसून खास क्षत्रियच आहेत असा तर्क करून तो आला तसाच गुप्तपणें निघून गेला. ( आदिपर्व अ० १८४–१९२ )

राजवाड्यांत परत आल्यावर धृष्टद्युम्नानें पाहिलेलें व ऐकिलेलें सर्व वर्तमान द्रुपदास सांगितलें; व ब्राह्मणवेषानें फिरणारे ते क्षत्रिय असावे असा तर्कहि त्यास कळविला. दुसरे दिवशीं सकाळीं द्रौपदीला घेऊन जाणारे ब्राह्मण कोण आहेत, याचा प्रत्यक्ष शोध करण्यासाठीं राजानें आपला पुरोहित पाठविला. तो कुंभाराचे घरीं आला तेव्हां पांडवांनीं त्याचा चांगला सत्कार केला. नंतर पुरोहित म्हणाला:—' द्रुपदराजाच्या मनांत आपली कन्या पराक्रमी अर्जुनास द्यावी असें होतें. परंतु तुम्हींच पण जिंकून ती मिळविली; यामुळें द्रुपदराजास चिंता पडली आहे. तर तुमची खरी जात, कुल व नांव काय आहे तें तुम्ही मला सांगा. ' यावर, आपण कोण ह्याचा मुळींच थांग लागू न देतां, युधिष्ठिर एवढेंच म्हणाला कीं, ' धनुष्य सज्ज करून पांच बाणांनीं यंत्राचे छिद्रांतून जो लक्ष्य भेदील त्यास द्रौपदी द्यावयाची, असा तुमचा पण होता. हा पण जिंकण्याचा प्रयत्न फक्त क्षत्रियांनींच करावा, ब्राह्मणांनीं करूं नये, अशी अट तुम्हीं मुळींच घातली नव्हती. तुमचा पण जिंकून आम्हीं द्रौपदी मिळविली ती न्यायानच मिळविली आहे. तर द्रुपदानें याउप्पर आपल्या मुलीविषयीं व्यर्थ काळजी करीत बसूं नये, हें चांगलें. ' हें भाषण ऐकून पुरोहित पांडवांचा निरोप घेऊन परत गेला; व त्यानें हा सर्व मजकूर द्रुपदराजास कळविला. नंतर राजानें द्रौपदी, कुंती व पांडव या सर्वांना राजवाड्यांत आणविलें. तेथें विवाहाचे समारंभासाठीं आणविलेले उत्तम उत्तम कौशल्याचे पदार्थ ठिकठिकाणीं मांडून ठेविले होते. इतर पदार्थांकडे फारसें लक्ष न देतां, पांडव शस्त्रांकडे व दुसऱ्या युद्धोपयोगी सामानाकडे विशेष उत्सुकतेनें पाहात होते; हें पाहून, हे क्षत्रियच आहेत अशी द्रुपदराजाचीहि खात्री झाली. नंतर, ' आपण कोण,

आपली जात व कुल कोणतें ' असें द्रुपदानें त्यांना अत्यंत नम्रपणानें विचारलें. तेव्हां युधिष्ठिरानें द्रुपदास अधिक वेळ संशयांत न ठेवितां, आपण क्षत्रिय असून पांडुराजाचे पुत्र आहों व आपणाबरोबर आपली माता कुंती आहे, असें त्यास सांगितलें. तें ऐकून द्रुपदराजाचे डोळ्यांतून आनंदाश्रु लोटले, व इतर सर्वांसहि अत्यंत हर्ष झाला. द्रुपदाच्या राजवाड्यांत रहावयास आल्यानंतर कांहीं दिवसांनीं ' आज शुभ दिवस आहे, तेव्हां आज अर्जुन-द्रौपदीचा विवाह व्हावा ' असें द्रुपदानें बोलणें काढिलें. ' माझाहि विवाह व्हावयाचा आहे ' असें युधिष्ठिरानें म्हणताच, ' द्रौपदीला तुम्हां पांडवांपैकीं कोणालाहि देण्यास मी तयार आहे ' असें द्रुपदानें उत्तर केलें. ' आम्हीं सर्वांनींच द्रौपदीशी विवाह करावा, असें आमच्या आईनें आम्हांस सांगितलें आहे. इतर रत्नें जशीं आम्हीं सर्व भाऊ उपभोगितों, तसें अर्जुनानें मिळविलेलें हें कन्यारत्नहि आम्हां सर्वांनाच सारखें मिळावें, असें माझें म्हणणें आहे. ' एका स्त्रीस अनेक पति करणें ही लोकविरुद्ध व वेदविरुद्ध गोष्ट करण्यास द्रुपदराजा मुळींच तयार होईना; एवढेंच नव्हें तर उलट असला पापविचार मनांत आणल्याबद्दल युधिष्ठिराची त्यानें अतिशय निर्भर्त्सना केली. तेव्हां युधिष्ठिर म्हणालाः— ' मी आजपर्यंत कधींहि खोटें बोललों नाहीं व माझें मन कधींहि पापास शिवलें देखील नाहीं. आमच्या मातेचें सांगणें असेंच आहे; आणि आमची सर्वांची हीच इच्छा आहे. ' असें सांगून धर्मानें आपला आग्रह सोडिला नाहीं. इतक्यांत भगवान् व्यास तेथें आले. तेव्हां ' लोकव्यवहार व वेद या दोहोंनाहि असंमत अशी गोष्ट करण्याचें धर्मानें मनांत आणिलें आहे, तर या प्रसंगीं काय करावें, ' असें द्रुपदानें व धृष्टद्युम्नानें व्यासांना विचारिलें. तेव्हां त्यांस एकांतीं नेऊन व्यासांनीं उत्तर केलें:—' अर्जुन खेरीज करून बाकीचे चार पांडव हे पूर्वींचे चार इंद्र असून अर्जुन हा सांप्रतच्या इंद्राचा पुत्र आहे. तसेंच द्रौपदी ही या पांचांनींहि पूर्वींच उपभोगिलेली ' स्वर्गश्री ' ( स्वर्गांतील राजलक्ष्मी ) आहे. तिचा एक जन्म ऋषिपत्नीचे पोटीं होऊन तिनें शंकरापाशीं ' पतिं देहि ' असें पांचदां म्हटलें होतें; या कारणानेंहि तिला या जन्मीं हे पांच पति मिळत आहेत.' असें सांगून व्यासांनीं द्रुपदास दिव्य दृष्टि देऊन पांडवांचीं पूर्वींचीं इंद्रस्वरूपें व द्रौपदीचें स्वर्गश्रीस्वरूप दाखविलें ! द्रुपदाची शंका याप्रमाणें दूर झाल्यावर त्याच दिवशीं पांडव व द्रौपदी यांचा विवाह झाला. श्रीकृष्णानीं बहुमोल रत्नें, उत्तम उत्तम वस्त्रें, दासदासी वगैरे आहेर आणिला होता, त्याचा

पांडवांनीं पूज्यभावपूर्वक स्वीकार केला. ( आदिपर्व अ० १९३—१९९ )

वारणावत नगरामध्यें लाक्षागृहाला लावलेल्या आगीतून कुंती व पांडव जिवंत बाहेर पडले, एवढेंच नव्हें तर द्रौपदी ज्यांनीं मिळविली ते ब्राह्मण-वेषधारी पांडवच होते, हें वर्तमान हेरांकडून हस्तिनापुरास समजतांच दुर्योधनादिकांची जी निराशा झाली तिला सीमाच राहिली नाहीं. येवढ्या मोठ्या प्रयत्नानें रचलेला आपला व्युह ढासळलेला पाहून त्यांस पश्चात्ताप न होतां त्यांचा द्वेष मात्र दुणावला. या विवाहाचें वर्तमान विदुरानें जेव्हां धृतराष्ट्रास कळविलें, तेव्हां ' जसे माझे पुत्र तसेच किंबहुना त्यांचेहूनहि अधिक मला पांडव प्रिय आहेत. आमचे भारत कुल व द्रुपदाचें पांचाल कुल यांचा शरीरसंबंध झालेला पाहून मला फार आनंद होत आहे ' इत्यादि वरकरणी समाधानाचें बोलणें तो बोलला. ' तुझी ही बुद्धि नेहमीं अशीच कायम राहो ' येवढेंच यांवर उत्तर करून विदुर निघून गेला. पांडवांना अनुकूल व त्यांच्या विवाहाविषयीं अभिनंदनपर असें बोलणें बोलल्याबद्दल दुर्योधन, कर्ण वगैरे धृतराष्ट्रास दोष देऊं लागले. तेव्हां, ' विदुरास आपले बेत समजूं नयेत म्हणून मी असें बोललों, तें कांहीं खरें नव्हें ' असें त्या कपटी म्हाताऱ्यानें उत्तर केलें. पांडवांचा झालेला हा उत्कर्ष सहन न होऊन त्यांचा नाश कोणत्या ना कोणत्या तरी उपायानें झालाच पाहिजे, असे विचार दुर्योधनाचे मनांत अधिकाधिकच येऊं लागले. अविचारी राजाचें मन एकदां राज्यलोभानें व मत्सरानें ग्रासलें, म्हणजे आपले इष्ट हेतु साधण्यास कोणते उपाय योजावें, कोणते उपाय शक्य अथवा न्याय्य आहेत, याचाहि त्यास विचार रहात नाहीं. दुर्योधनाचेंहि असेंच झालें होतें. 'पुष्कळ द्रव्य देऊन द्रुपदराजास वश करावें, किंवा पांडव नेहमीं तेथेंच राहतील असा कांहीं तरी उपाय योजावा; अथवा द्रौपदी पांच पुरुषांची बायको असल्यामुळें तिच्याच पातिव्रत्यासंबंधानें पांडवांमध्यें एकमेकांत द्वेष उत्पन्न करावा; किंवा द्रौपदीचेंच बलात्कारानें हरण करावें; अगर कोणत्या तरी उपायानें शूर अर्जुन व बलिष्ठ भीम यांना मारून टाकावें; नाहीं तर सुंदर स्त्रियांकडून पांडवांचें मन आकर्षण करून द्रौपदीस दुःख द्यावें. ' याप्रमाणें अनेक दुष्ट उपाय दुर्योधनाचे पापमय अंतःकरणांत घोळूं लागले; व ते त्यानें कर्ण, शकुनि व दुःशासन यांस कळविले. परंतु हे सर्व उपाय व्यर्थ असून त्यांपासून कांहीं एक उपयोग व्हावयाचा नाहीं, अशी कर्णाची खात्री असल्यामुळें त्यानें अशी सरळ मसलत दिली कीं, ' जोंपर्यंत द्रुपदराजा सावध झाला नाहीं, श्रीकृष्णहि आपल्या

यादवसैन्यासह पांडवांचे मदतीस आला नाहीं, जोंपर्यंत आपला पक्ष प्रबळ व पांडवांचा दुर्बळ आहे, आणि जोंपर्यंत प्रजेची युधिष्ठिराविषयींची भक्ति अजून दृढ झाली नाहीं, तोंवरच एकदम पांचाल देशावर स्वारी करून युद्ध करावें व पांडवांना कैद करून येथें आणून कारागृहांत ठेवावें!' यानंतर धृतराष्ट्रानें भीष्म द्रोण व विदुर यांना बोलावून आणून या मसलतीसंबंधानें त्यांचें मत विचारिलें. तेव्हां प्रथमतः भीष्मांनीं उत्तर दिलें:—धृतराष्ट्रा, तूं व तुझे पुत्र जसे मला प्रिय आहेत तसेच पांडु व त्याचे पांडवहि प्रिय आहेत. तेव्हां त्यांचें राज्य हरण करण्याकरितां तुम्हीं त्यांशीं युद्ध करणें मला कसें आवडेल. दुर्योधनास जसें हें राज्य आपलें आहे असें वाटतें, तसें तें पांडवांसहि वाटतें. पांडवांचा आजा विचित्रवीर्य व त्यांचा बाप पांडु हे जर सिंहासनावर क्रमानें बसलेले आहेत, तर सर्वांचे आधीं राज्यावर पांडवांचाच हक्क पोंचत आहे. पांडवांना राज्य मिळूं नये असें तुमचें म्हणणें असेल, तर तें आमचेकडेच असावें असें म्हणण्याचा दुर्योधनास तरी काय अधिकार आहे? पांडु राजा मेल्यावर हें राज्य क्रमानें युधिष्ठिराकडे पूर्वींच आलेलें असून कांहीं तरी निमित्तानें पांडवांस दूर पाठवून तें तुम्ही अन्यायानें आपणांकडे घेतलें आहे; व आतांहि तुम्ही तें त्यांस देत नाहीं, हाहि निव्वळ अन्याय आहे. धृतराष्ट्रा, ज्या वेळीं लाक्षागृहामध्यें कुंती व पांडव जळून मेले असें प्रजेनें ऐकिलें, त्या वेळीं तिनें तुला जितका दोष दिला तितका पुरोचनालाहि दिला नाहीं. आतां पांडव कुंतीसह सुदैवानें जिवंत राहिले आहेत, यामुळें तुझ्यावरील अपवाद टळला, हें तुझें भाग्य समज. जोंपर्यंत पांडव जिवंत आहेत तोंपर्यंत राज्यांतील त्यांचा हिस्सा हिरावून घेण्यास प्रत्यक्ष इंद्रहि समर्थ नाहीं, मग तुमची कथा काय? धृतराष्ट्रा,

**यदि धर्मस्त्वया कार्यो यदि कार्यं प्रियं च मे ॥**
**क्षेमं च यदि कर्तव्यं तेषामर्धं प्रदीयताम् ॥**

न्यायनें वागावयाचें असेल, माझें सांगणें ऐकावयाचें असेल आणि आपल्या राष्ट्राचें व कुलाचें आस्तित्व कायम ठेवावयाचें असेल, तर पांडवांना सन्मानपूर्वक हस्तिनापुरास आणवून मुकाट्यानें त्यांना अर्धें राज्य द्या.' भीष्माचा हा उपदेश द्रोणाचार्य व विदुर यांनाहि पसंत पडला. परंतु या उपदेशाप्रमाणें धृतराष्ट्रानें वागूं नये. म्हणून दुर्योधन व कर्ण यांनीं आपल्याकडून पुष्कळ प्रयत्न केला. परंतु त्याचा कांहींच उपयोग झाला

नाहीं. शेवटीं पांडव, कुंती, द्रौपदी, द्रुपद, धृष्टद्युम्न इत्यादिकांना आहेर म्हणून देण्यासाठीं रत्नें, वस्त्रें वगैरे घेऊन विदुर द्रुपदाचे नगरास आला, ' प्रख्यात कुरु व पांचाल कुलांचा हा शरीरसंबंध घडून आल्यामुळें मी कृतकृत्य झालों ' असा धृतराष्ट्राचा निरोप त्यानें द्रुपदास कळविला. कांहीं दिवस तेथें राहिल्यावर विदुर, पांडव, श्रीकृष्ण हे सर्व द्रुपदाचा निरोप घेऊन कुंती द्रौपदीसह हस्तिनापुरीं आले. त्या वेळीं बरेंच वर्षांनीं पांडव सुखरूप परत आले म्हणून नागरिकांनीं मोठा उत्सव केला. नगरांत आल्यावर पांडवांनीं भीष्म आदिकरून वडील माणसांना नमस्कार केले. ' कौरवांचें व तुमचें विनाकारण वितुष्ट येऊं नये, यासाठीं तुम्हांस अर्धें अर्धें राज्य वांटून दिलें आहे. तुम्हीं खांडवप्रस्थ येथें नवें नगर वसवून यमुनेच्या पश्चिमेकडील अर्ध्या देशावर सुखानें राज्य करावें; आम्ही हस्तिनापुरीं राहूं. ' असें धृतराष्ट्रानें धर्मराजास सांगितलें. त्याप्रमाणें पांडवांनीं ' इंद्रप्रस्थ ' नांवाचें नवें नगर वसविलें; आणि तेथें ते धर्मानें व न्यायानें प्रजेचें पालन करीत राज्य करूं लागले. लवकरच या नगरांत तपोनिष्ठ व विद्वान् ब्राह्मण, निरनिराळ्या भाषा बोलणारे व्यापारी व कुशल कारागीर येऊन राहिले; नगरांत मोठमोठाल्या हवेल्या उठल्या व बाहेरच्या भागांत बागबगीचे झाले. याप्रमाणें कांहीं काल लोटल्यावर नारदमुनि पांडवांकडे आले. पांच भावांमध्यें एकच बायको केली आहे; तेव्हां तिच्यामुळें कदाचित् एकमेकांमध्यें वैमनस्य येऊन सर्वांचाच नाश होण्याचा संभव आहे, ही गोष्ट त्यांनीं सुंदोपसुंद व तिलोत्तमा, यांची कथा सांगून, त्यांस सुचविली. तेव्हां त्यांचेच सांगण्यावरून ' प्रत्येकानें दोन महिने बारा दिवस या क्रमानें द्रौपदीशीं संबंध ठेवावा; जो कोणी द्रौपदीसह एकांतांत असतांना दुसऱ्या कोणास पाहील, त्यानें बारा वर्षें वनवास पत्करून ब्रह्मचर्यानें राहावें ' असा पांडवांनीं आपसांत निर्बंध ठरविला. ( आदिपर्व अ० १९९–२०२ )

याप्रमाणें निर्बंध ठरविल्यानंतर बराच काळ लोटला. पुढें एके दिवशीं एका ब्राह्मणाच्या गाई चोरांनीं चोरून नेल्या. तेव्हां, ' त्यांस शासन करून माझ्या गाई मला परत द्या, ' असें ओरडत तो ब्राह्मण इंद्रप्रस्थाच्या रस्त्यांत आला. त्याच्या त्या हांका ऐकून जेव्हां कोणी मदतीस येईना, तेव्हां

**अरक्षितारं राजानं बलिषड्भागहारिणम् ॥**
**तमाहुः सर्वलोकस्य समग्रं पापचारिणम् ॥**

'**प्रजेपासून उत्पन्नाचा एकषष्ठांश कर घेऊनहि जो प्रजेच्या जीवाचें व तिच्या वित्ताचें रक्षण करीत नाहीं तो राजा अत्यंत पापी होय**' असेंहि ओरडूं लागला! इतर सामान्य राजांप्रमाणें पांडव जर राजधर्म न जाणणारे व राज्यमदानें धुंद झालेले असते, तर त्यांनीं या दुर्भाषणाबद्दल त्यास कारागृहांत टाकिलें असतें. पण त्याची ही हांक व भाषण ऐकतांच त्यास 'भिऊं नको' असें सांगून अर्जुन शस्त्र आणण्यासाठीं आयुधागारांत जाऊं लागला. परंतु तेथें द्रौपदीसह धर्म एकांतांत आहेत, असें वाटल्यावरून त्यास मोठा विचार पडला. आंत जावें तर निर्बंध मोडून बारा वर्षें वनवास करावा लागणार; न जावें तर क्षात्रियधर्मास बाध येणार. परंतु '**इतर सर्व कर्तव्यांहून प्रजेचें पालन करणें व दुष्टांचा नाश करणें हें क्षत्रियांचें जास्त श्रेष्ठ कर्तव्य आहे; तें करीत असतां त्यांस कितीहि कष्ट पडले तरी तें क्षत्रियांनीं सोशिलेच पाहिजेत,** असा विचार करून तो तसाच आयुधागारांत गेला; व आधीं आंत येण्याचें कारण धर्मास कळवून तो धनुष्यबाण व शस्त्रें घेऊन बाहेर पडला; आणि चोरांचा पाठलाग करून व त्यांना शासन करून त्यानें ब्राह्मणाच्या गाई त्यास परत दिल्या. राजवाड्यांत परत येऊन 'मी निर्बंध मोडला आहे, तेव्हां आपल्या नियमाप्रमाणें मी बारा वर्षें वनवास करणार' असें अर्जुनानें युधिष्ठिरास सांगितलें. 'आम्ही दोघें एकांतीं असतांना जरी तूं आंत आलास तरी त्याबद्दल माझे मनांत मुळींच वैषम्य नाहीं. तूं वनांत जाऊं नये असें माझें तुला सांगणें आहे, तें तूं मोडूं नको.' अशा तऱ्हेनें धर्म अर्जुनाची समजूत करूं लागला. वडील भावाच्या ह्या भाषणाचा फायदा घेऊन वनवासांतील बारा वर्षांचें दुःख टाळण्याचा अर्जुनानें प्रयत्न केला नाहीं; व त्यानें आपलें मन सत्यापासून ढळूं दिलें नाहीं.

> **न व्याजेन चरेद्धर्ममिति मे भवतः श्रुतम् ।**
> **न सत्याद्विचलिष्यामि सत्यमायुधमालभे ॥**

'**धर्माचें, सत्याचें, प्रतिज्ञेचें व वचनाचें परिपालन करावयाचें असतां कांहीं तरी शुष्क सबब काढून टाळाटाळी करूं नये,** असें तुम्हींच मला अनेक वेळां सांगितलें आहे. सत्य हेंच माझें शस्त्र आहे; तें सोडून देण्यास तुम्हीं मजसारख्या क्षत्रियास सांगूं नका.' असें म्हणून अर्जुन वनांत चालता झाला. कांहीं दिवस प्रसिद्ध तीर्थांचें दर्शन घेतल्यावर तो गंगाद्वारास

आला. तेथें स्नान करण्यासाठीं गंगेमध्यें उतरला असतां 'उलूपी' नांवाच्या एका नागकन्येनें त्यास नागलोकीं ओढून नेलें. तेथें तिच्या विनंतीवरून तिचेजवळ एक रात्र राहून तो पुन्हां सकाळीं गंगाद्वारीं आला. नंतर पूर्वदिशेकडील तीर्थें पाहात पाहात तो समुद्रकिनाऱ्यानें मणिपुरास गेला. तेथील चित्रवाहन राजाची कन्या चित्रांगदा हिला पाहून त्याचें मन तिजवर बसलें; व राजवाड्यांत जाऊन राजाजवळ आपलें नांव व कुल सांगून त्यानें तिजबद्दल मागणी केली. 'तिचे पोटीं जो पुत्र होईल तो मला देशील, तर मी चित्रांगदा तुला देतों' असें राजानें उत्तर केलें. ही त्याची अट मान्य करून अर्जुनानें तिचें पाणिग्रहण केलें; व तेथें तो तीन वर्षें राहिला. तेवढ्या अवकाशांत त्याला एक पुत्र ( बभ्रुवाहन ) झाला. नंतर दक्षिण तीर्थें हिंडून तो सौभद्रतीर्थास आला. तेथें एका ब्राह्मणाच्या शापानें वर्गा व इतर चार अप्सरा सुसरी होऊन राहिल्या होत्या, त्यांना शापांतून मुक्त करून तो मणिपुरास पुन्हां परत आला. अश्वमेध यज्ञाचे वेळीं तुला हस्तिनापुरीं नेईन, असें चित्रांगदेला अभिवचन देऊन तो पुन्हां तीर्थाटनास गेला. गोकर्ण वगैरे महापवित्र स्थानें पाहात पाहात तो प्रभास तीर्थास आला. तेथें त्याची व श्रीकृष्णाची गांठ पडली. बळरामप्रभृति यादवांनीं अर्जुनाला सत्कारपूर्वक द्वारकेमध्यें नेलें. तेथें एका उत्सवामध्यें सर्व यादव आपल्या स्त्रियांसह रैवतक पर्वतावर जमले असतां श्रीकृष्णाची बहीण सुभद्रा हिला पाहून अर्जुनाचें मन मोहित झालें. तिजविषयींचें आपलें प्रेम जेव्हां त्यानें मोकळ्या मनानें श्रीकृष्णास सांगितलें, तेव्हां त्यावेळच्या क्षत्रियांना अनुरूप अशी 'तिचें बलात्कारानें हरण करण्याची' मसलत श्रीकृष्णांनीं त्यास दिली. हा आपला बेत एका दूताकडून धर्मास कळवून त्यांनीं त्याची या कृत्यास संमति आणविली. पुढें कांहीं दिवसांनीं सुभद्रा एके समयीं दासींसह रैवतक पर्वतावर गेली; आणि तेथील सर्व देवतांचें दर्शन घेऊन व पर्वतास प्रदक्षिणा करून ती द्वारकेकडे निघाली. इतक्यांत तिला बलात्कारानें आपल्या रथावर घालून अर्जुन इंद्रप्रस्थाकडे निघाला! ही बातमी यादवांना समजतांच युद्धाची तयारी करून ते अर्जुनास प्रतिबंध करण्यास निघाले. परंतु, श्रीकृष्ण अर्जुनाच्या शौर्यपराक्रमादि गुणांची स्तुति करून म्हणाले:—सुभद्रेला अर्जुनासारखा दुसरा कोणता पति मिळणार आहे ? अर्जुनास युद्धामध्यें तरी कोण जिंकणार आहे ? आपणां सर्व यादवांस युद्धांत जिंकून जर त्यानें सुभद्रा नेली तर यादवांची अपकीर्ति होईल; यापेक्षां

अर्जुनास सन्मानपूर्वक परत आणवून आपण होऊनच सुभद्रा त्यास देणें बरें ' अशी त्यांनीं सर्वांची समजूत केली. तेव्हां अर्जुनास परत आणवून बलरामानें सुभद्रा त्यास अर्पण केली. बारा वर्षांपैकीं राहिलेले वनवासाचे दिवस पुष्कर-तीर्थीं घालवून अर्जुन सुभद्रेसह इंद्रप्रस्थास परत आला. सुभद्रेनें कुंती इत्यादिकांबरोबर द्रौपदीसहि नमस्कार करून ' या दासीस पदरांत घ्यावी ' असें नम्रपणानें म्हटलें ! कांहीं वर्षांनीं सुभद्रेला, श्रीकृष्णाचा अगदीं जीव कीं प्राण असा, अभिमन्यु नांवाचा पुत्र झाला. द्रौपदीलाहि प्रत्येक पतीपासून अनुक्रमें प्रतिविंध्य, सुतसोम, श्रुतकर्मा, शतानीक व श्रुतसेन असें पांच पुत्र झाले. ( आदिपर्व अ० २१३-२२१ )

अर्जुन व श्रीकृष्ण यमुना नदीवर जलक्रीडा करण्यास गेले होते; तेथें अग्नि ब्राह्मणरूपानें त्यांचेकडे येऊन खांडववन जाळून टाकण्याची परवानगी मागूं लागला. तो म्हणाला:—' या अरण्यामध्यें इंद्राचा मित्र तक्षक राहत असतो. त्यामुळें, मी जेव्हां जेव्हां हें वन जाळूं लागतों तेव्हां तेव्हां पाऊस पाडून तो मला विझवून टाकितो; यामुळें माझी इच्छा अजून तृप्त झालेली नाहीं ' यांवर अर्जुन त्यास म्हणाला:—' मला उत्तम उत्तम अस्त्रें माहीत आहेत; परंतु माझे बलास व पराक्रमास टिकेल असें धनुष्य, रथ, घोडे व बाणांचे भाते मजजवळ नाहींत. हीं जर तूं मला देशील तर मी तुझी इच्छा पूर्ण करीन. ' नंतर अग्नीनें वरुणाकडून अर्जुनास सोमाचा दिव्य रथ, गांधर्व अश्व, गांडीव धनुष्य व दोन अक्षय्य भाते देवविले. वरुणानें श्रीकृष्णास सुदर्शन चक्र व कौमोदकी गदा दिली. याप्रमाणें सर्व सिद्धता झाल्यावर अग्नीनें खांडववन जाळण्यास प्रारंभ केला. वनाच्या दोहों बाजूंस कृष्णार्जुनांनीं आपले रथ उभे केले; आणि अग्नीच्या भयानें जे जे प्राणी किंवा श्वापदें वनांतून बाहेर पडत त्यांचा त्यांनीं संहार चालविला ! वनांतील तो अग्नि विझविण्यासाठीं इंद्रानें त्यांवर पावसाच्या सरीवर सरी सोडल्या. परंतु अर्जुनानें आपल्या अस्त्रप्रभावानें त्या अरण्यावर जणूं काय बाणांचा मंडपच उभा करून पावसाचा एक थेंबहि अग्नीवर पडूं दिला नाहीं ! हें वन जळूं लागण्यापूर्वींच तक्षक तेथून निघून कुरुक्षेत्रावर गेला होता. त्याची बायको आपल्या अश्वसेन पुत्रास गिळून आगींतून बाहेर जाऊं लागली; तोंच अर्जुनानें बाण मारून तिचें शिर उडविलें. अश्वसेनाचें शेपूट तिच्या तोंडाकडे असल्यामुळें त्यास कांहींच इजा झाली नाहीं; व इतक्यांत इंद्रानें अतिशय जोराचा वारा सोडल्यामुळें त्याचा जीव बचावला. सगळ्या वनाचा आतां पूर्ण

नाश होतो असें पाहून सर्व देव युद्धास तयार झाले. इंद्रानें मंदर पर्वताचें एक शिखर कृष्णार्जुनांवर फेंकिलें; परंतु अर्जुनानें त्याचे बाणांनीं तुकडे-तुकडे करून टाकिले ! ' या वनांमध्यें तुझा मित्र तक्षक नाहीं, तो कुरुक्षेत्रांत सुरक्षित आहे ' अशी आकाशवाणी झाल्यावर इंद्रानें युद्ध बंद केलें. शिल्पकर्मांत अत्यंत प्रवीण असा मयासुर तक्षकाच्या घरांतून बाहेर पडून पळून जाऊं लागला. त्याजवर सुदर्शन घेऊन श्रीकृष्ण धांवले. परंतु तो अर्जुनास शरण आला व त्यानें त्यास अभिवचन दिल्यामुळें, श्रीकृष्णांनीं त्याचा वध केला नाहीं. हें खांडववन सारखें पंधरा दिवस जळत होतें ! या भयंकर अग्निप्रळयांतून मय, तक्षकाचा पुत्र अश्वसेन व चार शार्ङ्क पक्षी येवढे सहा प्राणी मात्र वांचले. बाकी सर्वांची अग्नीनें किंवा कृष्णार्जुनांच्या बाणांनीं राखरांगोळी करून सोडिली ! ( आदिपर्व अ० २२२–२२८ )

आपल्या पुत्राचा पराक्रम पाहून इंद्रासहि संतोष झाला. त्यानें खालीं येऊन कृष्णार्जुनांस दर्शन दिलें. अर्जुनानें इंद्रापाशीं दिव्य अस्त्रें मागितलीं असतां ' तूं महादेवास प्रसन्न केल्यानंतर तीं तुला मिळतील ' असें इंद्रानें उत्तर दिलें. 'माझें सख्य पार्थाशीं निरंतर राहो ' हा श्रीकृष्णांनीं वर मागितला ! तो देऊन इंद्र स्वर्गास गेला व कृष्णार्जुन मयासुरासह विश्रांति घेण्यासाठीं यमुनातीरीं आले. ( आदिपर्व अ० २३४ )

---

# प्रकरण ३ रें.



## द्युत व छळ,




डववनांतील अग्निप्रळयांतून अर्जुनानें आपली सुटका केल्यामुळें आपण या उपकाराची फेड कशी तरी केली पाहिजे, असें मनांत आणून मयासुरानें ती गोष्ट अर्जुनाजवळ काढिली. तेव्हां ' माझ्या उपकाराची फेड जर तुला करावयाची असेल तर श्रीकृष्ण जें सांगतील तें कर ' असें अर्जुनानें उत्तर केलें. श्रीकृष्णांनीं कांहीं वेळ विचार करून युधिष्ठिराकरितां एक अत्युत्तम सभागृह बांधण्यास त्याला

सांगितलें. नंतर इंद्रप्रस्थास कांहीं दिवस राहून कुंती, धर्मराज व भीम यांना नमस्कार करून व सर्वांचा प्रेमानें निरोप घेऊन श्रीकृष्ण द्वारकेस निघून गेले. मयासुरानें एका शुभ दिवशीं सभागृहाकरितां दहा हजार हात घेराची जमीन मोजून घेतली. ' कैलास पर्वताच्या उत्तरेस मैनाक पर्वताजवळ बिंदु नांवाचें एक सरोवर आहे; तेथें पूर्वी वृषपर्व्यानें एक यज्ञ केला होता; त्यावेळीं त्यानें चोहोंकडून आणलेल्या मणिरत्नांचें एक मोठें भांडार तेथें आहे तें आपल्या सभागृहासाठीं आणावयास जातों ' असें सांगून मयासुर इंद्रप्रस्थाहून ईशान्य दिशेकडे निघाला. कैलासाजवळ जाऊन बिंदु सरोवरावर पोंचल्यानंतर तेथील स्फटिकाच्या शिला, सोनें, वैदूर्यमणि वगैरे रत्नें, इत्यादि सभागृहाची सर्व सामुग्री, आणि एक रत्नखचित दिव्य गदा व देवदत्त शंख, इतकें घेऊन मयासुर इंद्रप्रस्थास परत आला. त्यानें ती गदा भीमसेनास व शंख अर्जुनास दिला; आणि बरोबर आणलेल्या सामुग्रीचा उपयोग करून चौदा महिन्यांत त्यानें एक उत्कृष्ट व दिव्य सभागृह निर्माण केलें. त्याचे खांब व बाहेरील तट हे सोन्याचे असून दरवाजे रत्नखचित होते ! सभागृहाचे मध्यभागीं एक लहानसें कृत्रिम सरोवर तयार केलें होतें. त्यांतील कमलें, मासे व पक्षी हीं सर्व सोनें, रत्नें वगैरेचींच केलीं होतीं ! चारी बाजूंला स्फटिकांच्या पायऱ्या असून भोंवतालचे कठडे व फरशी मोठमोठ्या माणिरत्नांच्या शिलांची केलेली होती ! हें गृह पाहण्यास चोहोंकडून ऋषि, मुनि, तपस्वी, निरनिराळ्या देशचे राजे वगैरे लोक जमले.

याप्रमाणें सभागृह तयार होऊन लोक जमल्यावर ब्राह्मणभोजन, यज्ञ, देवतापूजन वगैरे सर्व विधिपूर्वक करून, धर्मराजानें सुमुहूर्तावर त्या सभागृहाचा गृहप्रवेशसमारंभ मोठ्या थाटानें केला. सर्व राजेलोकांसह पांडव त्या नव्या सभागृहामध्यें जाऊन बसले असतां नारदमुनि तेथें आले. युधिष्ठिरानें आपल्या सर्व बंधूंसह त्यांस सामोरें जाऊन त्यांना आपल्या सिंहासनावर आणून बसविलें, व त्यांची भक्तीनें पूजा केली. नंतर नारदमुनींनीं ' कच्चित् ' प्रश्नरूपानें त्यास जी राजनीति सांगितली तिजवरून राजा कोणत्या प्रकारचा असावा व त्याचें प्रजेसंबंधीं खरें कर्तव्य काय, याविषयींची प्राचीन आर्य लोकांची उदात्त कल्पना कळून येणार आहे. तें म्हणाले:—' धर्म, अर्थ व काम हे तीन पुरुषार्थ साध्य करण्यासाठीं, राजा तूं आपल्या वेळेचे योग्य विभाग केले आहेस ना ? तूं नेमिलेले मंत्री कुलीन व तुजवर निष्ठा ठेवणारे असे असतात ना ? तूं

आपल्या सैनिकांचें वेतन वेळचेवेळीं देतोस ना? राज्यकारभारामध्यें फाजील कडकपणा दाखवून तूं प्रजाजनांचें मनांत असंतोष उत्पन्न करीत नाहींस ना? तुझ्याकरितां युद्ध करून रणांत पडलेल्या शिपायांच्या बायकापोरांचें तूं योग्य प्रकारें पालनपोषण करितोस ना? शरण आलेल्या व युद्धांत जिंकिलेल्या शत्रुंचें तूं पुत्राप्रमाणें रक्षण करतोस ना? आईबापांवर जसा लहान मुलांचा पूर्ण विश्वास असतो, तसा तुझ्या प्रजाजनांचा तुजवर विश्वास आहे ना? उत्पन्नाचा एक-चतुर्थांश, एक-तृतीयांश किंवा एक-द्वितीयांश यांहून अधिक तुझा खर्च नाहीं ना?

कच्चिद्राष्ट्रे तडागानि पूर्णानि च बृहंति च।
भागशो विनिविष्टानि न कृषिर्देवमातृका॥

आपल्या राजामध्यें ठिकाठिकाणीं मोठमोठे व सदोदित पाण्यानें तुडुंब भरलेले तलाव तूं बांधिले आहेस ना? कृषीवल (शेतकरी) संतुष्ट असून शेती फक्त आकाशांतील पावसावरच अवलंबून नाहीं ना? शेतकऱ्यांना योग्य वेळीं बीं वगैरे देऊन तूं मदत करतोस ना? लोभ, मोह किंवा गर्व यांमुळें तुझे हातून कधींहि अन्याय होत नाहीं ना? कारागीर लोकांना चार चार महिन्यांनीं द्रव्य आणि त्यांच्या त्यांच्या धंद्याची सामुग्री तूं देतोस ना? नास्तिकपणा, असत्य, क्रोध, प्रमाद, चेंगटपणा, आळस इत्यादि राजांचे दोष तूं टाकिले आहेस ना?" नारदांनीं प्रश्नरूपानें सांगितलेल्या या उत्कृष्ट नीति-प्रमाणें यथाशक्ति वागण्याचें धर्मानें कबूल केलें. यानंतर इंद्र, यम, वरुण, कुबेर व ब्रह्मदेव यांच्या निरानिराळ्या सभांचें नारदांनीं वर्णन केलें. त्यांवरून इंद्राच्या सभेमध्यें हरिश्चंद्रावांचून दुसऱ्या कोणत्याहि राजास स्थान मिळालेलें नाहीं, असें युधिष्ठिरास दिसून आलें. त्यानें याचें कारण विचारिलें, तेव्हां नारदांनीं हरिश्चंद्राची कथा सांगून, त्यानें राजसूय यज्ञ केल्यामुळें त्यास इंद्रलोकीं स्थान मिळालें, असें सांगितलें. हरिश्चंद्राचें इंद्रलोकांतील वैभव पाहून युधिष्ठिरानेंहि राजसूय यज्ञ करावा असें पांडु राजास वाटून, त्यानें नारदा-पाशीं तसा निरोप सांगितला होता, तोहि नारदानीं युधिष्ठिरास कळविला; आणि पांडुराजाचे आज्ञेप्रमाणें धर्मास राजसूय यज्ञ करावयास सांगून नारद द्वारकेस निघून गेले. (सभापर्व अ० १२)

नारदांनीं सांगितलेला पांडु राजाचा निरोप ऐकून राजसूय यज्ञ करण्याची युधिष्ठिराचे मनांत उत्कट इच्छा उत्पन्न झाली. त्यानें आपले मंत्री बोलावून आणले; आणि ज्याचे शेवटीं यज्ञकर्त्या राजास ' सम्राट ' हें (सार्वभौम राजाचें) पद धारण करावयाचें असतें, तो राजसूय यज्ञ निर्विघ्नपणें शेवटास नेण्याइतकी आपल्या अंगीं योग्यता व सामर्थ्य आहे किंवा नाहीं, याविषयीं त्यांचें मत विचारिलें. राजसूय यज्ञ करण्यास युधिष्ठिर सर्वथैव योग्य आहे, असेंच त्यांनीं मत दिलें. ते म्हणाले:—' आपण न्यायानें राज्य करीत आहां; आपण कोणाचाहि द्वेष करीत नाहीं; आपणांस कोणी शत्रु नाहीं, म्हणून आपणास ' अजातशत्रु ' हें नांव मिळालें आहे. आपले चारी बंधु सर्व पृथ्वीसहि जिंकितील इतके शूर व पराक्रमी आहेत. तेव्हां राजसूय यज्ञ करण्यास व सार्वभौमपद धारण करण्यास आपण योग्य आहां यांत कांहींच संशय नाहीं. ' युधिष्ठिरानें भीमसेन आदिकरून आपल्या बंधूंस व इतर आप्तइष्टांसहि यांविषयीं विचारिलें. त्या सर्वांनीहि मंत्र्यांप्रमाणेंच मत दिलें. परंतु युधिष्ठिरास आपल्या योग्यतेविषयीं व सामर्थ्याविषयीं पूर्ण विश्वास वाटेना. या प्रसंगीं श्रीकृष्णच आपणास योग्य मसलत सांगतील असें मनांत आणून त्यानें द्वारकेस एक दूत पाठवून श्रीकृष्णांस इंद्रप्रस्थास आणविलें; आणि राजसूय यज्ञासंबंधानें त्यांचें मत विचारिलें. राजसूय यज्ञ करावयाचा म्हणजे आधीं चारी दिशाकडील राजे जिंकून त्यांचेकडून आपलें वर्चस्व कबूल करून घ्यावयास पाहिजे. त्याखेरीज राजसूययज्ञ होणें व सार्वभौमपद मिळणें शक्य नाहीं. पण असें करण्यास एक मोठें विघ्न होतें. तें कोणतें, तें श्रीकृष्णानीं धर्मास सांगितलें. ते म्हणाले:— ' मगधदेशांत बृहद्रथ नांवाचा राजा राज्य करीत होता. तो फार बलाढ्य असून त्याचें सैन्य तीन अक्षौहिणी होतें. त्यानें काशीराजाच्या दोघी राजकन्यांशीं विवाह केला होता; परंतु त्यास पुत्रसंतान झालें नाहीं. एके वेळीं चंडकौशिक नांवाच्या ऋषीनें प्रसन्न होऊन त्यास एक पुत्रदायक आम्रफल दिलें, व ' यापासून तुझ्या राण्यांना गर्भ राहील ' असें त्यास सांगितलें. त्या दोनहि राण्या सवती सवती होत्या तरी माहेराकडून त्या सख्या बहिणी असल्यामुळें तें फळ एकीनें न खातां त्यांनीं तें कापून अर्धें अर्धें खाल्लें; व त्या दोघींनाहि गर्भ राहिला.. पुढें त्या प्रसूत झाल्या व पाहतात तों प्रत्येकीस अर्धें अर्धें शरीर असलेलें मूल झालें आहे ! तेव्हां ती दोन्हींही विद्रूप शकलें दासींनीं चवाठ्यावर नेऊन टाकलीं. पण जरा नांवाच्या राक्षसीनें तीं घेऊन जाण्यास सुलभ पडावीं

म्हणून एकत्र करतांच ती एकमेकांस जडलीं गेलीं; व त्यांचें एक जिवंत मूल होऊन रडूं लागलें! राक्षसीनें तें मूल राजवाड्यांत आणून दिलें. जरा राक्षसीनें सांधलें म्हणून त्या मुलाचें पुढें **जरासंध** असें नांव ठेविलें. योग्य वेळीं बृहद्रथ जरासंधास गादीवर बसवून तपोवनांत गेला. जरासंधानें तपश्चर्या करून शंकरास प्रसन्न करून घेतलें; व त्याचे कृपेचे जोरावर त्यानें ८६ राजे जिंकून कारागृहांत ठेविले. इतर राजे त्याचेपुढें थरथर कांपत असून, त्यास कारभार न देणारा असा एकहि राजा नाहीं. आणखी असेच १४ राजे जिंकून आणल्यानंतर त्या १०० राजांना हा जरासंध महादेवास बळी देणार आहे! या जरासंधाच्याच भयानें आम्हीं यादव मथुरा सोडून द्वारकेस जाऊन राहिलों आहों. शिवाय मी कंसाचा वध केल्यापासून तर त्याचें हाडवैर झालें आहे; कारण कंसाची भार्या ती जरासंधाची मुलगी आहे. तेव्हां अशा दुष्ट व प्रबळ राजाचा वध करण्यासाठीं राजरोस सैन्य घेऊन जाऊन युद्ध करणें चांगलें नाहीं. ह्या दुष्ट सार्वभौम जरासंधाचा कांटा काढल्यावांचून राजसूय यज्ञाचा मार्ग निष्कंटक होणार नाहीं. म्हणून मी, भीमसेन व अर्जुन असे तिघे जाऊन आधीं त्याचा वध करतों; आणि मग तूं राजसूय यज्ञ-करण्याचा व सार्वभौमपद धारण करण्याचा विचार कर.' बरोबर कोणासहि न घेतां, जरासंधासारख्या बलाढ्य शत्रूस ठार मारण्यासाठीं या तिघांनींच त्याच्या नगरांत जावें, अशा प्रकारच्या साहसास युधिष्ठिर आपली संमती देईना. परंतु श्रीकृष्णानीं त्याची अनेक प्रकारानें समजूत करून शेवटीं सांगितलें कीं, 'तुला जर माझ्या इच्छेप्रमाणें चालावयाचें असेल, तुझा जर माझ्यावर विश्वास असेल तर भीमार्जुनास तूं माझे स्वाधीन कर. आमच्या जीवाविषयीं तुला काळजी करण्याचें कारण नाहीं. **माझे ठायीं राजनीति, भीमाचे ठायीं बल व अर्जुनाचे ठायीं विजय आहे.** या तिहींच्या संयोगरूपी अग्नीमध्यें जरासंधाला पतंगाप्रमाणें आम्हीं एका क्षणांत भाजून टाकूं.' ही मसलत भीम व अर्जुन यांस पसंत होऊन ती युधिष्ठिरासहि मान्य झाल्यानंतर भीम, कृष्ण व अर्जुन यांनीं स्नातक ब्राह्मणांचे वेष घेतले; आणि कुरुजांगल देशांतून व पद्मसर सरोवराजवळून जाऊन आणि गंडकी, सरयू, शोण, इत्यादि नद्या उतरून शेवटीं ते मगधदेशाच्या 'राजगृह' राजधानीस येऊन पोंचले नगराच्या तटाजवळ असलेला व तेथील सर्व लोकांनीं पूज्य मानिलेला एक 'गिरिशिखर' नांवाचा जय-स्तंभ त्यांनीं पाडून टाकिला; व वेशींतले नगारे

फोडले ! राजमार्गातील माळ्यांच्या व इतर दुकानांमधील पुष्पांच्या माळा वगैरे पदार्थ त्यांनीं बलात्कारानें नेले ! याप्रमाणें नगराच्या राजरस्त्यांत पुंडावा करून ते राजवाड्यामध्यें भलत्याच आडमार्गानें शिरले. हे ब्राह्मण आहेत असें समजून जरासंधानें त्यांचा योग्य सत्कार केला; व ' आपण कोण ? येण्याचें कारण काय ? ' वगैरे विचारपूस त्यानें केली. परंतु श्रीकृष्णानीं सांगितलें कीं हे दोघे स्नातक ब्राह्मण असून त्यांनीं मौनव्रत घेतलें आहे. त्यांची तुमची आज मध्यरात्रीचे सुमारास भेट होईल. ' हें ऐकून त्यानें त्या तिघांना यज्ञशालेमध्यें राहण्यास जागा दिली. ठरल्याप्रमाणें मध्यरात्रीं जरासंध त्यांचे भेटीस गेला; आणि ' आपण खरे स्नातक ब्राह्मण नसून, आपल्या दंडांस धनुष्याची दोरी घांसून पडलेले घट्टे दिसत आहेत; तेव्हां आपण दुसरे कोणी तरी आहां. नगरांत येऊन तुम्हीं राजरस्त्यामध्यें अशी दांडगाई करण्याचें कारण काय ? राजवाड्यामध्यें आपण आडमार्गानें कां शिरलां ? ' वगैरे प्रश्न जरासंध त्यांना विचारूं लागला तेव्हां श्रीकृष्णानीं उत्तर केलें:—' स्नातकव्रत जसें ब्राह्मणांना तसेंच तें क्षत्रिय-वैश्यांनाहि स्वीकारतां येतें; पुष्पें हीं वैभवसूचक आहेत, तेव्हां तीं बाहुबलावर अवलंबून असलेल्या क्षत्रियांनीं बलात्कारानें घेणें हेंच योग्य आहे. शत्रूच्या घरांत आडमार्गानें शिरावें, अशी रीत असल्यामुळें आम्हीं तुझ्या राजवाड्यांत आडरस्त्यानें शिरलों ! ' हें भाषण ऐकून जरासंध मोठ्या बुचकळ्यांत पडला. यांचा आपण अपराध तरी काय केला व यांनीं आपणांस शत्रु कां समजावें, हेंच त्याच्या ध्यानांत येईना. ८६ निरपराधी राजांस कारागृहांत टाकणें किंवा त्यांत १४ ची आणखी भर घालून सर्वांस बळी देण्याचा संकल्प करणें हा भयंकर अपराध आहे व त्याबद्दल ईश्वर आपणांस शासन करील, असें या उन्मत्त राजाचे मनांतहि आलें नाहीं. उलट १०० राजांचा वध करणें हे एक आपण मोठें पराक्रमाचें धर्मकृत्यच करीत आहों, असें वाटत असल्यामुळें जरासंध त्यास म्हणाला:—' तुमचा असा मीं कोणता अपराध केला आहे कीं तुम्हीं मला शत्रु समजावें ! मी अगदीं निरपराधी असतांना असें भाषण करणें तुम्हांस योग्य नाहीं. ' यांवर श्रीकृष्ण आवेशानें म्हणाले:—' ८६ राजांना जिंकून, त्यांना कारागृहांत टाकून व आणखी चवदा जिंकल्यावर त्या सर्वांचा नरयज्ञ करण्याची इच्छा करणारा तूं अधमाधम आपणास निरपराधी समजतोस काय ! **राजानीं राजांचा नुसता अपमान करणें हेंहि अत्यंत निंद्य आहे.** तूं तर त्यांस कैदी करून पुढें त्यांचा पशूप्रमाणें वध

करणार आहेस ! आमच्या अंगामध्यें सामर्थ्य असून जर आम्हीं अशा प्रकारचें अत्यंत क्रूर कर्म होऊं दिलें, तर शंभर राजहत्यांचें पातक आमचे माथीं बसेल याकरितां बंदींत घातलेल्या राजांना सोडून दे; किंवा कृष्ण, भीम व अर्जुन या आम्हां तिघांपैकीं कोणाहि एकाशीं द्वंद्वयुद्ध करण्यास आतांच सिद्ध हो ! ' शायशीं राजांना आपल्या बाहुबलानें जिंकणाऱ्या पराक्रमी व अभिमानी जरासंधानें त्यास सांगितलें कीं, तुम्हां तिघांच्या धमकावणीस भिऊन कारागृहांत ठेवलेल्या राजांस मी सोडून देईन तर क्षात्रतेजास बट्टा येईल. तुमची इच्छा असल्यास मी युद्ध करण्यास एका पायावर तयार आहे. नंतर जरासंधानें आपला पुत्र सहदेव यास गादीवर बसवून भीमसेनाला बाहुयुद्धास हटकलें. या दोघां वीरांचें बाहुयुद्ध कार्तिक महिन्याचे प्रतिपदेपासून चतुर्दशीच्या रात्रींपर्यंत सारखें चाललें होतें ! नंतर जरासंध थोडासा दमलेला दिसतांच भीमसेनानें लगट करून त्यास उचललें व गरगर फिरवून भूमीवर आपटलें; आणि नंतर त्याचा एक पाय दाबून धरून व दुसरा ओढून त्याचें शरीर मधोमध फाडून राक्षसीनें जोडण्यापूर्वीं तो जसा होता तसा त्यास करून टाकिलें ! दुसरें दिवशीं कारागृहांतील सर्व राजे मुक्त करून, सहदेवास सिंहासनावर बसवून व राजसूययज्ञामध्यें युधिष्ठिरास साह्य करण्याचें बंधमुक्त केलेल्या राजाकडून व सहदेवाकडून वचन घेऊन, हे तिघे जरासंधाच्याच सुवर्णरथांत बसून इंद्रप्रस्थास परत आले. कांहीं दिवसांनीं त्याच रथांतून श्रीकृष्णहि द्वारकेस निघून गेले. ( सभापर्व अ० १३–२४ )

राजसूययज्ञाचे मार्गांतील हें जबरदस्त विघ्न याप्रमाणें नाहींसें झाल्यानंतर दिग्विजय करून चारी दिशांचे राजांकडून करभार आणण्यासाठीं अर्जुन, भीम, नकुळ व सहदव हे सैन्यासह इंद्रप्रस्थ नगरांतून बाहेर पडले. अर्जुनानें उत्तर दिशेस जाऊन कुलिंद, प्राग्ज्योतिष वगैरे देशांच्या राजांपासून करभार घेतला. नंतर त्यानें उलूक देशच्या बृहंत राजाचा पराभव केला. पुढे त्रिगर्त लोकांना जिंकून तो श्वेतपर्वतावर गेला. तेथून किंपुरुष, उत्तरकुरु वगैरे लोकांपासून करभार घेऊन तो इंद्रप्रस्थास परत आला. पूर्व दिशेकडे भीमसेन गेला होता. त्यानें आरंभीं पांचाल आदिकरून लोकांपासून करभार घेतला. चेदी देशाचा राजा शिशुपाल यानें युद्ध न करितां त्याचा गौरव करून व करभार देऊन त्यास वाटेस लाविलें. नंतर कोसल, अयोध्या, मत्स्य, विदेह, सुम्ह. म्लेंच्छ, इत्यादि देशांचे व लोकांचे राजांना जिंकून भीमसेन इंद्रप्रस्थास परत आला. दक्षिणेकडील राजांना जिंकण्यासाठीं सहदेवास पाठविलें होतें. त्यानें पुलिंद,

शूरसेन, वगैरे लोक जिंकून, किष्किंधा येथील मैंद व द्विविद यांचेपासून करभार घेतला. माहिष्मतीचा राजा नील याजपासूनहि खंडणी घेऊन त्यानें म्लेंच्छ, केरल, आंध्र इत्यादि लोक जिंकिलें; व शेवटीं लंकेच्या बिभीषणापासून करभार घेऊन तो इंद्रप्रस्थास परत आला. पश्चिम दिशेस नकुलास पाठविलें होतें. त्यानेंहि दशार्ण, मरुदेश, उत्सवसंकेत, पंचनद, हूण इत्यादि देश व लोक जिंकून पुष्कळ करभार इंद्रप्रस्थास आणिला. याप्रमाणें चारहि दिशांचे राजे जिंकून आणिलेलें धन, धान्य, हत्ती, घोडे, बहुमोल वस्त्रें वगैरे सर्व या चारी भावांनीं युधिष्ठिरासच अर्पण केलें. पांडवांचें जें सामर्थ्य होतें त्याचें बीज यांतच होतें. दिग्विजय करून जें धन मिळविलें, जें यश व जी कीर्ति संपादन केली, तिची स्वतःसाठीं मुळींच अपेक्षा न करितां त्यांनीं तें सर्व युधिष्ठिरास आपल्या वडील भावास अर्पण केलें, हेंच त्यांच्या विजयाचें मर्म होय. [ सभापर्व अ० २५–३२ ]

महाभारत वाचीत असतां प्राचीन काळीं या भरतभूमीमध्यें किती अपार संपत्ति होती, तें कळून येऊन त्या स्थितीची सध्याच्या हीन दीन स्थितीशीं तुलना केली असतां मन अत्यंत उद्विग्न होऊन जातें. त्याकाळीं कुशल कारागिरांनीं बांधिलेले विस्तीर्ण व भव्य राजवाडे, त्यांतील संपत्ति, सोन्याच्या जाळ्या लाविलेल्या नक्षीदार खिडक्या, आंतील छतांना वगैरे लाविलेलीं मोतीं व रत्नें, इत्यादिकांचें भारतांतील वर्णन वाचून मन अगदीं आश्चर्यचकित होऊन जातें. राजसूययज्ञाचे वेळीं मोठमोठ्या राजांनीं युधिष्ठिराकडे जो नजराणा आणला होता व पांडवांनीं जी खंडणी इंद्रप्रस्थास आणली होती, त्यांमध्यें बहुमूल्य रत्नें, सोन्याचीं नाणीं, सोन्याचे तांब्यें व ताटें, रत्नखचित हस्तिदंती मुठीच्या व आकाशाप्रमाणें अस्मानी रंगाच्या उत्कृष्ट पाणीदार तरवारी, रत्नांच्या जडावांचीं कामें केलेलीं चिलखतें, उत्तम शृंगारलेले रथ, बारीक व तलम लोंकरीचीं व रेशमाचीं वस्त्रें, इत्यादि आणलीं असें वर्णन आहे. तसेंच कांहीं राजांनीं बहुमूल्य भरजरी सामानासह उत्तम जातीचे हत्ती व हत्तिणी, बाल्हीक ( बल्क ), आनर्त ( काठेवाड ), वनायुदेश्य ) ( इराण ), इत्यादि देशांतील जातीवंत घोडे, वगैरे नजराण्यादाखल पाठविले होते. भरतखंडांतील प्राचीन काळची अपार संपत्ति, अपूर्व वैभव व त्या वेळची प्रजेची पराकाष्ठेची भरभराट याचें चित्र जर कोणास पहावयाचें असेल तर महाभारतादि ग्रंथांतील राजसूय, अश्वमेध इत्यादि मोठ्या यज्ञांचीं वर्णनें लक्षपूर्वक वाचावीं.

त्या वेळच्या सामान्य लोकांचीहि स्थिति ‘ हृष्टपुष्टजनाकीर्ण ’ ( आनंद व शरीरसामर्थ्य यांचें सुख अनुभवणाऱ्या प्रजेनें गजबजलेला देश ) अशा तऱ्हेच्या अनेक विशेषणांवरून चांगली लक्षांत येणार आहे. ज्या काळीं ब्राह्मण इंद्रियनिग्रह करणारे, तपोनिष्ठ, सत्यवादी, सात्त्विक वृत्तीनें राहणारे व सर्व जनसमूहाला सन्मार्ग दाखविणारे होते ; क्षत्रिय कर्तव्यदक्ष, धर्मशील, शूर, पराक्रमी व धर्माकरितां, सत्याकरितां आणि प्रजेकरितां प्राणहि देण्यास तयार होणारे असे होते ; व इतर सर्व सामान्य जनसमूह धार्मिक व पापभीरु होता ; त्या काळीं अर्थात् सर्व देशामध्यें जिकडे तिकडे समाधान, भरभराट व आनंद यांचेंच साम्राज्य असावें, यांत मुळींच आश्चर्य नाहीं.

सर्व राजांपेक्षां पराक्रमानें, शौर्यानें व वैभवानें आपण श्रेष्ठ आहों, असें पांडवांनीं दिग्विजय करून सर्व जगास दाखविल्यानंतर युधिष्ठिरानें राजसूय-यज्ञाची तयारी केली; व द्वारकेहून श्रीकृष्णास आणविलें. याज्ञवल्क्य, सुसामा, पैल, इत्यादि ऋषींना यज्ञांतील निरनिराळीं कामें देऊन स्वतः भगवान् व्यास यज्ञांतील ब्रह्मा झाले. सर्व देशांचे राजे, शूर, क्षत्रिय, धनवान्, वैश्य आणि मान्य शूद्र यांना यज्ञाचीं आमंत्रणें करण्यास युधिष्ठिरानें दूत पाठविले. हे सर्व लोक जमल्यानंतर, भीष्म, द्रोण, धृतराष्ट्र, विदुर, कृप, दुर्योधन, इत्यादिकांनाहि बोलावणें करण्यासाठीं युधिष्ठिरानें नकुलास हास्तिनापुराला पाठविलें. हास्तिनापुराहून ही सर्व मंडळी आल्यानंतर समारंभांतील निरनिराळीं कामें त्यानें सन्मानपूर्वक कौरवांनाच दिलीं. धान्य व फळफळावळ याविषयींचा अधिकार दुःशासनाकडे दिला; ब्राह्मणांचें आगतस्वागत करणें आश्वत्थाम्याकडे, राजे लोकांचें स्वागत करणें संजयाकडे, हरएक गोष्ट योग्य रीतीनें झाली आहे किंवा नाहीं हें पाहणें. भीष्म-द्रोणाकडे सोनें, रत्नें व दक्षिणा यांजवर देखरेख करण्याचें काम कृपाचार्यांकडे, सर्व प्रकारचें पैसा खर्च करण्याचें काम विदुराकडे, आणि राजे लोकांनीं आणलेल्या नजराण्यांचा स्वीकार करणें दुर्योधनाकडे, याप्रमाणें कामें सोंपविलीं होतीं. ब्राह्मणांचे पाय धुण्याचें काम स्वतः श्रीकृष्णांनीं पत्करिलें होतें ! याप्रमाणें सर्व व्यवस्था झाल्यानंतर युधिष्ठिरानें दीक्षा घेऊन यज्ञास प्रारंभ केला. यज्ञ बरेच दिवस निर्विघ्नपणें चालला. पुढें सर्व राजे अभिषेचनीय दिवशीं यज्ञमंडपांतील अंतर्वेदीवर येऊन बसले; नंतर सर्व राजांहून श्रेष्ठ असेल त्यास अग्रपूजेचा मान देऊन व त्याची आरंभीं पूजा करून नंतर इतर राजांची ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें अर्घ्यपूजा करावयाचा समय प्राप्त झाला. ‘ अग्रपूजे’चा मान

कोणास द्यावयाचा असें युधिष्ठिरानें भीष्मास विचारिलें असतां, 'तेज, बल, पराक्रम व इतर गुण यांहींकरून सर्वांहून श्रेष्ठ असणारे श्रीकृष्णच या मानास योग्य आहेत' असें त्यांनीं उत्तर दिलें. नंतर भीष्मांच्या या अभिप्रायाप्रमाणें सहदेवानें श्रीकृष्णांची यथाविधि 'अग्रपूजा' केली; व त्यांनींहि तिचा सत्कारपूर्वक स्वीकार केला. हें पाहून चेदि देशाच्या शिशुपाल नामक राजाच्या तळव्याची आग मस्तकास जाऊन, त्यानें युधिष्ठिर, भीष्म व श्रीकृष्ण यांची मनःपूत निंदा चालविली. तो म्हणालाः—'पांडवांनीं कृष्णाची अग्रपूजा केली हें अगदीं अयोग्य केलें. कृष्ण राजा नाहीं व त्यास छत्रचामराचाहि अधिकार नाहीं. असें असतां त्याची अग्रपूजा करणें म्हणजे येथें जमलेल्या सर्व राजांचा उपमर्द करणें आहे. कृष्ण वयोवृद्ध आहे म्हणून त्याची अग्रपूजा केली, असें म्हणावें तर वसुदेव त्याच्या पेक्षांहि वयोवृद्ध आहे. आपला वृद्ध सासरा द्रुपद याची पूजा पांडवांनीं करावयाची होती; किंवा आपले आचार्य द्रोणगुरु यांना किंवा या यज्ञांतील मुख्य ऋत्विज भगवान् व्यास यांना तो मान द्यावयाचा होता. परंतु जो राजा नाहीं, आचार्य नाहीं, ऋत्विज नाहीं, सर्वांहून वयोवृद्ध नाहीं व आप्तांमध्यें वडीलहि नाहीं, अशा कृष्णाची अग्रपूजा यांनीं कां केली ? पांडवांना जर कृष्णाचीच पूजा करावयाची होती तर त्यांनीं सर्व राजांना येथे बोलावून आणून त्यांचा असा अपमान कां केला ? आम्ही जो युधिष्ठिरास कारभार दिला, तो त्याच्या शौर्याची व पराक्रमाची आम्हांस भीति वाटली म्हणून दिला, असें नव्हें; तर या यज्ञासारख्या धर्मकार्यास मदत व्हावी म्हणून दिला. असें असून हा युधिष्ठिरच उलट आमचा अपमान करितो, यास काय म्हणावें ? पांडवांनीं एक मूर्खपणानें कृष्णास अग्रपूजेचा मान दिला; परंतु आपली वास्तविक योग्यता लक्षांत आणून कृष्णानें तरी तिचा स्वीकार करावयाचा नव्हता ! युधिष्ठिर व भीष्म हे कितपत धर्मज्ञ आहेत व कृष्णाची खरी योग्यता काय आहे, तें आज आम्हां सर्वांस कळून आलें !' असें म्हणत म्हणत शिशुपाल रागानें यज्ञमंडपांतून बाहेर जाऊं लागला. युधिष्ठिर त्याचें सांत्वन करूं लागतांच भीष्मांनीं त्याचा निषेध केला. ते म्हणालेः— "सर्वांहून वडील, सर्वांचा आचार्य, सर्वांचा गुरु, सर्वांचा भाऊबंद, सर्व राजांमध्यें पराक्रमानें श्रेष्ठ. अशा श्रीकृष्णाची केलेली अग्रपूजा ज्यास आवडली नाहीं तो सांत्वन करण्याचे योग्यतेचा मनुष्य नाहीं." "सर्व राजांसमक्ष मीं केलेली श्रीकृष्णाची पूजा ज्या कोणास आवडली नसेल त्या सर्वांच्या छातीवर पाय देऊन उभा राहण्यास मी तयार आहें; श्रीकृष्णांचा हा सन्मान

ज्याला आवडला नसेल त्यानें तसें म्हणावें, म्हणजे मी त्याचा तात्काळ वध करितों " असें सहदेवहि त्वेषानें म्हणाला. तें ऐकतांच शिशुपालानें आपल्या पक्षास कांहीं राजे अनुकूल करून घेऊन त्या राजसूय यज्ञास विघ्न करण्याचा निश्चय केला. शिशुपालाचा हा बेत पाहून यज्ञाचें रक्षण करण्याची काय तजवीज करावी, असें धर्मानें भीष्मांस विचारिलें. तेव्हां ते म्हणाले:— " युधिष्ठिरा, तुला त्याची काळजी नको. शिशुपालाचा समाचार घेण्यास एकटा श्रीकृष्णच समर्थ आहे. " पुनः शिशुपालानें श्रीकृष्णाची, पूतना स्त्रीचा वध केल्याबद्दल, जरासंधास कपटानें मारिल्याबद्दल, ज्याचें अन्न खाल्लें त्या कंसाला ठार केल्याबद्दल, सारखी निंदा चालविली, नंतर भीष्मांनाहि अद्वा-तद्वा बोलून त्यांच्या ब्रम्हचर्याचें खरें कारण प्रतिज्ञा हें नसून मूर्खपणा किंवा क्लीबत्व असावें असेहि तो म्हणाला ! हें ऐकतांच हातांत गदा घेऊन भीमसेन शिशुपालाच्या अंगावर धांवून जाऊं लागला. परंतु त्यास आवरून धरून भीष्मांनीं शिशुपालाचें पूर्ववृत्त सर्वांस सांगितलें. ते म्हणाले:— ' हा शिशु-पाल जन्मला त्या वेळीं त्याला तीन डोळे व चार हात होते ! अशा कुरूप मुलास त्याची आई ( श्रीकृष्णांची आत्या ) टाकून देणार होती. परंतु, हा पुढें बलाढ्य होईल व याची कुरूपता नाहींशी होईल, अशी आकाशवाणी झाल्या-मुळें तिनें त्यास तसेंच पाळिलें. ज्याचे मांडीवर हा ठेवला असतां याचे दोन हात गळून पडून तिसरा डोळाहि नाहींसा होईल, तो या मुलाचा शत्रु आहे, असेंहि शिशुपालाच्या आईला कळलें. एके दिवशीं श्रीकृष्ण आपल्या आतेच्या घरीं आले असतां शिशुपालास तिनें श्रीकृष्णाचे मांडीवर ठेविलें; तोंच त्याचा तिसरा डोळा नाहींसा होऊन दोन हात गळून पडले ! हें पाहून शिशुपालाचा हाच शत्रु आहे, असें जाणून ' शिशुपालाच्या अपराधांची क्षमा करीन ' असें श्रीकृष्णानें वचन द्यावें, अशी तिनें इच्छा दर्शविली. तेव्हां त्यांनीं त्याचे शंभर अपराधांची क्षमा करण्याचें अभिवचन दिलें. या शिशुपालाचे शंभर अपराध आतां भरत आले आहेत, तेव्हां श्रीकृष्णाचे हातून याचा लवकरच वध होणार आहे. भीमसेना, तूं त्याशीं युद्ध करण्याचें कारण नाहीं. ' यानंतर श्रीकृष्णाची व्यर्थ स्तुति केल्याबद्दल शिशुपालानें भीष्मांची अतिशय निर्भर्त्सना केली; व शेवटीं तो म्हणाला:—' ज्यांचा तुम्ही अपमान केला त्या या सर्व राजांचे मनांत तुमचा वध करण्याचें अझून आलें नाहीं, म्हणूनच, म्हाताऱ्या, तूं अद्याप जिवंत आहेस. ' त्यावर ' या सगळ्या राजांची किंमत मी कस्पटापेक्षांहि हलकी

समजतों ' असें भीष्मांनीं उत्तर करितांच सर्व राजे अत्यंत क्षुब्ध झाले. आणि 'हा थेरडा फारच गर्विष्ठ व उमट झाला आहे, याला क्षमा करूं नका. याला पशूप्रमाणें ठार करा, किंवा तापलेल्या तेलाच्या कढईत याला.' टाका. असें ' ते उन्मत्तपणें ओरडूं लागले! तरी भीष्मांसारखा वृद्ध व कसलेला वीर मुळींच डगमगला नाहीं. ते म्हणाले:— 'सर्व राजांचे छातीवर पाय देऊन आम्हीं श्रीकृष्णाची अग्रपूजा केली आहे; ती ज्यालों मान्य नसेल त्यानें श्रीकृष्णा-बरोबर युद्ध करण्यास तयार व्हावें.' यानंतर शिशुपालानें निर्भर्त्सनापूर्वक श्रीकृष्णांस युद्धास हटकतांच श्रीकृष्णानें शांतपणानें उत्तर केलें:—' या शिशु-पालानें माझें हाडवैर पूर्वीपासूनच साधलें आहे. आम्ही प्राग्ज्योतिष देशास गेलों असतां, आमचे मागें यानें द्वारकेस आग लाविली. वसुदेवांनीं केलेल्या अश्वमेध यज्ञांत विघ्न करण्यासाठीं यानें घोडा पळवून नेला. तसेंच सौवीर देशाकडे पाठविलेली बभ्रु नांवाच्या यादवाची भार्या व कारूष देशाच्या राजाची राजकन्या यानें कपटानें हरण केली. अशा प्रकारच्या याच्या १०० अपराधांची क्षमा मी केली आहे. शिवाय, या मूर्खानें पूर्वी रुक्मिणीशींहि विवाह करण्याची खटपट चालविली होती.' हें शेवटचें वाक्य ऐकून शिशुपाल मोठ्यानें हांसून उपहासपूर्वक म्हणाला:—' माझी भार्या पूर्वी दुसऱ्याला देऊं केली होती, असें या सर्व राजांसमक्ष आपण होऊनच सांगतांना तुला लाज कशी वाटत नाहीं?' हे शब्द ऐकतांच, हा एकंदर प्रकार काय होत आहे हें समजण्यापूर्वीच, श्रीकृष्णांनीं तात्काळ सुदर्शनचक्राचें स्मरण करून तें हातीं येतांच शिशुपालावर सोडलें व क्षणार्धांत त्याचें शिर उडविलें! हें अघटित कृत्य पाहतांच सर्व राजांचे मनांत दहशत बसली; व यापुढें कोणींहि त्या यज्ञामध्यें विघ्न करण्याचें मनांतहि आणलें नाहीं. यापुढें यज्ञाचें रक्षण स्वतः श्रीकृष्णांनीं केल्यावर यज्ञ संपला. शेवटीं अवभृथ-स्नान वगैरे होऊन युधिष्ठिरास सम्राट ( सार्वभौमराजा ) हे पद यथाविधि देण्यांत आलें. धर्मराजानें सर्व राजांना व ऋषींना सन्मानपूर्वक निरोप दिला. नंतर धर्माला सार्वभौमपद प्राप्त झाल्याबद्दल कुंती, द्रौपदी व सुभद्रा यांचें अभिनंदन करून श्री-कृष्णहि द्वारकेस निघून गेले. व्यासहि कैलासास निघाले; पण निघते वेळीं ते धर्मास म्हणाले:—

दुर्योधनापराधेन भीमार्जुनबलेन च ॥
त्वमेकं कारणं कृत्वा कालेन भरतर्षभ ॥

**समेतं पार्थिवं क्षत्रं क्षयं यास्यति भारत ॥**

तुझ्या निमित्तानें, दुर्योधनाचे अपराधामुळें आणि भीमार्जुनांच्या पराक्रमानें ह्या सर्व राजांचा व क्षत्रियांचा कांहीं वर्षांनीं संहार होणार आहे! हें भविष्य ऐकून युधिष्ठिराचें मन अत्यंत उद्विग्न झालें; व त्या दिवसापासून तेरा वर्षेंपर्यंत आपल्या मनांत शत्रु-मित्र ही भेदबुद्धि ठेवावयाची नाहीं व कोणास कठोर भाषणानेंहि दुखवावयाचें नाहीं, अशी त्यानें प्रतिज्ञा केली. ( सभाप अ० २४-४६ )

राजसूय यज्ञासाठीं आलेले ऋषि, ब्राह्मण, राजे वगैरे सर्व निघून गेल्यानंतर दुर्योधन सभागृहाची शोभा पाहण्यासाठीं मागें राहिला. तो शोभा पाहात फिरत असतां स्फटिकाची फरशी केलेली जमीन पाहून, तें पाणी आहे असें समजून त्यानें वस्त्रें वर धरिलीं; व पाण्यालाच स्फटिकभूमि समजून तो त्यामध्यें पडला! बंद केलेलें स्फटिकाचें दार उघडें आहेसें वाटून तो जाऊं लागतांच त्याचें कपाळ त्यावर आपटलें व उघडें असलेलें दार लावलेलें आहेसें वाटून तें उघडावयास जातांच तो तोंडघशीं पडला! ही त्याची फजीती पाहून भीम, अर्जुन वगैरे पांडव, त्यांचे चाकरनोकर व द्रौपदी वगैरे स्त्रियाहि त्यांस हंसल्या! हें त्यांचें हसें दुर्योधनाचे हृदयांत घुसून शल्याप्रमाणें बोचूं लागलें. स्फटिकाचे भिंतीवर जेव्हां त्याचें कपाळ आपटलें, त्या वेळीं भीमसेन हांसत हांसत ‘ धृतराष्ट्रसुत हें दार नव्हें, ही भिंत आहे ’ असें म्हणाला, तें तर त्याच्या अंतःकरणास फारच झोंबलें! पांडवांची संपत्ति, त्यांचा लौकिक व कीर्ति, निरनिराळ्या राजांनीं आणलेले नजराणे, त्याचप्रमाणें पांडवांची सारखी भरभराट होत असून आपला ऱ्हास होत आहे, हें पाहून मत्सरानें त्याचें अंतःकरण भडकून गेलें. ‘ आपणास कोणत्याना कोणत्या तरी उपायांनीं ही संपत्ति न मिळल्यास आपण जीव देऊं, ’ असेंहि त्यानें आपल्या शकुनिमामांजवळ बोलून दाखविलें. मामांनीं भाच्याचें सांत्वन केलें:— ‘ धर्मराजाला द्यूत खेळण्याचा नाद आहे, परंतु त्यांत तो विशेष प्रवीण नाहीं. तरी त्यांना द्यूतास बोलाविलें असतां तो ‘ नाहीं ’ म्हणणार नाहीं. मी द्यूतामध्यें चांगला निपुण आहे. धृतराष्ट्राकडून त्याला द्यूत खेळावयास आणवा, म्हणजे त्याची ही अपार संपत्ति व हें सर्व राज्य मी तुला मिळवून देतों! ’ ही मसलत दुर्योधनास पसंत पडून द्यूताची गोष्ट शकुनीनें धृतराष्ट्रापाशीं काढावी असें ठरलें. त्याप्रमाणें हस्तिनापुरास परत आल्यानंतर तुमचा वडील मुलगा दुर्योधन हा अलीकडे अशक्त, फिकटलेला आणि कृश

झाला आहे, असें शकुनीनें धृतराष्ट्रापाशीं बोलणें काढलें. तेव्हां 'पांडवांचें वैभव व संपत्ति पाहून माझ्या अंतःकरणांतील शांति नाहींशी झाली आहे व मला चैन पडत नाहीं' असें दुर्योधनानें म्हटलें. लागलीच शकुनीनें, 'ती संपत्ति मीं द्यूत खेळून दुर्योधनास मिळवून देईन' असें हळूच सुचविलें! 'यासंबंधानें धर्मात्म्या विदुराचें मत मला घेतलें पाहिजे' असें धृतराष्ट्रानें म्हणतांच दुर्योधन अतिशय त्रासून म्हणालाः-- 'विदुर कांहीं केल्या द्यूत खेळूं देणार नाहीं; तुम्हीहि त्याचेंच म्हणणें ऐकणार व माझी इच्छा तृप्त न झाल्यामुळें मी मरून जाणार! मी मेल्यावर विदुरासह या राज्याचा तुम्ही सुखानें उपभोग घ्या!' विदुराचें मत द्यूत खेळूं नये असें आहे, हें पाहून धृतराष्ट्रानें दुर्योधनाचें मन वळविण्याचा पुनः प्रयत्न केला. परंतु पांडवांच्या सभेमध्यें आपल्या काय व कशा चुक्या झाल्या, भीम आपणास 'अंधसुत'-आंधळ्यांचा मुलगा-कसें म्हणाला, पांडवांचें धन किती अगणित आहे, राजे लोकांकडून आणलेलीं रत्नें, वस्त्रें, हत्ती, घोडे इत्यादि करभार किती अपरमित आहे, सार्वभौमपद धारण करण्याचे वेळचा युधिष्ठिराचा अभिषेक-समारंभ किती अपूर्व होता, या सर्वांचें दुर्योधनानें मोठ्या विस्तारानें वर्णन केलें. आपल्या पुत्राचे मनांत पांडवांविषयींचा मत्सर पूर्णपणें बाणला आहे, असें पाहून धृतराष्ट्रास फार वाईट वाटलें. तो म्हणालाः—' दुर्योधना, आपलें जेवढें राज्य आहे तेवढ्यांतच संतोष मानणें श्रेयस्कर आहे. तुम्हा कौरवपांडवांचें राज्य सारखें आहे, तुमचा पराक्रमहि सारखाच आहे. यासाठीं त्यांचें वैभव पाहून त्यांचा द्वेष व मत्सर करणें चांगलें नव्हें. द्यूतानें कलह होऊन त्यामुळें राज्य व कुळ यांस धोका येईल. पांडव हे भरतकुलाचे बाहु आहेत; त्यांना तोडून टाकण्याची इच्छा तूं धरूं नको.' धृतराष्ट्रानें याप्रमाणें बहुत प्रकारानें सांगितलें; परंतु दुर्योधनानें आपला हेका सोडिला नाहीं. पांडवांचें राजसूय-यज्ञांतील वैभव पाहून त्याचें मन जें एकदां मत्सरानें ग्रासलें तें कांहीं केल्या शुद्ध झालें नाहीं. शेवटीं पुत्रप्रेमाच्या पाशांत सांपडलेल्या धृतराष्ट्रानेंहि द्यूत खेळण्यास त्यांना परवानगी दिली; त्यासाठीं एक सभास्थान तयार करविलें. द्यूतासाठीं युधिष्ठिरास बोलावणें करण्यास विदुराला पाठविण्याचे ठरलें. विदुरास ही हकीकत समजतांच, 'ह्या कृत्यास माझी मुळींच संमति नाहीं, या द्यूतापासून कलह उत्पन्न होऊन खात्रीनें अनर्थ ओढवेल हें मी आधीं सांगून ठेवतों' असें विदुरानें बजाविलें. तेव्हां धृतराष्ट्रानें उत्तर केलें:--' द्यूत

खेळावयाचें तें मित्रत्वाचें द्यूत खेळावयाचें आहे; मी, तूं, भीष्म, द्रोण, कृप यांच्यासारख्या वडील माणसांसमक्ष कलह होण्याचा मुळींच संभव नाहीं असें सांगून त्यानें विदुरास इंद्रप्रस्थास पाठविलें. त्यानें धृतराष्ट्राचा निरोप इंद्रप्रस्थास जाऊन युधिष्ठिराला कळविला. द्यूतापासून कलह व अनर्थ ओढवतात; असें असतांहि धृतराष्ट्रासारख्या वडील माणसानेंच द्यूताची गोष्ट काढावी हें बरें नव्हे असें म्हणून याविषयीं धर्मराजानें विदुराचें मत विचारलें. ' मीं धृतराष्ट्रास हें द्यूत न करण्याविषयीं पुष्कळ सांगून पाहिलें. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. त्यांचा हा निरोप मीं तुला कळविला आहे; यापुढें जें तुला श्रेयस्कर दिसेल तें तूं कर ' असें विदुरानें उत्तर केलें; तेव्हां ' कांहीं असो, युद्धास किंवा द्यूतास कोणीं बोलाविलें असतां माघार घ्यावयाची नाहीं, हें माझें व्रत मला मोडतां येत नाहीं ' असें म्हणून युधिष्ठिरानें हस्तिनापुरास जाण्याची तयारी केली. बरोबर आपले चौघे भाऊ व द्रौपदी यांना घेऊन तो हस्तिनापुरास येऊन पोंचला. दुसरे दिवशीं सकाळीं सर्वजण व्यायाम, स्नान, पूजाअर्चा, फलाहार वगैरे आटपून द्यूतसभेमध्यें येऊन बसले. भीष्म, द्रोण, विदुर, कृप हेहि मोठ्या नाखुषीनें तेथें आले, **द्यूत हें एक प्रकारचें पाप आहे, कपट आहे; आर्यांनीं याचे नादीं लागूं नये.** तथापि द्यूत खेळणेंच असेल तर तें कपटानें तरी खेळूं नका ' असें युधिष्ठिर म्हणाला. त्यांवर शकुनीनें उत्तर केलें:–'प्रबळानें दुर्बळास, विद्वानानें अविद्वानास आणि द्यूतनिपुणानें त्यांतील गैर वाकबगारास जिंकिलें, तर त्यांत कपट कसलें ? द्यूतामध्यें मी तुझें सर्वस्व हरण करणार, याची जर तुला भ्याडाला भीति वाटत असेल-तर तूं मुळींच खेळूं नकोस. ' हें बोलणें युधिष्ठिरास फारच लागलें; व कांहीं झालें तरी माघार घ्यावयाची नाहीं, या ईर्षेनें तो खेळावयास बसला. आपल्याबद्दल आपला मामा शकुनि खेळेल, असें दुर्योधनानें सांगितलें, तेव्हां एकाबद्दल दुसऱ्यानें खेळणें हें द्यूताचे नियमांविरुद्ध आहे, अशी एक सबब धर्मानें पुढें आणली; परंतु ती कोणीहि ऐकिली नाहीं. द्यूतास सुरुवात होतांच धर्मानें प्रथम मोत्यांची एक बहुमोल कंठी पणास लाविली, दुर्योधनानेंहि कांहीं रत्नें उलट पणास लाविलीं. शकुनीनें पहिला डाव टाकून ' जितमेव ' ( ही जिंकिली पहा ! ) असें म्हणून ती कंठी जिंकिली. नंतर युधिष्ठिरानें रत्नानीं भरलेल्या पेट्या पणास लाविल्या, त्याहि शकुनीनें ' जितं ' म्हणून जिंकिल्या. याप्रमाणें युधिष्ठिरानें एकामागून एक पणास लाविलेले युद्धोपयोगी रथ, रथाचे घोडे,

अलंकारांसह हजारों सुंदर व तरुण दासी, दास, सर्व साज घालून शृंगारलेल्या आठ हत्तिणी, सामान्य रथ, चित्ररथ गंधर्वानें अर्जुनास दिलेले उत्तम घोडे वगैरे सर्व शकुनीनें हरण करून घेतलें ! याप्रमाणें कपटाच्या द्यूतानें पांडवांचें सर्वस्व भराभर हरण होत आहे, असें पाहून विदुरानें ह्याचा प्रतिकार करण्यास धृतराष्ट्रास सांगितलें. तो म्हणाला:—' पांडवांना द्यूतामध्यें जिंकून शकुनि दुर्योधनासाठीं त्यांची सर्व संपत्ति हरण करून घेत आहे, हें पाहून धृतराष्ट्रा, तुला आनंद होत आहे; पण दुर्योधनाच्या या अन्यायाचे कृत्यामुळें घोर युद्ध होऊन आपला कुलक्षय खास होणार. दुर्योधन, हा तुझ्या राजवाड्यामध्यें अशुभसूचक गोमायु ( कोल्हा ) शिरला आहे, यास टाकून देण्यांतच तुझें कल्याण आहे. **कुलाचे हितासाठीं एका पुरुषाचा त्याग करावा; एका गांवचे सुरक्षितपणासाठीं एका कुटुंबाचा त्याग करावा; देशाकरितां एका गांवाचा त्याग करावा; आणि आपल्या आत्म्याचे कल्याणाकरितां पृथ्वीचाहि त्याग करावा.** पांडवांचें धन हरण करून घेण्यांत तुझें असें कोणतें हित होणार आहे ? त्यांनाच वश करून घेऊन त्यांची अंतःकरणें हिरावून घेण्यांत तुझें अधिक कल्याण नाहीं काय ? माझ्या या बोलण्याचा धिक्कार करून जर तुम्ही पांडवांशीं कलह माजवाल तर सर्वांचा समूळ नाश होईल ! ' विदुराचें भाषण ऐकून दुर्योधनाचें चित्त खवळलें. 'आमचें अन्न खाऊन तुम्ही आमच्या शत्रूंशींच सख्य करूं पहात आहां. तुम्ही इतके कृतघ्न आहां हें मला पूर्वींच ठाऊक होतें. पांडव चांगले असले तर त्यांच्याकडे किंवा दुसऱ्या कोणाकडे तुम्हांला जावयाचें असेल तर खुशाल निघून जा. व्यभिचारिणी स्त्रीची कितीहि मनधरणी केली तरी ती आपल्या पतीला सोडून गेल्यावांचून कधींहि रहावयाची नाहीं; त्याप्रमाणें तुमची कृति आहे. ' दुर्योधनाचें हें उद्दामपणाचें भाषण ऐकून विदूर शांतपणानें म्हणाला:—' दुर्योधना, नेहमीं प्रिय बोलणारे मंत्री तुला हवे आहेत; परंतु अशा मंत्र्यांपासून तुझें कल्याण व्हावयाचें नाहीं, हें तूं खास समज.

**लभ्यते खलु पापीयान्नरो नु प्रियवागिह ।**
**अप्रियस्य हि पथ्यस्य वक्ता श्रोता च दुर्लभः ॥**
**यस्तु धर्मपरश्च स्याद्धित्वा भर्तुः प्रियाप्रिये ।**
**अप्रियाण्याह पथ्यानि तेन राजा सहायवान् ॥**

**राजाला रुचेल असें बोलणें बोलणारे पुष्कळ पापी लोक मिळतील परंतु अप्रिय पण हितकारक असें भाषण करणारा वक्ताहि दुर्लभ व तें शांतपणानें ऐकून घेऊन त्याप्रमाणें वागणारा श्रोताहि दुर्लभ आहे. राजास रुचो अथवा न रुचो, त्याला जें श्रेयस्कर तेंच सांगणारे जे मंत्री तेच राजाचे खरे सहाय्यकर्ते** होत. माझा भाऊ धृतराष्ट्र व त्याचे पुत्र यांचे हित व्हावें अशीच माझी इच्छा असल्यामुळें मी भाषण करीत आहे. हें जर तुम्हांला मानवलें नाहीं तर त्याचा मजकडे काय दोष आहे ? ' विदुरानें इतका उपदेश केला तरी त्याचा कांहीं उपयोग न होतां पालथ्या घागरीवर पाणी ओतल्याप्रमाणें त्याचे श्रम व्यर्थ गेले.

यानंतर पुनः द्यूतास प्रारंभ झाला. आपल्या प्रजाजनांतील ब्राह्मणांशिवाय बाकीचें आपलें राज्य युधिष्ठिरानें पणास लाविलें; व तें शकुनीनें जिंकिलें ! नंतर युधिष्ठिरानें पणास लाविलेले आपले राजपुत्रहि कपटी शकुनीनें जिंकून घेतले ! याप्रमाणें सर्वस्वहीन झालेल्या युधिष्ठिराजवळ आतां त्याचे भाऊ व बायको यावांचून कांहींहि शिल्लक राहिलें नाहीं ! तरी तो द्यूत खेळणें बंद करीना. एकादा शूर क्षत्रिय ज्याप्रमाणें प्राणान्त होईपर्यंत निश्चयानें लढत असतो, त्याप्रमाणें हा द्यूतासक्त धर्म आपला सर्वस्व नाश होईपर्यंत द्यूत खेळावयास तयार झाला ! युधिष्ठिरानें आपल्या प्रत्येक भावाची मोठ्या प्रेमानें स्तुति करून क्रमाक्रमानें नकुल, सहदेव, अर्जुन व भीम हे पणाला लाविले व ते शकुनीनें तत्काळ प्रत्येक वेळीं आनंदानें ' जितमेव ' म्हणून जिंकून घेतले. शेवटीं त्यानें आपणा स्वतःस पणाला लाविलें, व त्यासाहि शकुनीनें जिंकून टाकिले ! याप्रमाणें पांचहि पराक्रमी पांडव धर्माच्या द्यूतसक्तीमुळें एका घटकेत कौरवांचे दास बनून गेले !

इतक्यांत मोठ्या दयाळूपणाचा आविर्भाव आणून शकुनि युधिष्ठिरास म्हणालाः—' अरे अरे युधिष्ठिरा, तुजजवळ दुसरें धन शिल्लक राहिलें असून आपणा स्वतःस पणाला लाविलेंस हें वाईट झालें. अरे, आपणा स्वतःस सोडवून घेऊन तुमची प्रिय भार्या पांचाली तुझी पट्टराणी आहे तिला पणास लाव ! ' शकुनीनें त्या साध्वीचा असा भरसभेंत अपमान केला तरी युधिष्ठिराचे डोळे उघडले नाहींत ! द्यूत खेळतांना द्यूतकारांचे अंमीं संचारणाऱ्या एका

प्रकारच्या वेडानें या वेळीं त्यास पछाडलें असल्यामुळें, आपण काय करीत आहों याचेंहि त्यास भान राहिलें नाहीं. ‘ शरदृतूंतील कमलाप्रमाणें जिच्या शरीरास सुवास येतो, जिच्या अंगीं गृहिणीचे सर्व उत्तमोत्तम गुण आहेत, जी आम्हांस अनुकूल व नेहमीं प्रिय भाषण करणारी आहे; मी निजल्यानंतर मग झोंप घेणारी व माझे आधीं निजून उठणारी, धौम्यापासून गोपांपर्यंत सर्वांचा स्वतः समाचार घेणारी, ती माझी प्रिय भार्या पांचाली मी पणाला लाविली ! ’ युधिष्ठिराचे मुखांतून हे शब्द निघतात न निघतात तोंच शकुनि फांसे टाकून मोठ्या आवेशानें ‘ जितमेव ’ म्हणून ओरडला ! झालें ! युधिष्ठिराच्या द्यूताचे व्यसनाचा व शकुनीच्या कपटाचरणाचा कळस झाला, व सर्व सभेंत एकच हाहाकार उडाला ! भीष्म, द्रोण आदिकरून वृद्ध पुरुषांनीं व इतर राजांनींहि दुःखानें व लज्जेनें खालीं माना घातल्या. जमलेल्या सर्व मंडळींच्या डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या. विदुराची तर दुःखानें कंबरच खचली. आंधळा धृतराष्ट्र कांहींसें आनंदानें ‘ किं जितं ’ ‘ किं जितं ’ ( काय जिंकिलें ? कोणता पण जिंकिला ? ) असें जवळच्या मंडळीस विचारूं लागला. पांडवांचें सगळें राज्य एकहि बाण न टाकतां आयतें मिळालें; एवढेंच नव्हें, तर त्यांच्या पत्नीची विटंबना करण्याचीहि संधि मिळाली; हें पाहून दुर्योधन, दुःशासन, कर्ण व शकुनि या चांडाळचौकडीचा आनंद तर गगनांतहि मावेना. ( सभापर्व अ० ४३–६५ )

त्या सभेंतील निरनिराळ्या लोकांचीं मनें याप्रमाणें दुःखानें व आनंदानें भरून गेलीं असतां दुर्योधन जणूं काय विदुराचें हृदय विदारण करीतच म्हणालाः—“ विदुरा, आतां जा. पांडवांच्या लाडक्या बायकोला–त्यांच्या त्या पट्टराणीला–सभेंत घेऊन ये जा ! आमच्या दासींमध्यें राहून आमच्या राजवाड्यांतलि झाडसारवण आतां तिला करूं द्या ! ” यांवर विदुर म्हणालाः—‘ युधिष्ठिर आधीं हरला गेला असल्यामुळें त्याला आपली भार्या पणास लावण्याचा अधिकारच नव्हता; म्हणून द्रौपदी तुमची दासी झालेली नाहीं. दुर्योधना, द्रौपदीची विटंबना करशील तर शस्त्र गिळून मृत्यु पावलेल्या बोकडाप्रमाणें तुझी स्थिति होईल ! ’ विजयमदानें धुंद झालेल्या आणि पांडवांचा अपमान व छळ करण्याची आलेली ही अपूर्व संधि न दवडण्याचा कृतसंकल्प केलेल्या दुर्योधनास विदुराचें हें बोलणें रुचलें नाहीं. त्यानें प्रातिकामी नांवाच्या सारथ्यास द्रौपदीला सभेमध्यें आणण्यासाठीं पाठविलें. त्यानें

राजवाड्यांत जाऊन, ' दुर्योधनानें तुम्हांला द्यूतामध्यें जिंकिलें आहे व तुम्हांस तो सभेमध्यें बोलावीत आहे; तर चला ' असें द्रौपदीस म्हटलें ! आपणावर एकाएकी हा कोणता व कसा गहजब झाला आहे, हें न समजून ती बराच वेळ गोंधळली. दूतानें द्यूताची सर्व हकीकत सांगितल्यानंतर, ' पणाला आधीं कोणास लाविलें होतें ! आपणा स्वतःला कीं मला ? ' असें सभेमध्यें जाऊन युधिष्ठिरास विचारण्यास, तिनें तोच दूत परत पाठविला, त्याप्रमाणें त्यानें सभेमध्यें येऊन धर्मास विचारिलें; परंतु दुःख, लज्जा व पश्चात्ताप यांनीं मृतप्राय झालेल्या धर्मानें कांहींच उत्तर केलें नाहीं. ' तिला जें काय विचारावयाचें असेल तें तिनें येथें सभेमध्यें येऊन विचारावें ' असें सांगून पुन्हां त्या सारथ्यास दुर्योधनानें द्रौपदीकडे पाठविलें. दुर्योधनाचें हें म्हणणें त्यानें पुन्हां राजवाड्यांत त्यानें जाऊन द्रौपदीस कळविलें. " मी तुम्हांसारख्या वडील माणसांच्या सभेमध्यें यावें काय ! आपण सांगत असाल तर मी येण्यास तयार आहे " असें सभेमध्यें जाऊन भीष्मधृतराष्ट्रादि वडील माणसांना विचार, असें सांगून तिनें दूताला पुन्हां परत पाठविलें. त्यानें सभेंत येऊन तिचा प्रश्न सर्व सभासदांना कळविला; परंतु कोणींहि कांहीं उत्तर दिलें नाहीं. आपण आतां पूर्ण पराधीन झालों आहों, कौरव सांगतील तसें वागणें आपणास भाग आहे, असें वाटून युधिष्ठिरानें त्या दूतास ' सभेमध्यें येऊन आपल्या सासऱ्यांसमोर उभी रहा ' असा निरोप द्रौपदीला कळविण्यास सांगितला. धर्माच्या या सांगण्याप्रमाणें द्रौपदीकडे न जातां तो दूत ' मी द्रौपदीला काय सांगूं ? ' असें सभासदांनाच विचारूं लागला. तेंव्हां दुर्योधन म्हणालाः—दुःशासना, हा भित्रा सारथी भीमाला भितो आहे; तूंच जाऊन द्रौपदीला सभेमध्यें घेऊन ये. आतां आपले दास झालेले हे अनाथ पांडव तुझें काय करणार आहेत ! ' दुःशासन सत्वर तेथून निघून द्रौपदीकडे आला, आणि म्हणालाः——अगे पांचाली, दुर्योधनानें तुला द्यूतांत जिंकिलें आहे, तर तूं आतां कौरवांची सेवा कर; पण आधीं लाज व लज्जा टाकून देऊन सभेमध्यें ये व राजा दुर्योधनाला पहा. ' हे शब्द ऐकतांच, आतां मात्र आपला या संकटांतून निभाव लागत नाहीं, असें वाटून द्रौपदी धृतराष्ट्राच्या स्त्रिया जिकडे होत्या तिकडे धांवत जाऊं लागली. तोंच थोड्याच दिवसांपूर्वीं राजसूय यज्ञामध्यें सार्वभौमपदाचे अभिषेकानें भिजलेले तिचे केश धरून दुःशासनानें तिला मागें ओढलें ! ' मी रजस्वला आहे, मी एकच वस्त्र नेसलें आहे; अशा स्थितींत मला सभेमध्यें नेऊं नको ' अशा तिनें

त्या चांडाळाची पुष्कळ विनवणी केली, परंतु त्या पाषाणहृदयी दुःशासनास तिची दया आली नाहीं ! उलट, ' तूं रजस्वला अस, एकच वस्त्र नेसलेली अस, किंवा अगदींच वस्त्ररहित अस; मी तुला सभेमध्यें नेणार ! तुला दासीला येवढी लाज-लज्जा कशाला पाहिजे ? ' अशी त्या साध्वीच्या कोमल हृदयावर त्यानें डागणी दिली ! " माझ्यासारखी कुलस्त्री, राजकन्या, राजपत्नी, राजस्नुषा, हिला रजस्वला असतांना सभेमध्यें ओढून आणावें, ही गोष्ट सभेंतल्या भीष्म, द्रोण, धृतराष्ट्र, विदुर, कृप या वृद्ध धर्मात्म्यांना आवडली काय ? कुरुकुलांतल्या पुरुषांनीं व सर्व क्षत्रियांनीं आपल्या धर्मावर पाणी सोडलें काय? भारतकुलाचा धर्म व आचार-विचार यांवर निखारे पडले काय ? " याप्रमाणें विलाप करणाऱ्या द्रौपदीस दुःशासनानें सभेमध्यें ओढून आणलें !

अशा स्थितीमध्यें सभेंत ओढून आणल्याबरोबर द्रौपदीनें आपल्या पतींकडे कांहीं राग व कांहीं लज्जा यांनीं पूर्ण असा एक हृदयभेदक कटाक्ष फेंकला. रणांगणामध्यें शत्रूंच्या तीक्ष्ण बाणांनीं किंवा दुर्योधनादिकांच्या अपमानकारक; दुर्भाषणांनीं त्या पांडवांच्या हृदयावर यापूर्वी अनेक जखमा झाल्या होत्या परंतु दगडासहि पाझर फुटेल अशा या हृदयद्रावक स्थितीमध्यें असतांना द्रौपदीनें त्यांजकडे जो मर्मभेदक कटाक्ष फेंकला, त्यानें मात्र त्यांचे हृदयावर जी जखम केली ती त्या सर्वांहून पराकाष्ठेची दुःसह होती ! आपल्या पतींकडे व सभासदांकडे द्रौपदी दीन व केविलवाण्या मुद्रेनें पहात असतां, दुःशासन तिचे केसांना सारखे हिसके देऊन ' दासी ! दासी ! ' असें उपहास-पूर्वक म्हणत होता. दुःशासनाचें हें वर्तन पाहून दुर्योधन, कर्ण व शकुनि यांवांचून इतरांना अत्यंत वाईट वाटलें. द्रौपदी दासी झाली किंवा नाहीं, ह्या प्रश्नाचें भीष्मांनीं संदिग्धच उत्तर दिलें. युधिष्ठिर हा कौरवांचा दास झाल्यामुळें त्याची आपल्या धनावर सत्ता मुळींच राहिली नाहीं; तेव्हां द्रौपदीला पणास लावण्याचा त्यास अधिकार नाहीं. दुसऱ्या पक्षीं, भर्त्याची जी स्थिति तीच स्त्रीची, असें धर्मशास्त्र सांगत असल्यामुळें पांडव जर दास झाले, तर द्रौपदीहि दासी झालीच. असे दोन्ही प्रकार संभवत असल्यामुळें या प्रश्नाचें निश्चयात्मक उत्तर मला सांगतां येत नाहीं ' असें ते म्हणाले. खुद्द भीष्मांना ज्या प्रश्नाचें उत्तर देणें कठिण पडलें, त्याचें उत्तर देण्याची इतर कोणासहि छाती होईना. द्यूता-मध्यें धर्मराजा मुळींच कुशल नाहीं, त्यास बळेंच द्यूताला बोलावून आणावें

व द्यूत निपुण शकुनीनें त्याचें सर्वस्व हरण करून त्यास दास करावें ही उचित गोष्ट नव्हे; इत्यादि प्रकारानें द्रौपदीचें बोलणें चालू असतां, दुर्योधनादिकांचें पांडव-द्रौपदीला मर्मभेदक शब्दांनीं प्रहार करणें व दुःशासनाचें तिचें केश ओढून सारखे हिसके देणें चाललेंच होतें ! दुःशासनाच्या या हिसकाहिसकीनें द्रौपदीचा पदर खालीं पडतांच, आतांपर्यंत आवरून धरलेला भीमसेनाचा क्रोध अनावर झाला; व अतिशय खवळून जाऊन त्वेषानें तो धर्मास म्हणालाः—" आमचें धन, आमचें राज्य, आम्ही चौघे भाऊ व शेवटीं आपण स्वतः हीं सर्व पणास लावून तुम्हीं घालविलींत; तरी युधिष्ठिरा, मला राग आला नाहीं. जुगारबाज लोकांच्या घरामध्यें त्यांच्या ज्या रांडा असतात त्यांच्याविषयींसुद्धां दया येऊन ते त्यांना धनाप्रमाणें कधींहि पणास लावीत नाहींत. परंतु तुम्हीं मात्र आपल्या धर्मपत्नी द्रौपदीला पणास लाविलेंत; ह्या भयंकर अपराधाची मात्र हा वृकोदर आतां क्षमा करणार नाहीं !

**अस्याः कृते मन्युरयं त्वयि राजन्निपात्यते ।**
**बाहू ते संप्रधक्ष्यामि सहदेवाग्निमानय ॥**

या द्रौपदीकरितां मी आपला राग आतां तुझ्यावर काढतों; सहदेवा, जा व अग्नि घेऊन ये. आपली पतिव्रता भार्या शत्रूचे स्वाधीन करणाऱ्या या धर्माचे हात जाळून टाकूं या. " याप्रमाणें भीमाची गर्जना सभेमध्यें दणाणली ! परंतु अर्जुन त्याची अनेक प्रकारें समजूत करून शेवटीं म्हणालाः—' द्यूतास किंवा युद्धास कोणी बोलाविलें असतां केव्हांहि माघार घ्यावयाची नाहीं, हें क्षत्रियाचें व्रत मोडूं नयें म्हणून धर्मराजा द्यूत खेळूं लागला; इतर द्यूतकारांप्रमाणें धनलोभामुळें किंवा राज्यलोभामुळें तो द्यूत खेळला नाहीं, हें तुझ्या कसें लक्षांत येत नाहीं ? आपल्या वडील व धर्मशील बंधूसंबंधानें असें अशुभ भाषण करणें योग्य नव्हें. ' युधिष्ठिर क्षात्रव्रतासाठीं द्यूत खेळला हें जर माझे मनांत तूं भरविलें नसतेंस, तर मी बलात्कारानें याचे हात धरून जाळून टाकणार होतों असें म्हणून भीमानें आपला क्रोध आवरला.

द्रौपदी दासी झाली आहे किंवा नाहीं, ह्या प्रश्नाचें उत्तर सभासदांपैकीं कोणी देईना, तेव्हां शेवटीं धृतराष्ट्राच्या विकर्ण नांवाच्या पुत्रानें बोलण्यास प्रारंभ केला. तो म्हणालाः—' राजे लोक ज्यांत नेहमीं सांपडतात, अशीं चार व्यसनें सांगितलीं आहेत; तीं स्त्री, मृगया, मद्यपान व द्यूत हीं होत. या

व्यसनांमध्यें अत्यंत आसक्त असतांना केलेलें कृत्य केव्हांहि लोकसंमत होत नाहीं. तेव्हां द्यूतासक्त धर्मानें द्रौपदी पणास लाविली हें कृत्य मुळींच बरोबर नसून तें जमेस धरतां येत नाहीं. शिवाय द्रौपदी पांचांची पत्नी असल्यामुळें एकट्या युधिष्ठिरास तिला पणास लावण्याचा अधिकार नाहीं. शिवाय तिला पणास लावण्याची गोष्ट प्रथमतः शकुनीमामांनींच काढली. ह्या सर्व गोष्टी लक्षांत आणल्या असतां द्रौपदी दासी झाली नाहीं, असें मला वाटतें.' हें भाषण ऐकून सर्वांनीं त्याची मोठी वाहवा केली. परंतु, आपल्याहून वडील अशा माणसांना शहाणपण शिकविण्याचें धाडस केल्याबद्दल कर्णानें विकर्णाची अतिशय निर्भत्सना केली; तो म्हणालाः—" युधिष्ठिरानें आपलें 'सर्वस्व' एकदां पणास लाविलें होतें; त्या पणामध्यें द्रौपदीचा अंतर्भाव झाला असतां. ती दासी झाली नाहीं असें तूं कसें म्हणतोस ? विदुर व विकर्ण हे तुम्ही दोघे एकाच माळेचे मणी आहां ! ही दासी खरी, पण हिला सभेमध्यें आणणें योग्य नव्हें, असें जर म्हणशील; तर पांच पुरुषांची भार्या होऊन राहिलेली ही द्रौपदी कुलस्त्री नसून वेश्या आहे ! अशा स्त्रीला, रजस्वला किंवा एकवस्त्र असतांना, सभेमध्यें आणणें हें कांहीं मोठेंसें विचित्र नव्हें. दुःशासना, हा विकर्ण बालिश भाषण करीत आहे; याचें तूं कांहीं ऐकूं नको. हं ! आटप. या पांडव दासांचें व या द्रौपदी दासीचेंहि वस्त्र हिसकून घे ! " हें ऐकसांच आपापली उत्तरीय वस्त्रें टाकून पांडव उघडे बसले ! आणि दुःशासन त्या सभेमध्यें त्या साध्वीचें नेसलेलें एकच वस्त्र ओढून फेडूं लागला ! ! त्या दीन व अनाथ झालेल्या साध्वीच्या विटंबनेचा असा कळस झालेला पाहून, आतांपर्यंत आंतआंतच धुमसत असलेला भीमसेनाचा क्रोधाग्नि एकदम भडकून गेला ! संतापातिशयानें दांत ओठ खात, त्वेषानें हातावर हात चोळीत व सर्व सभा आपल्या गर्जनेनें दणाणित भीमसेन म्हणालाः—' पृथ्वीवरील सर्व क्षत्रियांनीं मी जें बोलत आहे तें ऐकावें. असें भाषण पूर्वी कधींहि कोणीं केलें नसेल व पुढेंहि कोणीं करणार नाहीं; मी आपली प्रतिज्ञा जर शेवटास नेली नाहीं तर मी सदैव नरकांत पचेन !

**अस्य पापस्य दुर्बुद्धेर्भारतापसदस्य च ।**
**न पिबेयं बलाद्वक्षो भित्वा चेद्रुधिरं युधि ।**
**पितामहानां पूर्वेषां नाहं गतिमवाप्नुयाम् ॥**

युद्धामध्यें या पापी कौरवाधमाचें वक्षःस्थल विदीर्ण करून जर मी तेथील रक्ताचें प्राशन करणार नाहीं, तर मला रौरव नरक प्राप्त होवो ! ' इकडे भीष्म वगैरे वडील माणसें, आपले पति पांडव किंवा इतर जमलेले राजे, यांपैकीं कोणींहि आपणांस या दुष्टांचे विटंबनेंतून मुक्त करीत नाहीं, असें पाहून द्रौपदीनें मोठ्या कळवळ्यानें, अनाथांचा नाथ व दीनांचा बंधु जो श्रीकृष्ण त्याचा धांवा केला ! त्या साध्वीची ती हांक ऐकून श्रीकृष्णांना द्वारकेंत गहिंवर आला; व त्यांनीं तिचेकरतां जणूं काय अकरावा ' वस्त्रावतारच ' धारण करून व गुप्तपणानें तेथें येऊन त्या साध्वीची लज्जा रक्षण केली ! इकडे दुःशासन जसें जसें लुगडें ओढून घेई, तसें तसें आंत दुसरें एक कायम असेच ! याप्रमाणें त्यानें अनेक लुगडीं झट झट फेडून टाकलीं व त्यांचा सभेमध्यें ढीग झाला ! तरी दीनांचा कैवारी जो श्रीकृष्ण त्यानें जें शरीर झांकलें तें त्या दुष्टास उघडे करितां आलें नाहीं ! याप्रमाणें लुगडीं ओढतां ओढतां दुःशासन दमून व लाज्जित होऊन खालीं बसला !

द्रौपदीच्या छळाचा अजूनहि शेवट झाला नव्हता. ' कृष्णा दासी'ला घरामध्यें घेऊन जा, असें कर्णानें दुःशासनास सांगतांच, तो पुन्हां उठला; आणि तिचे केश धरून पुनरपि हिसकाहिसकी करूं लागला. तेव्हां दुर्योधन म्हणाला—' अगे द्रौपदी, हे तुझे पति या सभेमध्यें ' युधिष्ठिर हा आमचा स्वामी नाहीं ' असें म्हणूं देत. किंवा त्या धर्मात्म्या युधिष्ठिरानें स्वतः ' मी अनाथ आहे ' असें म्हणावें; म्हणजे मी तुला दासीपणांतून मुक्त करीन. ' हें ऐकून पांडव यांवर काय उत्तर करतात, इकडे सर्वांचें लक्ष लागलें. द्रौपदीसाठीं—आपल्या भार्येचा छळ बंद करण्यासाठीं—येवढें तोंडानें म्हणण्यास ते तयार होतील असेंहि कित्येकांना वाटलें असेल. परंतु भीमसेन आवेशानें हात वर करून म्हणालाः—**धर्म हा आमच्या पुण्याचा, तपाचा व शरीराचाहि स्वामी आहे.** तो आमचा स्वामी आहे व आम्ही त्याचे आज्ञेत आहों, म्हणूनच हे अधम कौरव अजून जिवंत आहेत. धर्म जर स्वतःस दास समजत असेल, तर आम्हीहि आपणांस तसेंच समजूं. युधिष्ठिर आमचा स्वामी आहे.

**धर्मराजनिसृष्टस्तु सिंहः क्षुद्रमृगानिव ॥**
**धार्तराष्ट्रांस्त्विमान्पापान्निष्पिष्येयं तलासिभिः ॥**



तिचे केस धरून दुःशासनानें तिला मागें ओढिलें ! [ पृ. ७०

आणि तो जर मला आज्ञा करील, तर सिंहाप्रमाणें मी ह्या क्षुद्र कौरव पशूंचा येथल्या येथेंच फक्त या तळहाताच्या एकाच तडाक्यानें तात्काळ संहार करून टाकीन ! " दास बनून गेलेल्या पुरुषाच्या या गर्वोक्तीकडे कोण लक्ष देतो ? दुर्योधनाचे घरीं जाऊन आपलें काम कर जा; किंवा हे राजकन्ये, तूं या पांडवांना–या–दासांना–सोडून दे, आणि तुला पुन्हां द्यूतामध्यें पणास लावून दासीच्या स्थितीला आणणार नाहीं, असा दुसरा एकादा पति कर.' असें कर्ण द्रौपदीला म्हणाला ! द्रौपदी ही न्यायानें दासी झाली आहे किंवा नाहीं, हें खरें सांगण्यास दुर्योधनानें पुन्हां युधिष्ठिरास आव्हान केलें; पण तो कांहींच बोलला नाहीं. पांडवांचे हृदयास पुन्हां डागण्या देण्याकरितांच, कर्णाकडे वांकड्या नजरेनें पाहून, मोठ्या विजयोत्साहानें हांसत हांसत, दुर्योधनानें द्रौपदीकडे पाहून आपली डावी मांडी तिला सर्वांसमक्ष उघडी करून दाखविली ! ! हें पाहून भीमाच्या क्रोधानें पुन्हां उसळी खाल्ली.

**पितृभिः सह सालोक्यं मा स्म गच्छेत् वृकोदरः ।**
**यद्येतमूरुं गदया न भिंद्यां ते महाहवे ॥**

युद्धामध्यें या मांडीवर गदेचा प्रहार करून ती मी मोडणार नाहीं तर या वृकोदरास पितृलोक प्राप्त न होतां नरकवास होवो ! भीमसेनाची ही घोर प्रतिज्ञा संपते न संपते तोंच धृतराष्ट्राच्या अग्निशाळेमध्यें शिरून कोल्ह्यानें अशुभ-सूचक भयंकर शब्द केला ! पुढील कुलक्षय सुचविणार इतरहि अनेक उत्पात व अपशकुन झाले !

हा सर्व प्रकार चालू असेपर्यंत धृतराष्ट्र स्वस्थ बसला होता; पण आतां मात्र तो मध्यें पडला. दुष्टांनीं चालविलेल्या या एकंदर छळाचा भलताच अनिष्ट परिणाम होऊं नये, म्हणून धृतराष्ट्रानें द्रौपदीचें सांत्वन करून तिला वर देऊं केला. तेव्हां 'आधीं युधिष्ठिराला दास्यांतून मुक्त करावें' असा पहिला वर त्या पतिव्रतेनें मागितला. तो दिल्यावर धृतराष्ट्रानें पुन्हां दुसरा वर देऊं केला. 'इतर पांडवांना रथांसह व शस्त्रांसह दास्यांतून मुक्त करावें' असा दुसरा वर तिनें मागितला. तो देऊन त्यानें पुन्हां तिसराहि वर देऊं केला. परंतु, 'क्षत्रियांनीं दोहोंहून अधिक वर मागूं नयेत असें शास्त्र आहे; माझे पती शस्त्रांसह मुक्त झाल्यावर, नाहींसें झालेलें इतर सर्व ते स्वपराक्रमानेंच

मिळवितील ! ’ असें मानी द्रौपदीनें उत्तर दिलें ! तेव्हां कर्ण म्हणालाः— ‘ संकटांच्या अगाध समुद्रामध्यें कोणताहि आधार न मिळाल्यामुळें गटंगळ्या खाणाऱ्या पांडवांना द्रौपदी हीच खरोखर नौकेप्रमाणें तारक झाली आहे ! यानंतर सर्वांना मिळालेल्या या स्वातंत्र्याचा पहिला उपयोग काय करावयाचा याविषयीं पांडवांमध्यें वाटाघाट चालली. तेव्हां मी येथल्या येथेंच या शत्रूंचा संहार करून टाकितों; मग तूं सुखानें पृथ्वीचें राज्य कर ! ’ अशी मसलत भीमानें युधिष्ठिरास सुचविली. परंतु हें कृत्य त्यास पसंत पडलें नाहीं. उलट, धृतराष्ट्राकडे जाऊन व त्यास नमस्कार करून, ‘ आपली आम्हांस आतां काय आज्ञा आहे ? कांहीं झालें तरी सदोदित तुमच्याच आज्ञेंत रहाण्याचा आमचा निश्चय आहे. ’ असें धर्म त्यास म्हणाला ! धृतराष्ट्रानें उत्तर केलें:—‘ आतां तुम्हीं इंद्रप्रस्थास जाऊन आनंदानें राज्य करा. दुर्योधन वगैरे तुम्हांला जें कांहीं अप्रिय बोलले असतील, त्याची तूं मज वृद्धाकडे व अंधाकडे आणि गांधारीकडे लक्ष देऊन क्षमा कर ’ असें म्हणून त्यानें पांडवांना निरोप दिला; व तेहि रथांत बसून इंद्रप्रस्थाकडे निघून गेले. ( सभापर्व अ. ६५–७३ )

येवढ्या विलक्षण कपटानें व मोठ्या कष्टानें हातीं आलेली पांडवांची संपत्ति व राज्य हीं या थेरड्यानें हातचीं घालविलीं; आतां पांडवांना कोणत्या तरी निमित्तानें ताबडतोब द्यूत खेळण्यास पुन्हां आणलें पाहिजे, नाहीं तर सगळा व्यूह ढांसळतो; असा दुर्योधन, कर्ण, शकुनि व दुःशासन यांनीं बेत केला. त्या बेताप्रमाणें दुर्योधन धृतराष्ट्राकडे येऊन म्हणालाः—“ पांडवांना आपण दुखविलें आहे; त्यांच्या पत्नीचा भर सभेमध्यें छळ केला आहे; तेव्हां त्यांना असें मोकळें सोडणें म्हणजे दुखविलेल्या सापाला जिवंत सोडण्यासारखे आत्मघातक आहे. त्यांचे मनांत आपणाविषयींचा पक्का सूड बाणला आहे. ते आपणा सर्वांचा नाश केल्यावांचून कधींहि स्वस्थ बसणार नाहींत. तर द्यूताचा आणखी एक डाव होऊं द्या. त्यामध्यें आपण असा पण लावूं कीं, जो हरेल त्यानें बारा वर्षे वनवास करावा व नंतर समान योग्यतेच्या मनुष्यांमध्यें राहून एक वर्षभर अज्ञातवास करावा त्या अज्ञातवासांत त्यांना ओळखल्यास त्यांनीं पुन्हां बारा वर्षें वनवास करावा ! हाहि पण शकुनि जिंकील; ते वनवासांत आणि अज्ञातवासांत असतांना सर्व राज्य आपणांसच उपभोगण्यास सांपडेल. शिवाय तेवढ्या काळांत आपल्या राजसत्तेचीं मुळें खोल जाऊन आपला पक्ष सबळ होईल. ते परत आल्यावर त्यांना आपण राज्य न दिल्यामुळें जर ते युद्ध

आरंभितील तर आपला पक्ष बलाढ्य झाल्यामुळें त्यांत आपणांस सहज यश येईल. " ही मसलत धृतराष्ट्रास पसंत पडली. भीष्म, द्रोण, विदुर—किंबहुना गांधारी—यांचेहि सांगणें न ऐकतां, त्यांच्या इच्छेविरुद्ध युधिष्ठिरास पुन्हा द्यूत खेळण्यास आणण्याकरितां धृतराष्ट्रानें प्रातिकामी दूतास पाठविलें. इंद्रप्रस्थाच्या निम्या वाटेवरच त्यानें तो निरोप धर्मास कळविला, धर्महि धृतराष्ट्राची आज्ञा व क्षात्रियाचें व्रत मोडावयाचें नाहीं म्हणून पुनः हास्तिनापुरास आला; द्यूतास प्रारंभ झाला. ' द्यूतामध्यें हरेल, त्यानें बारा वर्षें वनवास व एक वर्ष अज्ञातवास करावा; त्या अज्ञातवासाचे कालांत त्यास ओळखल्यास पुन्हां बारा वर्षें वनवास करावा व परत आल्यावर ज्याचें राज्य त्यास परत द्यावें ' असा पण लावून पुन्हां द्यूत सुरू झालें. शकुनीनें डाव टाकून पूर्वीप्रमाणेंच 'जितं' म्हणून पण जिंकला !

याप्रमाणें पुन्हां पराभूत झाल्यावर पांडवांनीं बहुमोल वस्त्रें टाकून देऊन वनवासास योग्य अशीं वल्कलें कृष्णाजिनें धारण केलीं. दुःशासन द्रौपदीस म्हणालाः—' आपली कन्या द्रौपदी पांडवांना देऊन द्रुपदराजा अगदीं फसला ! हे पांडव क्षत्रियधर्मास कलंक लावणारे क्लीब आहेत. त्यांच्याबरोबर वनांत जाऊन वनवास करण्यापेक्षां, द्रौपदी, आम्हां कौरवांपैकीं कोणा एकाशीं लग्न कर ! ' हें ऐकून भीमसेन एकदम चवताळून जाऊन म्हणालाः—' कौरवाधमा या तुझ्या मर्मभेदक भाषणाचें उत्तर युद्धामध्यें मी आपल्या हृदय-भेदक बाणांनींच देईन ! ' एकादा अतिथि घरीं आला असतां मधुपर्कसमयीं पशु निवेदन करितेवेळीं, जसें ' गौर्गौः ' असें म्हणतात, त्याप्रमाणें काळरूपी अतिथिला पांडवरूपी पशु आम्ही अर्पण करीत आहों, असें सुचविण्यासाठीं दुःशासन सारखा ' गौर्गौः ' असें म्हणत नाचत होता ! भीम पुन्हां त्यांस रक्तप्राशनच्या प्रतिज्ञेची आठवण करून देऊं लागला असतां, अर्जुन भीमसेनास म्हणालाः—

**नैवं वाचा व्यवसितं भीम विज्ञायते सताम् ।**
**इतश्चतुर्दशे वर्षे द्रष्टारो यद्भविष्यति ॥**

**भीमा, शहाण्या पुरुषांना जें कार्य करावयाचें असतें तें ते तोंडानें बोलून दाखवित नसतात.** जें काय आपण करूं तें हे कौरव चवदाव्या वर्षी पाहतील. ' असें म्हणून अर्जुनानें कर्णाचा, भीमानें दुःशासन

दुर्योधन इत्यादि कौरवांचा व सहदेवानीं शकुनीचा युद्धामध्यें वध करण्याच्या प्रतिज्ञा केल्या व ते वनवासास जाण्यास सिद्ध झाले, जाण्यापूर्वी धृतराष्ट्रास नमस्कार करून व भीष्म, द्रोण इत्यादिकांचाहि निरोप घेऊन युधिष्ठिर म्हणालाः–' ईश्वराच्या दयेनें वनवास संपल्यावर मी आपल्या पायांचें दर्शन घेण्यास पुनः येईन ! ' भीष्म-द्रोणांचीं मनें दुःखानें व लज्जेनें करपून गेलीं असल्यामुळें त्यांनीं त्यास कांहींच उत्तर केलें नाहीं. फक्त आपल्या अंतःकरणामध्यें, त्यांचें कल्याण व्हावें अशी त्यांनीं परमेश्वराची प्रार्थना केली, कुंतीला आपल्या घरीं ठेवण्यास सांगून विदुरानें पांडवांना मोठ्या दुःखानें निरोप दिला. ' युधिष्ठिरा, आजपर्यंत तूं कधींहि अयोग्य गोष्ट किंवा कसलेंहि पाप केलेलें नाहीं. तुझें कल्याण होवो. श्रीकृष्णाच्या कृपेनें कृतार्थ होऊन तुम्ही वनांतून परत याल, अशी मला खात्री आहे ' असें तो म्हणाला. द्रौपदीहि कुंती, गांधारी व कौरवांच्या स्त्रिया यांचा निरोप घेण्यास गेली. त्या वेळीं वनामध्यें पतीशीं चांगल्या रीतीनें वागण्यास सांगून कुंती तिला म्हणालीः––" मुली, वनवासाचें हें भयंकर संकट आलें म्हणून तूं शोक करूं नको. स्त्रीधर्म तुला ठाऊक आहेच. तूं आपल्या सद्गुणांनीं दोन्हीं कुलें भूषित केलीं आहेस तेव्हां तुला मीं उपदेश करावयास पाहिजे असें नाहीं. सर्वांशीं पतिव्रताधर्मानें वाग; व विशेषतः माझ्या सहदेवास संभाळ. " याप्रमाणें सर्वांचे निरोप घेऊन पांडव वनांत जावयास निघाले; कुंती त्यांना पोंचविण्यास गेली. धर्मानें वागत असूनहि त्यांना शेवटीं वनवास पत्करावा लागला, याबद्दल अतिशय शोक करून पांडव दृष्टीआड झाल्यावर ती विदुराचे घरीं परत आली ! वनांत जातांना सर्वांचे पुढें युधिष्ठिर, त्याचे मागून क्रमानें भीम, अर्जुन, नकुल, सहदेव, द्रौपदी व धौम्य असे चालले. जातांना धर्मानें आपले डोळे हातांनीं झांकले होते; भीम आपल्या प्रचंड बाहूंकडे पाहात होता; अर्जुन रस्त्यानें सारखी वाळू टाकीत होता; सहदेवानें आपल्या तोंडास काळें फासलें होतें; व नकुलानें आपलें सर्वांग धुळीनें माखलें होतें. द्रौपदी आपले केश मोकळे टाकून व त्या केसांनीं आपलें तोंड झांकून रडत रडत चालली होती; आणि धौम्य, उत्तरकार्याचे वेळचें 'याम्य साममंत्र म्हणत चालले होते !

पांडवांच्या अशा रीतीनें वनांत जाण्याचा अर्थ काय, असें धृतराष्ट्रानें विदुरास विचारलें; तेव्हां तो म्हणालाः—" धर्मराजा अत्यंत दयाळू असल्यामुळें, आपल्या क्रोधदृष्टीनें कौरव भस्म होऊन जाऊं नयेत, म्हणून त्यानें आपले

डोळे झांकिले होते. साध्वीचा छळ करून राज्य हरण करणाऱ्या शत्रूंवर पराक्रम गाजविण्याची संधि या बाहूंना केव्हां येईल, असें मनांत म्हणत, **भीम** त्या बाहूंकडे पहात होता. वाळूच्या कणांप्रमाणें असंख्य बाण सोडून युद्धामध्यें या शत्रूंना जर्जर करीन, असें सुचविण्याकरितां अर्जुन रस्त्यांमध्यें वाळू टाकीत चालला होता. या विपत्तीमध्यें आपणांस कोणीहि ओळखूं नये, म्हणून, **सह-देवानें** आपल्या तोंडाला काळें फासलें होतें. मार्गामध्यें आपलें सौंदर्य पाहून स्त्रियांनीं भुलून जाऊं नये म्हणून **नकुलानें** आपलें अंग धुळीनें माखलें होते. मी जशी आतां केश मोकळे सोडून रडत जात आहे, तशा **कौरवांच्या** स्त्रिया चवदा वर्षांनंतर आपले पति युद्धांत मेले म्हणजे केश मोकळे सोडून रडत रडत याच रस्त्यानें जातील, हें सुचविण्याकरितां, केशांनीं आपलें मुख झांकून **द्रौपदी** रडत गेली. सर्व **कौरवांचा** युद्धामध्यें वध झाल्यानंतर त्यांचे दहनसमयीं त्यांचे पुरोहित हेच मंत्र म्हणतील, हें सुचविण्याकरितां **धौम्य** याम्य साममंत्र म्हणत चालले होते ! " **पांडव** वनवासास निघाले त्यावेळीं सृष्टिमातेनेंहि आपलें दुःख उत्पात व अपशकून यांच्या द्वारें प्रकट केलें ! **नारद** व इतर ऋषीहि **धृतराष्ट्राकडे** येऊन ' दुर्योधनाचे या अपराधांमुळें सर्व **कौरवांचा** व क्षत्रियांचा **भीमार्जुनांचे** हातून युद्धामध्यें संहार होणार ! ' असें सांगून निघून गेले. ( सभापर्व अ० ७३–८० )



# प्रकरण ४ थें.



## वनवास.



या प्रमाणे एकहि बाण न टाकतां किंवा रक्ताचा एक थेंबहि न पडतां राजसूययज्ञांत दिमाखानें मिरविलेल्या पांडवांचा नक्षा आपण केवळ द्यूताच्या फाशांनीं उतरला व त्यांचें राज्य हरण करून त्यांस १३ वर्षें हद्दपार केलें; याचा दुर्योधनादि चांडाळ चौकडीस आतां आनंद झाला. आजपासून दुर्योधन सार्वभौम राजा झाला असें कर्णानें म्हटलें; तें ऐकून वृद्ध धृतराष्ट्रासहि आनंद झाला. पण दुष्ट व घातकी अशा दुर्योधन राजाची प्रजा होऊन राहण्यापेक्षां पांडवांबरोबर वनवास पत्करणें अधिक श्रेयस्कर वाटून नगरांतील बरेच लोक त्यांचे मागोमाग वनांत गेले. युधिष्ठिरानें त्यांना येण्याचें कारण विचारिलें, तेव्हां ते म्हणाले--**दुर्योधनासारखा दुष्ट राजा जेथें राज्य करीत आहे तेथें आम्हीं राहणें योग्य नाहीं. दुष्टांच्या स्पर्शानें, संभाषणानें व दर्शनानेंहि मनुष्यास पाप लागतें; आणि सद्गुणी व धार्मिक मनुष्याचे संगतीनें त्याचे गुण आपल्या अंगीं येतात. त्यांतून राजा अधर्मी व दुष्ट असला तर प्रजाजनांस धर्म व सुख यांचा लाभ केव्हांहि होणार नाहीं.** म्हणून आम्हीं नगरांत राहण्याचें सोडून आपणांबरोबर वनवासांत आलों आहों." आपल्या प्रजेची आपणांविषयींची ही दृढनिष्ठा पाहून युधिष्ठिरास धन्यता वाटली. तो म्हणालाः—'तुम्ही परत हस्तिनापुरास जावें व मजविषयीं ही जी निष्ठा आहे तीच तुम्हीं भीष्म, विदुर, कुंती यांचे ठिकाणीं ठेवावी; म्हणजे त्यांतच माझा संतोष आहे.' हे ऐकून कांहीं लोक नगरांत परत गेले; पण कांहीं तसेच त्यांचेबरोबर राहिले. त्या दिवशीं पांडव गंगातीरावरील 'प्रमाण' नांवाच्या एका मोठ्या वट-वृक्षाखालीं येऊन राहिले. पांडव आणि त्यांचेबरोबर शिष्य व अग्नि यांसह आलेले ब्राह्मण,

या सर्वांनीं तेथें, ती रात्र नुसतें पाणी पिऊनच काढली ! राज्यपदावर असतानां लाखों ब्राह्मणांचें पोषण करण्याचें युधिष्ठिरास सामर्थ्य होतें; पण आतां बरोबरच्या या थोड्याशा लोकांना अन्न कसें मिळेल, याची त्यास काळजी पडली ! 'आम्हांस ब्राह्मणाचें पोषण करण्याचें सामर्थ्य नाहीं; आमचें राज्य जाऊन आम्ही द्रव्यहीन झालों आहों ' असें सांगून ब्राह्मणांनीं आपणांजवळ राहूं नये असें युधिष्ठिरानें त्यांना सुचविलें. संपत्ति, राजवैभव यांसारख्या नश्वर वस्तूंबद्दल शोक करणें व्यर्थ आहे, असा शौनक नांवाच्या ब्राह्मणानें त्यास दोष दिला. तेव्हां त्यानें उत्तर केलें:—' संपत्ति नाहींशी झाली म्हणून मी शोक करीत आहे खरा, पण तो द्रव्यलोभामुळें करीत नाहीं; तर जिचा उपयोग ब्राह्मणादिकांचें पोषण करण्यासाठीं करतां आला असतां, ती संपत्ति आज माझ्याजवळ नाहीं, म्हणून मी दुःख करीत आहे. **थकलेल्यास विश्रांतीचें स्थान, उभा राहिलेल्यास आसन, तान्हेल्यास पाणी व भुकेल्यास अन्न देणें हें जसें गृहस्थाश्रमी पुरुषाचें तसें राजाचेंहि कर्तव्य आहे.** तें कर्तव्य करण्याचें मला आज सामर्थ्य राहिलें नाहीं, याचेंच काय तें मला वाईट वाटतें. ' नंतर यासंबंधानें त्याचे पुरोहित **धौम्य** यांनीं उपाय सांगितला. **विपत्तींत सांपडलेल्या प्रजाजनांना तपाचरण करून सुखी करणें, हें राजाचें कर्तव्य आहे.** तेव्हां तूं सूर्याची उपासना करून त्यास प्रसन्न कर; म्हणजे तुझा हेतु पूर्ण होईल. ' **युधिष्ठिरानें** पूजा वगैरे करून व **गंगेच्या** पाण्यांत उभें राहून प्राणायामपूर्वक **सूर्याची** स्तुति केली. **सूर्यानें** प्रत्यक्ष दर्शन देऊन त्यास एक तांब्याची स्थाली दिली. तयार केलेलें अन्न हींत घालून **द्रौपदी** जोंपर्यंत वाढील तोंपर्यंत तें अन्न कधींहि कमी होणार नाहीं ' असें सांगून भगवान् **सूर्य**नारायण गुप्त झाले. ही स्थाली मिळाल्यापासून सर्वांचें चांगल्या रीतीनें पोषण होऊं लागलें. प्रथमतः सर्व ब्राह्मणांचें भोजन होई; नंतर **पांडवांचें** होई; व सर्वांचे मागून **द्रौपदीचें** भोजन झालें कीं स्थाली रिकामी होई ! याप्रमाणें तेथें राहून कांहीं दिवस लोटल्यानंतर **पांडव** सर्व ब्राह्मणांसह तेथून निघाले; व **कुरुक्षेत्रांतून** '**यमुना**, **दृषद्वती** इत्यादि नद्या उतरून पुढें तीन दिवस मार्गक्रमण केल्यानंतर ते **सरस्वती** नदीजवळच्या **काम्यक** वनांत आले. तेथें **बक** राक्षसाचा भाऊ व **हिडिंबाचा** मित्र **किर्मीर** राहात होता. आपल्या वनांत आलेलीं मनुष्यें कोण आहेत हें समजल्यावर, आपल्या भावाच्या व मित्राच्या वधाबद्दल आणि **हिडिंबा** राक्षसी हरण केल्याबद्दल सूड उगविण्याची ही

संधि चांगली आहे, असें पाहून **किर्मीर** राक्षस **भीमा**चे अंगावर धांवून आला. त्या दोघांचें बराच वेळ वृक्षयुद्ध व शिलायुद्ध झालें. शेवटच्या बाहुयुद्धांत **भीमा**नें त्यास वर उचलून व गरगर फिरवून जमीनीवर आपटलें; आणि आपल्या हातांनीं त्याचा गळा दाबून त्यास ठार केलें !

इकडे **पांड**वांना आपण वनवासास पाठविलें, यामुळें प्रजेचे मनांत वैषम्य व अप्रीति उत्पन्न होऊन आपला कदाचित् नाश होईल अशी धृतराष्ट्रास भीति पडली. 'प्रजाजन आम्हांवर भक्ति करतील असें करण्यास कोणता उपाय योजावा ? ' असें त्यानें **विदुरास** विचारिलें. तेव्हां **विदुरानें** खरें तें उत्तर दिलें:—**दुर्यो**धनास बंदींत टाकून व युधिष्ठिरास वनांतून परत आणून त्यास राज्य द्यावें, हाच यास एक उपाय आहे.' परंतु **विदुराचे** सांगण्यावरून **युधिष्ठिरा**साठीं आपल्या थोरल्या मुलास कैदेंत टाकण्यास **धृत**राष्ट्र कसा तयार होणार ? त्यानें **विदुराची** निर्भर्त्सना करून, ' तुझा ज्यांच्यावर विश्वास आहे त्यांचेकडेच तूं निघून जा. व्यभिचारिणी स्त्रीची कितीहि मनधरणी केली तरी ती केव्हांना केव्हां नवऱ्याला सोडून जावयाचीच ! ' अशीं त्यानें त्यास दुरुत्तरें केलीं. तीं ऐकून **विदुर**हि मुकाट्यानें **ह**स्तिनापूर सोडून **पांड**वांकडे आला. तो येत आहे असें पाहून, **युधिष्ठिरा**स निराळाच संशय येऊन त्याचे मनांत कांहीं चमत्कारिक विचार येऊं लागले. **श**कुनीच्या व **धृत**राष्ट्राच्या सांगण्या-वरून हा आम्हांला पुन्हां द्यूतास बोलावण्यास तर आला नसेल ना ? पुन्हां द्यूत खेळून आमचीं शस्त्रें हरण करण्याचा तर **कौर**वांचा बेत नसेल ना ? त्यांनीं **भीमा**ची गदा व **अर्जुना**चें गांडीव धनुष्य हरण करून घेतल्यास आम्हांला पुन्हां राज्य कसचें मिळतें ! कदाचित् वनांतल्या वनांत आम्हीं प्राणांस मुकूं ' असे विचार त्याचे मनांत घोळूं लागले. परंतु **विदुरा**चे तोंडून सर्व हकीकत ऐकून घेतल्यावर त्याची ही भीति व संशय दूर झाला. इकडे **विदुराची** बुद्धिमत्ता व राज्यकारभारांत एकादी मसलत करून ती सिद्धीस नेण्याची कुशलता **धृत**राष्ट्राचे मनांत आली व हा जर **पांड**वांजवळ राहिला तर त्यांचें वैभव वाढेल, असें त्यास वाटलें. तुम्हीं वनांत गेल्यापासून **धृत**राष्ट्रास चैन पडत नाहीं व झोंपहि येत नाहीं ' असा मायावी निरोप सांगून **विदुरास** आणण्यासाठीं त्यानें **संजयास** पाठविलें. तो निरोप ऐकून धर्मात्मा **विदुर** पुन्हां **ह**स्तिनापुरास परत आला, आणि **धृत**राष्ट्रास नमस्कार करून म्हणाला:— ' तुम्ही माझे गुरु आहां,

तुम्हांवर माझा राग नाहीं. पांडूचे मुलगे व तुमचे मुलगे हे दोन्हीहि मला सारखेच आहेत. परंतु सांप्रत पांडव विपत्तींत असल्यामुळें माझें अंतःकरण त्यांचेकडे विशेष ओढ घेतें, येवढेंच.' विदुर हास्तिनापुरास परत आल्यावर, 'आतां हा आपल्या बापाचें मन वळवून कदाचित् पांडवांना वनांतून परत आणवील' अशी भीति दुर्योधनाचे मनांत उत्पन्न झाली. द्यूतांतील पणाच्या अटीप्रमाणें पांडवांनीं वनवास पत्करिला आहे; ती अट अथवा आपली प्रतिज्ञा मोडून पांडव १३ वर्षांत केव्हांहि परत येणार नाहींत; आलेच तर आपण पुनः द्यूत खेळून त्यांस फजित करूं; अशा गोष्टी सांगून शकुनीनें दुर्योधनाचें मन शांत करण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याचा विशेष उपयोग झाला नाहीं. शेवटीं पुष्कळ भवति न भवति होऊन कर्ण, शकुनि, दुर्योधन व दुःशासन हे चौघे वनामध्यें पांडवांस गांठून त्यांचा वध करण्यास निघाले! ही गोष्ट भगवान् व्यासांना अंतर्ज्ञानानें कळली. त्यांनीं त्यांना वाटेंतच गांठून या दुष्ट व नीच कृत्यापासून पराङ्मुख केलें. नंतर व्यास धृतराष्ट्राकडे येऊन त्यास म्हणाले:—'पांडवांना आधीं कपटद्यूतानें जिंकून वनांत पाठविलें हीच गोष्ट अगदीं अयोग्य झाली असून आतां त्यांच्या राज्यासाठीं हा दुर्योधन पांडवांचा समूळ नाश करण्याची खटपट करीत आहे, याचें तूं निवारण कर. पुत्रस्नेहामुळें मोहित होऊन तुला आपलें, आपल्या कुलाचें व राष्ट्राचें हित कशांत आहे, हें कळेनासें झालें आहे. तूं ही गोष्ट इतक्या थरास येऊं दिलीस हीच आधीं मोठी चूक झाली.

यदि पार्थिव कौरव्यान् जीवमानानिहेच्छसि ।
दुर्योधनस्तव सुतः शमं गच्छतु पांडवैः ॥

सर्व कौरवांनीं जिवंत रहावें अशी जर तुझी इच्छा असेल, तर तुझा पुत्र दुर्योधन यानें पांडवांशीं सख्य करावें हेंच श्रेयस्कर आहे!' इतक्यांत पांडवांची वनांतील स्थिति पाहून व त्यांचे तोंडून सर्व हकीकत ऐकून मैत्रेय नांवाचा एक निःस्पृह व तपोनिष्ठ ऋषि धृतराष्ट्राकडे आला. भीष्म, द्रोण इत्यादि वृद्ध माणसांना आपल्या समक्ष झालेला हा असा छळ कसा खपला, असा त्यानें सर्वांस दोष दिला; 'कौरवांच्या सभेमध्यें झालेलें तें द्यूत व द्रौपदीचा तो छळ हीं दोन्हींहि आर्यांच्या सभेला शोभणारीं नसून दस्यूंच्या-राक्षसांच्या-सभेमध्यें असले प्रकार शोभले असत. धृतराष्ट्रा, ही सर्व हकीकत

ऐकून सर्व ऋषि तुला उघड उघड दोष देत आहेत!' असें सांगून तो दुर्योधनास सौम्यपणानें म्हणालाः—' पांडव फार पराक्रमी आहेत, त्यांना युद्धांत जिंकण्याची आशा करणें व्यर्थ आहे. तेव्हां त्यांचा द्वेष न करितां त्यांशीं तूं सख्य कर.' परंतु यांवर दुर्योधन कांहींच उत्तर न करितां पायाचे बोटानें ' उकरीत उद्धटपणानें आपल्या मांडीवर थाप मारली! या त्याच्या मगरूरीचा राग येऊन ' युद्धामध्यें तुझी हीच मांडी गदेच्या प्रहारानें भीमसेन मोडून टाकील ' असा शाप देऊन मैत्रेय ऋषि तेथून रागानें चालते झाले! ( वनपर्व अ० १—११ )

धृतराष्ट्राच्या पुत्रांनीं पांडवांचें सर्वस्व हरण करून त्यांना वनवासास पाठविलें, ही हकीकत ऐकून, कुंतीच्या माहेरचीं माणसें, द्रुपद राजाकडील मंडळी, यादव व श्रीकृष्ण हे त्यांच्या समाचारास काम्यक वनांत आले. आपला भाऊ धृष्टद्युम्न आणि सहाय्यकर्ता कैवारी श्रीकृष्ण यांना पाहून सभेंतील छळाचें व विटंबनेचें स्मरण होऊन द्रौपदीच्या शोकास भरते आलें! " पांडवांची भार्या, श्रीकृष्णाची मैत्रिण, धृष्टद्युम्नाची बहीण, पांडुराजाची सून व द्रुपद राजाची कन्या एक वस्त्र नसलेली व रजस्वला असतां दुष्टांनीं सभेंत ओढून आणून तिची विटंबना करावी, आणि ती तिच्या पांच पतींनीं मुकाट्यानें पहावी काय? भीमाच्या बाहुबलास व अर्जुनाच्या गांडीव धनुष्यास धिःकार असो! सामान्य मनुष्यसुद्धां आपल्या बायकोच्या अब्रूचें रक्षण करण्यांत जिवाचीहि पर्वा करीत नाहीं. पण माझे पति पराक्रमी व शूर असूनहि त्यांनीं माझी उपेक्षा केली. ज्या दुष्टांनीं भीमसेनाला विष घालून नदींत बुडविलें वारणावत नगरांत पांडवांन व कुंतीला जाळूं पाहिलें, आणि माझी सर्व वडील माणसांदेखत व सर्व राजांसमक्ष भरसभेंत विटंबना केली, त्या जुवेबाजांना माझ्या पतींनीं कां क्षमा करावी?" असें म्हणून व दोनहि हातांनीं आपलें तोंड झांकून ती मोठ्यानें रडूं लागली. आणखी कांहीं वेळानें आंतून येत असलेले हुंदके दाबून ती म्हणालीः—धृतराष्ट्राच्या पुत्रांनीं केलेला छळ ज्या अर्थीं मला एकाद्या अनाथ स्त्रीप्रमाणें निमूटपणें सहन करावा लागला, त्या अर्थीं मला पति नाहींत, पिता नाहीं, पुत्र नाहींत, भाऊ नाहीं व श्रीकृष्णा तुझाहि मला आधार नाहीं; असेंच झालें म्हणावयाचें!' श्रीकृष्णांनीं द्रौपदीचें अनेक प्रकारें समाधान केलें:—' पांडव सर्व कौरवांना मारून राज्य संपादन करतील व नंतर तूं त्यांची पुन्हां पट्टाभिषिक्त राणी होशील! एकवार आकाश खालीं कोसळेल, पृथ्वीचे तुकडे तुकडे होतील, समुद्रहि आटेल,

पण माझें हें भाषण खोटें होणार नाहीं.' असें त्यांनीं तिला आश्वासन दिलें. याप्रमाणें पांडवांचेंहि समाधान करून युधिष्ठिराच्या संमतीनें सुभद्रा व अभिमन्यु यांना बरोबर घेऊन श्रीकृष्ण द्वारकेस गेले; धृष्टद्युम्न द्रौपदीच्या पांचहि मुलांना घेऊन आपल्या नगरास गेला; धृष्टकेतूहि—आपली बहीण—नकुलाची भार्या—करेणुमती हिला घेऊन आपल्या देशास गेला. समाचारास आलेली मंडळी याप्रमाणें आपापल्या देशीं निघून गेल्यावर पांडव काम्यकवन सोडून द्वैतवनांत येऊन राहिले.

द्वैतवनांत राहिल्यानंतर एके दिवशीं संध्याकाळीं सर्व पांडव एके ठिकाणीं बोलत बसले असतां, द्रौपदीचे मनांत डांचत असलेलें सर्व दुःख ती धर्माला सांगूं लागली. कौरवांचें पारिपत्य न करितां पांडव वनामध्यें येऊन तपस्व्याप्रमाणें स्वस्थ बसले आहेत, त्याचा त्या मानी क्षत्रिय राजकन्येला फार राग आला. ती म्हणाली:—' कौरवांनीं आपला इतका छळ केला आणि तुम्हांसारख्या राजपुत्रांना व माझ्यासारख्या राजकन्येला त्यांनीं वनांत पाठविलें, हें पाहून तुम्हांला त्वेष व संताप कसा येत नाहीं ? तुम्ही क्षत्रिय आहां, तेव्हां तुम्हांला असलें वर्तन मुळींच शोभत नाहीं,

> यो न दर्शयते तेजः क्षात्रियः काल आगते ।
> सर्वभूतानि तं पार्थ सदा परिभवंत्युत ॥

**योग्य काल प्राप्त झाला असतांहि जो क्षत्रिय आपलें तेज दाखवीत नाहीं व पराक्रम गाजवीत नाहीं, त्याची सर्व प्राणी नेहमीं अप्रतिष्ठा करितात. प्रसंगाप्रमाणें सदय अथवा निष्ठुर होणें हें ज्यास साधत नाहीं, तो खरा क्षत्रिय नव्हे. मृदु केव्हां व्हावें व निष्ठुरता केव्हां धरावी हें जाणून त्याप्रमाणें जो वागतो त्यालाच राजा ही पदवी शोभते.** ' यांवर युधिष्ठिरानें क्रोधाचे दोष सांगून क्षमेची प्रशंसा केली. तो म्हणाला:—'या जगांत क्रोधासारखा दुसरा दुर्गुण कोणताहि नाहीं. चांगल्या गोष्टीचा नाश या एका रागामुळेंच होत असतो. **क्षमा हेंच सर्व विश्वाचें बंधन आहे.** पृथ्वीवर जर क्षमाशील माणसें नसतीं; एकानें अप्रिय भाषण करतांच दुसऱ्यानेंहि जर उलट तसेंच केलें असतें, एकानें मारिलें म्हणून दुसऱ्यानेंहि जर उलट त्यास मारिलें असतें, तर या मानवी सृष्टीचा

संहार होऊन गेला असता. **प्रत्येक मनुष्याचे अंगीं थोडीबहुत क्षमा आहे म्हणूनच हें जग चाललें आहे.** सत्य, तप, पुण्य, पवित्र आचरण या सर्व सद्गुणांचा अंतर्भाव एका क्षमेमध्यें होतो. ' अशा प्रकारच्या भाषणानें द्रौपदीचें थोडेंच समाधान होणार ! ती रागानें म्हणाली:—' या जगांत न्याय, धर्म, सत्याचरण यांचें चीज कोठें होत आहे ? येथें धर्मानें वागणारांना ईश्वर दुःखांत लोटून देतो आणि अधार्मिकांना सुखांत व वैभवांत ठेवितो. जग न्यायानें चाललेलें नाहीं व जगांत न्यायहि नाहीं. लहान मुलें जशीं आपल्या बाहुल्यांशीं खेळत असतात, असा ब्रह्मदेव या प्राण्यांशीं नुसता खेळत आहे ! ' यांवर युधिष्ठिर म्हणाला:—' मी धर्माचरण करितों तें त्याचें फल मिळावें म्हणून नव्हें, तर देवाची तशी आज्ञा आहे व सज्जन लोक तसें वागतात, म्हणून मी तसें वर्तन करतों. माझें मन स्वभावतःच धर्माकडे जसें ओढ घेते तसें तें त्याचे फलाकडे घेत नाहीं. **फलप्राप्तीसाठींच धर्माचरण करणारे लोक खरे धार्मिक नसून धर्म व त्याचें फल यांची देवघेव करणारे व्यापारी होत.** ' धर्माच्या ह्याहि बोलण्याचा द्रौपदीचे मनावर परिणाम झाला नाहीं. कौरवांचें पारिपत्य करून व आपलें राज्य परत घेऊन माझ्या दुःखाचें परिमार्जन करणें हें तुमचें कर्तव्य आहे, असें ती पुनः आग्रहपूर्वक सांगूं लागली. इतक्यांत भीमसेनाहि बोलावयास लागून युधिष्ठिरास दोष देऊं लागला. तो म्हणाला:—**क्षत्रियांनीं नुसतें ' धर्माचरण ' करून भागत नाहीं; त्यांनीं 'पराक्रम' गाजवून यशहि मिळविलें पाहिजे.** दुर्योधनानें आमचें राज्य घेतलें तें रणांगणांत युद्ध करून न्यायानें घेतलेलें नाहीं; तें त्यानें कपटानेंच मिळविलें आहे. तें त्याजपासून आतांच हरण करून घेतल्यास त्यास कांहींच हरकत नाहीं. **' धर्म धर्म ' अशी जपमाळ घेऊन बसलेल्या कोणत्या राजास राज्य मिळालें आहे ? धर्माप्रमाणें दान, यज्ञ-याग, सज्जनांचा सत्कार व वेदरक्षण हींहि क्षत्रियांचीं कर्तव्यें आहेत. तीं उत्तम रीतीनें करण्यास राज्य मिळविणें जरूर आहे.** तें न मिळवितां क्षत्रिय असूनहि आपण तपस्व्यांप्रमाणें वनांत राहून फुकट काळ दवडीत आहों ! त्यामुळें आमचें बल व पराक्रम हीं असून नसून सारखींच झालीं आहेत ! ' भीमाचें हें भाषण ऐकून युधिष्ठिरास वाईट वाटलें. तो म्हणाला:—' असलीं मर्मभेदक भाषणें करून तुम्ही माझा पाणउतारा करीत आहां, याचा तुमच्याकडे मुळींच दोष नाहीं. द्यूतामध्यें मला भान न राहिल्यामुळें तुम्हांस पणाला लावून मींच तुम्हांवर हें वनवासाचें संकट

आणिलें ! भीमसेना, त्यावेळीं तूं म्हणालास त्याप्रमाणें जर आधींच माझे हात जाळिले असतेस, तर पुढें द्यूत खेळून द्रौपदीची विटंबना करण्यास मी कारणीभूत झालों नसतों. निदान त्यावेळीं तूं आपली असंमती तरी अगदीं स्पष्टपणें कळवावयाची होती; आतां बोलून कांहीं उपयोग नाहीं. बारा वर्षें वनवास व एक वर्ष अज्ञातवास करीन, म्हणून जी गोष्ट एकदां कबूल केली ती मी कधींहि मोडणार नाहीं.

**—मम प्रतिज्ञां च निबोध सत्यां । वृणे धर्ममममृताज्जीविताच्च ।**
**राज्यं च पुत्राश्च यशो धनं च । सर्वं न सत्यस्य कलामुपैति ॥**

**मी आपली प्रतिज्ञाच खरी करणार. अमरत्व, प्राण, राज्य, पुत्र, यश, धन हीं सर्व सत्याचे पासंगालाहि पुरणार नाहींत, असें मी समजतों.** ' यांवर भीमसेन म्हणालाः—आतांपर्यंत आपणांला वनांत येऊन तेरा महिनेच झाले आहेत; यांवरून अशीच तेरा वर्षें काढणें किती दुर्घट आहे हें तुम्हीच पहा. आपलें सर्वांचें रूप व बल सर्व ठिकाणचे राजांना व लोकांना ठाऊक आहे; तर आपण एक वर्षपर्यंत कोणासहि न समजतां अज्ञातवास कसा करणार ! त्या काळांत जर आपणांस कोणी ओळखिलें तर आपणांस पुन्हां बारा वर्षें वनवास करावा लागेल ! इतक्या वर्षांच्या अवधींत आपण जगद्भक्षक काळाचे तावडींत सांपडणार नाहीं म्हणून कशावरून ? यासाठीं आतांच युद्ध करून आपलें राज्य घेणें हेंच मला श्रेयस्कर दिसत आहे. ' यांवर युधिष्ठिरानें उत्तर केलें:--' कौरवांचे बाजूस भीष्म, द्रोण, कृप, अश्वत्थामा, कर्ण यांचेसारखे शस्त्रास्त्रनिपुण योद्धे आहेत; त्यांच्या मानानें अस्त्रविद्येंत आपण अझून कमी आहों. अशा स्थितींत अस्त्रविद्या सिद्ध होईपर्यंत अनुकूल काळाची वाट पहात स्वस्थ राहावें हेंच उचित आहे. त्यांशीं युद्ध करून आपलें राज्य परत मिळविणें तूर्त बहुतेक अशक्यच आहे. त्यांतून बारा वर्षें वनवास करण्याचें अंगिकारलेलें व्रत मोडून जर आपण युद्धास सिद्ध झालों, तर भीष्मांचा जरी आपणाकडेच ओढा आहे तरी, ते या वचनभंगाबद्दल आपणांस क्षमा करणार नाहींत, ' धर्माचें हें बोलणें ऐकून भीम निरुत्तर झाला. याप्रमाणें त्यांचीं भाषणें चालली असतां भगवान् व्यास तेथें आले. त्यांनीं धर्मास एकांतीं नेऊन अस्त्रविद्येस उपयोगीं पडणारी ' प्रतिस्मृति ' नांवाची विद्या धर्मराजास शिकविली, व ती अर्जुनास शिकविण्यास सांगून व्यास निघून गेले. यानंतर कांहीं दिवस

त्याच वनांत राहून पांडव सर्व परिवारांसह सरस्वतीतीरच्या काम्यक वनांत पुन्हां परत आले. ( वनपर्व अ० ११—३६ )

काम्यक वनांत येऊन कांहीं काळ लोटल्यानंतर व्यासांनीं दिलेली 'प्रतिस्मृति' विद्या धर्मानें अर्जुनास शिकविली, व त्यास इंद्रापासून दिव्य अस्त्रें संपादन करून आणण्यासाठीं पाठविलें. अर्जुन धनुष्य व बाण, खड्ग व कवच वगैरे सामुग्री घेऊन उत्तर दिशेनें चालला. हिमालय व गंधमादन पर्वत ओलांडून तो इंद्रकील पर्वतावर आल्यावर तेथें इंद्रानें एका देदीप्यमान तपस्व्याच्या रूपानें त्यास दर्शन दिलें; व त्यास वर देऊं केला. तेव्हां अर्जुनानें त्याजपाशीं स्वर्गांतील दिव्य अस्त्रें मागितलीं. तेव्हां इंद्र म्हणालाः—' मोठे मोठे ऋषि यज्ञयागादि करून ज्याची इच्छा करितात तो स्वर्ग मागावयाचा टाकून तूं अस्त्रें कशाला मागतोस? अस्त्रें घेऊन तुला काय करावयाचें आहे ? ' तेव्हां अर्जुनानें उत्तर दिलेंः—' माझ्या भावांनीं अस्त्रें प्राप्त करून घेण्याकरतांच मला पाठविलें आहे. शिवाय **वनामध्यें त्यांना दुःखांत व संकटांत टाकून मीं इकडे स्वर्गसुख उपभोगणें उचित नव्हे.** ज्या कामासाठीं त्यांनीं मला पाठविलें तें साध्य करण्याकरतांच मला प्रयत्न केला पाहिजे. **त्यांच्या आज्ञेपुढें मी स्वर्ग तुच्छ समजतों.** ' ' तूं श्रीमहादेवास संतुष्ट कर. त्यांनीं तुला दर्शन दिलें, म्हणजे मग मी तुला माझीं अस्त्रें शिकवीन ' असें सांगून इंद्र गुप्त झाला. यानंतर महादेवास प्रसन्न करण्यासाठीं अर्जुनानें तेथें तपश्चर्येस आरंभ केला. चार महिने उग्र तप केल्यानंतर, अर्जुनाची परीक्षा पहाण्याचें शंकरांनीं मनांत आणिलें. त्यांनीं किराताचा वेष धारण केला; व अर्जुन ज्या वनांत तपश्चर्या करीत होता तेथें ते आले. मूक नांवाच्या एका दानवानें रानडुकराचें रूप घेऊन अर्जुनावर चाल केली असतां त्यानें तात्काळ धनुष्य सज्ज करून त्याजवर बाण रोंखला. तेव्हां ' हं, थांब ! ह्या वराहास मीं तुझ्या आधींच हेरलें आहे. तूं याजवर बाण टाकूं नको. ' असें किरातवेषधारी महादेव त्यास म्हणाले. परंतु तिकडे लक्ष न देतां अर्जुनानें वराहावर बाण सोडला. इकडे किरातानेंहि त्याच वेळीं बाण सोडला. दोन्ही बाण एकदम लागून तो वराह प्राणास मुकला. जो पशु एकदां एकानें रोंखला त्याजवर दुसऱ्यानें बाण टाकावयाचा नाहीं, हा मृगयेचा नियम मोडल्याबद्दल किरात व अर्जुन यांचेमध्यें भांडण सुरूं झालें. मृगयाधर्म मोडला तो तूंच मोडलास, असें एकमेक म्हणूं लागले; ह्याप्रमाणें बोलाचाली होतां होतां तें भांडण विकोपास जाऊन अर्जुन त्या किरातावर



दोन.ही बाण एकदम लागून वराय प्राणास मुकला. [ पृ ८४

सारखे बाण सोडूं लागला. त्या बाणांचा किरातावर कांहींच परिणाम होत नाहीं. हें पाहून अर्जुनास फार आश्चर्य वाटलें. शेवटीं अग्नीनें दिलेले दोन्ही अक्षय भातेंहि रितें पडले, तेव्हां मात्र त्यास भीति वाटली. तथापि तसेंच धैर्य धरून अर्जुन धनुष्यानेंच त्यास प्रहार करूं लागला; तों तें धनुष्यच किरातानें गिळून टाकिलें ! अर्जुनानें लागलीच आपली तरवार उपसून तिचा मोठ्या त्वेषानें व जोरानें किराताचे डोक्यावर वार केला. परंतु त्यास कांहीं एक इजा न होता तरवार मात्र मोडून पडली ! **याप्रमाणें अर्जुन सर्वस्वीं निःशस्त्र झाला तरी त्यानें क्षात्रियाचा बाणा सोडला नाहीं**. अर्जुनानें प्रथमतः किरातावर वृक्ष व शिला हीं फेंकली; व शेवटीं त्याशीं बाहुयुद्ध करावयास लागून त्याजवर तो सारखे मुष्टिप्रहार करूं लागला. तेव्हां शंकरांनीं नुसत्या आपल्या दिव्य तेजानेंच त्यास एकदम मूर्छित करून भूमीवर निश्चेष्ट पाडलें. कांहीं वेळानें सावध होऊन अर्जुनाची चूक त्याचे ध्यानांत आली. त्यानें प्रथमतः मृत्तिकेचें शिवलिंग करून त्याची भक्तिपुरःसर पूजा केली. तेव्हां असा चमत्कार झाला कीं, त्यानें जें जें पुष्प लिंगास वहावें, तें तें किराताच्या डोक्यावर गेलेलें त्याचे दृष्टीस पडावें ! हा किरातच प्रत्यक्ष महादेव आहे, असें यावरून त्याच्या लक्षांत येऊन त्यानें लागलीच त्यास साष्टांग नमस्कार घातला ! अर्जुनाचे शौर्य, धैर्य, क्षात्रतेज व निःसीम भक्ति पाहून महादेव संतुष्ट झाले. त्यांनीं आपलें पूर्व स्वरूप धारण करून अर्जुनास प्रेमपूर्वक गाढ आलिंगन दिलें. आणि नंतर आपल्या भयंकर व अमोघ अशा 'पाशुपतास्त्राचें धारण, मोक्ष व संहार या संबंधाचे निरनिराळे मंत्र त्यास शिकवून शंकर अदृश्य झाले. यानंतर वरुण, कुबेर, यम, या लोकपालांनींहि अर्जुनास दर्शन दिलें. यमानें आपली गदा, वरुणानें आपले पाश व कुबेरानें आपली 'अंतर्धान' व 'प्रस्त्रापन' हीं दोन अस्त्रें त्यास दिलीं, इतक्यांत इंद्राचा रथ घेऊन **मातली** सारथि तेथें आला; व इंद्रानें तुम्हांस स्वर्गांत बोलाविलें आहे, असें त्यानें अर्जुनास कळविलें; नंतर शुचिर्भूत होऊन, ज्या पर्वतावरील उदक व कंदमुळें खाऊन त्याचें तप सिद्धीस गेलें, त्या पर्वताचा व तेथील तपस्व्यांचा कृतज्ञतापूर्वक व प्रेमपुरःसर निरोप घेऊन अर्जुन रथांत बसला. तो रथ आकाशमार्गानें जात असतां,

**ददर्शाद्भुतरूपाणि भुवनानि सहस्रशः ।**
**न तत्र सूर्यः सोमो वा द्योतते न च पावकः ॥**

स्वयैव प्रभया तत्र द्योतन्ते पुण्यलब्धया ।
तारारूपाणि यानीह दृश्यन्ते द्युतिमन्ति वै ।
दीपवद्विप्रकृष्टत्वात्तनूनि सुमहांत्यपि ॥

जेथें सूर्यचंद्र नाहींत, जे स्वयंप्रकाश आहेत, जे आकारानें फारच मोठे आहेत तरी पृथ्वीपासून फार लांब असल्यामुळें लहानशा ताऱ्याप्रमाणें दिसतात, असे अनेक लोक अर्जुनानें पाहिले. शेवटीं तो रथ अमरावती नगरींत आला, इंद्रानें मोठ्या प्रेमानें आपल्या पुत्रास सिंहासनावर आपणाजवळ बसवून घेऊन त्याचें अभिनंदन केलें; व तो ज्या उद्देशानें तेथें आला होता त्या अस्त्रांच्या शिक्षणासंबंधाची त्यानें सर्व तजवीज केली. तेथें सुमारें पांच वर्षें राहून अर्जुनानें इंद्रापासून सर्व दिव्य अस्त्रें व प्रसिद्ध ' वज्रास्त्र ' संपादन केलें. नंतर इंद्राचे आज्ञेवरून तो चित्रसेन गंधर्वापाशीं नृत्य, गायन व वाद्यकला शिकला. याप्रमाणें अर्जुन इकडे सुखांत व आनंदांत होता, तरी वनामध्यें हालांत व दुःखांत दिवस कंठणाऱ्या भावांची आठवण होऊन, सभेमध्यें कर्ण दुःशासनादि खळांनीं जे शब्द उच्चारिले होते त्यांचेंहि त्यास वारंवार स्मरण होई. द्रौपदी व पांडव यांचे हृदयांत रात्रंदिवस बोंचणारे शल्य आपण अजून काढिलें नाहीं हें मनांत येऊन त्यास फारच वाईट वाटे. पुढें तर, परत जाऊन आपल्या भावांस भेटण्याची त्यास अतिशय उत्कंठा वाटूं लागली. परंतु **अर्जुनाच्या आत्मसंयमनाची व धैर्याची परीक्षा पहाण्याचें** इंद्राच्या मनांत होतें; ती परीक्षा होईपर्यंत त्यास परत जाण्याची परवानगी मिळेना.

एके दिवशीं इंद्रसभेमध्यें अप्सरांचें नृत्य-गायन चाललें असतां अर्जुनाची दृष्टि उर्वशीकडे विशेष उत्सुकतेनें वेधलेली दिसून आली. अर्जुनास ' स्वर्गफला'चा आस्वाद देण्यासाठीं त्याजकडे उर्वशीस पाठवावें, असें इंद्रानें चित्रसेनास एकांतीं सुचविलें. त्यानें इंद्राचा निरोप उर्वशीस कळविला. अर्जुनास पाहून तीहि आधींच मोहित झाली होती; तेव्हां तिनें चित्रसेनाचें म्हणणें मोठ्या आनंदानें कबूल केलें. त्या दिवशीं रात्रीं शुभ्र चांदणें पडल्यावर तिनें दिव्य अलंकार व नंदनवनांतील उत्तम उत्तम पुष्पें वेणींत घातलीं; तलम व झिरझिरित पांढरें शुभ्र पातळ नेसून व वरून अस्मानी रंगाचा शेला पांघरून ती अर्जुनाच्या घरीं गेली. येवढ्या रात्रीं थाटमाट करून उर्वशी आपल्या घरीं आलेली पाहून अर्जुन फारच



'तूं मला कुंती, माद्री, शची या मातांप्रमाणं पूज्य आहेस.' [ पृ. ८७

लाजला. तरी तीं येतांच तिचें पूज्यभावपूर्वक त्यानें आगतस्वागत केलें. तिनें चित्रसेनाचा निरोप कळवून आपलें मनोरथ पूर्ण करण्याविषयीं त्यास लाजत लाजत विनंति केली. परंतु अर्जुनानें आपलें मन चंचल होऊं दिलें नाहीं! ‘ पौरवकुळांतील आमचा पूर्वज जो पुरूरवा त्याची तूं भार्या आहेस; तेव्हां तूं मला कुंती, माद्री व शची या मातांप्रमाणें पूज्य आहेस ’ असे तो म्हणाला. ‘ पुरूरव्याचे मागून पौरव वंशांतील जे राजे तेथें आले त्यांनीं आम्हां अप्सरांचा उपभोग घेतला आहे; अप्सरांना कोणताहि दोष नाहीं. अप्सरांचा उपभोग हेंच काय तें स्वर्गसुख आहे.’ इत्यादि सांगून तिनें त्याचें मन वळविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. परंतु अर्जुन त्या पापकर्मास प्रवृत्त होईना. ‘ तूं नृत्य करीत असतां मी जो तुजकडे पहात होतों, तें कोणत्याहि पापवासनेनें नसून, तूं आमच्या भारत–कुलाची जननी आहेस, हें मनांत येऊन शुद्धभावानें पहात होतों. मी तुला नमस्कार करतों, तूं कृपा कर व आलीस तशी परत जा. तूं मला नरकांत पाडणारें हें कृत्य करण्याचा आग्रह करूं नको.

यथा कुंती च माद्री च शची चेह ममानघे ।
तथा च वंशजननी त्वं हि मेऽद्य गरीयसी ॥
गच्छ मूर्ध्ना प्रपन्नोऽस्मि पादौ ते वरवर्णिनी ।
त्वं हि मे मातृवत्पूज्या रक्ष्योऽहं पुत्रवत्त्वया ॥

तूं मला कुंती, माद्री आईसारखी व शचीप्रमाणें पूज्य आहेस व तूंहि मातेप्रमाणें माझें पापापासून रक्षण कर, असें अर्जुनानें उत्तर केले! आपल्या मनोरथाचा असा भंग झालेला पाहून उर्वशी अतिशय रागावली व ‘ तूं एक वर्षपर्यंत षंढ होऊन गाणेनाचणें शिकवीत राहशील ’ असा त्यास शाप देऊन ती निघून गेली! रात्रीं घडलेली ही सर्व हकीकत दुसरे दिवशीं अर्जुनानें चित्रसेनाकडून इंद्रास कळविली. मोठमोठ्या तपोनिष्ठ व मनोनिग्रही ऋषींच्या अंगीहि जें आत्मसंयमन नाहीं तें अर्जुनाचे ठिकाणीं वसत असलेलें पाहून, इंद्रास मोठा संतोष झाला. उर्वशीनें दिलेला शाप अज्ञातवासाचे वेळीं तुला आयताच उपयोगी पडेल ’ असें सांगून इंद्रानें त्याचें समाधान केलें. नंतर ‘अर्जुन इंद्रलोकीं सुखरूप आहे, अस्त्रें वगैरे शिकून तो लवकरच परत येईल. तोंपर्यंत तुम्हीं तीर्थयात्रा करून पुण्य संपादन करावें; म्हणजे पुढें होणाऱ्या कुरुक्षेत्रांतील युद्धांत तुम्हांस जय मिळेल,

असा निरोप पांडवांना कळविण्यासाठीं इंद्रानें लोमश नांवाच्या एका ऋषीस मृत्युलोकीं पाठविलें. ( वनपर्व अ० ३८–५१ )

अर्जुन तपश्चर्येस निघून गेल्यानंतर पांडव काम्यक वनांतच राहिले. तेथें त्यांनीं अध्ययन, तपश्चर्या, यज्ञयाग व ऋषींपासून निरानिराळ्या जुन्या कथांचें श्रवण यांत पांच वर्षें घालविली. पुढे एके दिवशीं पांडव अर्जुनाची काळजी करीत व आपल्या दुःखमय स्थितीविषयीं एकमेकाशीं बोलत बसले असतां ' बृहदश्व ' नांवाचे एक महर्षि त्यांना भेटावयास आले, धर्मानें त्यांना आपल्या दुर्दैवाची कहाणी सांगून, ' माझ्याहून अधिक दुःखी असा राजा तुम्हीं कधीं पाहिला किंवा ऐकिला आहे काय ? ' असा त्यांना प्रश्न केला, तेव्हां बृहदश्व ऋषि म्हणाले:—' तुजबरोबर तुझी साध्वी भार्या, पराक्रमी बंधु, शस्त्रें, रथ, दासदासी, पुरोहित व इतर ब्राह्मण याप्रमाणें सर्व परिवार आहे. परंतु निषध देशाचा नलराजा होता, त्यास जो वनवास घडला, त्यांत त्याजजवळ यांपैकीं कांहींहे–किंबहुना वस्त्रहि--नव्हतें. नलराजाप्रमाणें इतर कोणीहि केव्हांहि दुःख भोगलें नसेल ' असें सांगून त्यांनीं नलराजाची कथा सर्वांना विस्तारानें सांगितली, कथा संपल्यानंतर ते धर्मराजास म्हणाले:—' द्यूतांत पराभूत होऊन वनांत भटकत फिरणाऱ्या नलराजाला जसें राज्य मिळालें. तसें तें तुलाहि परत मिळेल, वनवास व अज्ञातवास संपवून परत गेल्यावर शकुनि पुन्हां द्यूतास बोलावून आपलें राज्य हरण करील, अशी जर तुला भीति वाटत असेल तर ती मी आतांच नाहींशीं करतों, ' असें म्हणून त्यांनीं धर्मराजास ' अक्षहृदय ' नांवाची द्यूताची गुप्त विद्या शिकविली व ते पांडवांचा निरोप घेऊन निघून गेले. ( वनपर्व अ० ५१—७९ )

दिव्य अस्त्रे संपादन करण्यासाठीं अर्जुन निघून गेल्यास बरेच दिवस होऊन गेले, तरी त्याचा कांहीं समाचार कळेना; म्हणून पांडव व द्रौपदी काळजी करीत असतां लोमश ऋषि तेथें आले. त्यांनीं अर्जुनाविषयींची सर्व हकीकत व इंद्राचा निरोप त्यांना कळविला. अर्जुनास सर्व दिव्य अस्त्रे प्राप्त झाल्याचें ऐकून पांडवांना अतिशय आनंद होऊन, राज्य परत कसें मिळेल ही त्यांची काळजी दूर झाली. नंतर ज्यांना दूरच्या प्रवासांतील श्रम सोसावयाचे नाहींत, अशा बरोबरच्या ब्राह्मणांना व इतर नागरिकांना परत हस्तिनापुरास पाठवून पांडव तीर्थयात्रेस निघाले. बरोबर लोमश व इतर ऋषि होतेच. प्रत्येक

तीर्थांच्या उत्पत्तीविषयींच्या व इतर कथा वाटेमध्यें लोमश ऋषि पांडवांना सांगत असत. ही तीर्थयात्रा त्यांनीं बरेंच दिवस केली. नैमिषारण्य, गयःशिरपर्वत, अगस्त्याश्रम, भृगुतीर्थ, हेमकूटपर्वत, वैतरणी नदी, महेंद्राचल, पयोष्णी नदी इत्यादि पुण्यस्थानें व तीर्थें पहात पहात ते गंधमादन पर्वताकडे चालले. तिकडे रथ जाण्यासारखा मार्ग नसल्यामुळें तो तेथेंच ठेवून सर्वजण पायींच निघाले. या प्रवासांत त्यांचे—विशेषतः राजकन्या द्रौपदीचे—फार हाल झालें. तरी तें तसेंच सहन करून कांहीं दिवसांनीं ते बदरिकाश्रमास गेले तेथील नर—नारायण या पुराणमुनींच्या पवित्र आश्रमामध्यें राहून अर्जुनाची वाट पहाण्याचा त्यांनीं संकल्प केला. त्या आश्रमांत सहा दिवस राहिल्यानंतर सातवें दिवशीं, वाऱ्याचे जोरानें हजार पाकळ्यांचें एक सुंदर कमल ईशान्य दिशेकडून येऊन आश्रमाजवळ पडलें. त्या कमलाचा सुवास व गोंडसपणा पाहून तसलीं आणखीं कांहीं कमलें द्रौपदीस हवींशीं वाटलीं. म्हणून तीं आणण्यासाठीं भीमसेन गदा घेऊन एकटाच ईशान्येस निघाला. मार्गांत आडवें येणाऱ्या हिंस्रपशूंना गदेच्या प्रहारानें ठार करीत तो चालला असतां ती वाट एका दाट कर्दळीवनांतून जात असलेली त्यास आढळली. त्या वाटेमध्येंच एक म्हातारा वानर बसलेला त्यास दिसला. तो निजल्यासारखा पडला होता; म्हणून त्यास भीमानें मोठ्यानें हांक मारून जागें केलें. निर्दयपणानें आपली झोंप मोडल्याबद्दल भीमास दोष देऊन वानर म्हणालाः—' हा देवलोकचा मार्ग आहे; तिकडे तूं जाऊं नको. हें साहस करशील तर व्यर्थ मरून जाशील.' यावर भीमानें आपलें नांव व कुल सांगून त्यांसहि त्याचें नांव विचारिलें; आणि 'मुकाट्यानें मला वाट दे' असेंहि त्यास दरडावून सांगितलें ! 'मी व्याधिग्रस्त आहे, मला जागचें हालवत नाहीं; तेव्हां मला ओलांडून जा किंवा माझें शेंपूट एका बाजूस सारून जा' असें वानरानें उत्तर केलें. भीम मोठ्या ऐटीनें त्याचे पुच्छास हात घालून तें जोरानें उचलूं लागला तरी तें उचलेना ! म्हणून शेवटीं त्यानें दोन्ही हात लावून पाहिले, तरीहि कांहीं इलाज चालेना. भीमानें आपलें सर्व बल खर्च करून तें पुच्छ उचलण्याचा पराकाष्ठेचा प्रयत्न केला; तरी तें शेंपूट काडीइतकेंहि हालेना ! तेव्हां सर्व गर्व जिरून भीमानें त्यास नम्रपणानें नमस्कार करून, आपण कोण म्हणून त्यास विचारिलें. तेव्हां आपण वायुपुत्र हनुमान् आहों, असें कळवून त्यानें त्यास रामावतारांतील कथा सांगितली. आपल्या थोरल्या भावाची भेट झालेली पाहून भीमास आनंद झाला. नंतर त्याचे

विनंतीवरून हनुमानानें समुद्रलंघनाच्या वेळचें आमचें प्रचंड रूप त्यास दाखविलें. भीमास दोन वर देऊन व त्यास कुबेराच्या सौगंधिक वनाचा मार्ग दाखवून हनुमान् गुप्त झाला. त्यानें दाखविलेल्या रस्त्यानें बराच वेळ चालल्यावर भीमानें एक रम्य नदी व जवळच असलेलें कुबेराचे सौगंधिक वन पाहिलें. त्या वनामध्यें एक लहानशी पुष्करिणी असून तींतच तीं सुंदर कमलें उगवलेलीं होतीं. त्या वनाचें व पुष्करिणीचें संरक्षण करणाऱ्या यक्ष-राक्षसांनीं, कमलें नेण्यापूर्वी कुबेराची परवानगी घेऊन येण्यास भीमास सांगितलें. तेव्हां भीमानें उत्तर केलें:—' मी कुबेराकडे जाणार नाहीं; व त्याची माझी गांठ पडली तरी मला याचना करतां यावयाची नाहीं. कारण ' **न हि याचंति राजान एष धर्मः सनातनः** ' कारण **क्षत्रियांनीं-राजांनीं-याचना करूं नये हा सनातन धर्म आहे.** शिवाय पर्वतावरील पाणी खालीं सांठून हें सरोवर झालें असल्यामुळें तें सृष्टिनिर्मित आहे; यांवर एकट्या कुबेराचा कोणता हक्क आहे ? यांवर सर्वांची सारखीच सत्ता आहे. ' असें म्हणून तो पुष्करिणीकडे निघाला. यक्ष-राक्षसांनीं त्यास प्रतिबंध करतांच त्यानें गदेनें सर्वांना जमीनदोस्त करून टाकिलें ! नंतर पुष्करिणींत स्नान करून व तिचें अमृततुल्य उदक प्राशन करून तो विश्रांतीसाठीं तेथेंच बसला. कांहीं वेळानें भीमाचे मागोमाग पांडव व द्रौपदी ही बरोबरच्या घटोत्कच वगैरे मंडळीसह तेथें आली. कुबेरानेंहि त्यांना तेथें राहण्याची परवानगी दिली. तीप्रमाणें तेथें कांहीं दिवस राहून ते पुन्हां नर-नारायणांच्या बदरिकाश्रमीं परत आले. ( वनपर्व अ० ८०—१५६ ).

कांहीं दिवसांनीं पांडवांवर एक मोठेंच संकट आलें. जटासुर नांवाचा एक राक्षस ब्राह्मणाचे वेषानें पांडवांबरोबर आलेल्या ब्राह्मणांत मिसळला होता; व पांडवांच्या शस्त्रास्त्रांवर नजर ठेवून द्रौपदीचें हरण करण्याची संधि पहात होता. एके दिवशीं घटोत्कच वगैरे राक्षस जवळ नाहींत व भीमसेनहि शिकारीस गेला आहे, अशी संधि पाहून त्या राक्षसानें अकाळविकाळ रूप धारण केलें, व पांडवांचीं शस्त्रें हिसकावून घेतली; आणि युधिष्ठिर, नकुल, सहदेव व द्रौपदी यांना उचलून घेऊन तो जाऊं लागला ! सहदेव त्याचे हातून मोठ्या कष्टानें सुटला; व त्याचेबरोबर युद्ध करणार इतक्यांत भीमसेन तेथें आला. लागलीच दोघांचें बाहुयुद्ध सुरूं झालें. त्यांत भीमानें शेवटीं त्यास हिडिंब, बक, किर्मिर यांचप्रमाणेंच यमसदनीं पाठविलें. कांहीं दिवसांनीं उत्तरेकडे जाण्याचें मनांत येऊन

सर्वजण प्रवास करूं लागले. सात दिवस वाट चालल्यावर ते हिमालयाचे पृष्ठभागीं वृषपर्व्याच्या आश्रमास पोंचले. तेथें सात दिवस मुक्काम करून ते गंधमादन पर्वतावरील आर्ष्टिषेण ऋषीच्या आश्रमास गेले; आणि त्याच ऋषीच्या आज्ञेवरून अर्जुनाची वाट पहात तेथेंच रहाण्याचा त्यांनीं निश्चय केला. मध्यंतरीं पुन्हां द्रौपदीच्या सांगण्यावरून भीमसेन गंधमादन पर्वतावर जाऊन सिंहनाद करूं लागला. तें स्थान यक्षांचा राजा कुबेर यांचे असल्यामुळें, त्याचें व भीमाचें युद्ध झालें. त्यांत भीमानें अनेक यक्षराक्षस मारून, शेवटीं कुबेराचा सखा 'मणिमान्' नांवाचा एक राक्षस होता त्यासहि ठार केलें. द्रौपदीला आर्ष्टिषेण ऋषीच्या आश्रमांत ठेवून धर्मादि पांडवहि भीमाचे पाठोपाठ आले. त्यांची व कुबेराची भेट झाली आणि एकमेकांनीं एकमेकांचे अपराधांची क्षमा करून सख्य केलें.

इकडे पांडवांना अर्जुनाचा समाचार कळविण्यासाठीं लोमश ऋषींस पाठवि-ल्यानंतर अस्त्रविद्येंत पूर्ण प्रवीण झालेल्या अर्जुनास इंद्रानें आपला रथ व सारथी बरोबर देऊन निवातकवच नांवाच्या राक्षसांशीं युद्ध करण्यास पाठविलें. त्यांचा अर्जुनानें वज्रास्त्रानें संहार केला, व परत येतांना हिरण्यपुर नांवाच्या नगरांतील 'कालखंज' दैत्याचाहि रौद्रास्त्रानें वध करून व विजय संपादन करून तो अमरावतीस परत आला. याप्रमाणें देवांचें कार्य करून कृतकृत्य होत्साता अर्जुन इंद्राचें रथांत बसून गंधमादन पर्वतावर येऊन आपल्या भावांस भेटला. शंकराचें पाशुपतास्त्र, इंद्राचें वज्रास्त्र व इतर दिव्य अस्त्रें संपादन करून अर्जुन परत आलेला पाहून पांडवांना अत्यानंद झाला. आतांपर्यंत पांडवांनीं वनवासांत सुमारें ११ वर्षें काढिलीं व ते पुन्हां द्वैतवनांत परत येण्यासाठीं निघाले पर्वतावर जेथें वाट चांगली नसे, तेथें घटोत्कच वगैरे राक्षस पांडवांना खांद्यावर घेऊन चालत असत. याप्रमाणें मार्गक्रमण करीत ते सुबाहु राजाच्या देशांत आले. त्याजवळ ठेविलेले आपले रथ, सारथी वगैरे घेऊन ते पुनः वाट चालूं लागले. मध्यंतरी वनामध्यें एका मोठ्या प्रचंड अजगरानें आपल्या अजस्त्र विळख्यांनीं भीमास जखडून टाकिलें होतें; भीमानें कितीहि प्रयत्न केला तरी त्याची त्या सर्पापासून सुटका होईना. अर्थात् त्याच्या शक्तीचा व तीबद्दलच्या गर्वाचा एकदम लय झाला. शेवटीं धर्म तेथें आला; त्यानें त्या सर्पानें विचारलेल्या सर्व प्रश्नांचीं मोठ्या चातुर्यानें उत्तरें देऊन भीमास मोकळें केलें. स्वर्गांत असलेला नहुष राजा ऐश्वर्यमदानें इतका धुंदा झाला होता कीं, तो आपला रथ हजार ब्राह्मणांकडून ओढीत असे! हें काम अगस्ति ऋषीकडून करवीत असतां त्यानें त्यास लाथ मारिली! तेव्हां अगस्तीनीं त्यास

शाप दिल्यामुळें त्यांस हा सर्पदेह प्राप्त झाला होता. धर्मानें त्यास शापमुक्त करून पुनरपि स्वर्गांत पाठविलें. याप्रमाणें प्रवास करीत ते द्वैतवनांत आले. तेथें पावसाळा संपेपर्यंत राहून शरदृतु लागल्यावर ते तेथून निघून काम्यकवनांत आले. पांडव काम्यकवनांत आलेले ऐकून श्रीकृष्ण त्यांना भेटावयास आले. युधिष्ठिराचें सत्यव्रत पूर्वींइतकेंच दृढ आहे कीं नाहीं, याची परीक्षा पहाण्यासाठीं श्रीकृष्ण त्यास म्हणाले:—'युधिष्ठिरा, बारा वर्षें वनवास व एक वर्ष अज्ञातवास करण्याची जी तुझी प्रतिज्ञा आहे ती न मोडतां तुझें राज्य तुला परत मिळण्याची मी एक युक्ति सांगतों. आम्ही तीस कोटि यादव तुजकरितां युद्ध करण्यास तयार आहों. यादवसेनेचें आधिपत्य स्वीकारून बलराम हस्तिनापुरावर चाल करून जाईल; व कौरवांचा पराभव करून तुमचें राज्य तुम्हांस परत देईल.' पण श्रीकृष्णाची ही मसलत युधिष्ठिरास रुचली नाहीं. तो म्हणाला:— 'आमचा धर्म, आमचे योगक्षेम आमचे आप्तजन व आम्ही सर्व तुझ्या आश्रयावरच अवलंबून आहों; किंबहुना आम्ही तुझे दास आहोंत. तेव्हां **आम्हांस सत्यमार्ग सोडतां येत नाहीं.** वनवास व अज्ञातवास संपल्यावर आम्हीं होऊनच तुझें साहाय्य मागावयास येऊं. पुढें होणाऱ्या युद्धांत आमची सर्व भिस्त तुजवरच आहे. पण तेरा वर्षें संपण्यापूर्वीं आमचें राज्य आम्हांस नको.' यानंतर द्रौपदीचें पांच पुत्र व अभिमन्यु यांचें क्षेमकुशल कळवून धनुर्विद्येंतील त्यांच्या निपुणतेचें श्रीकृष्णांनीं मोठ्या कौतुकानें द्रौपदीजवळ वर्णन केलें. याप्रमाणें संभाषणें चाललीं असतां मार्कंडेय ऋषि तेथें आले. या महर्षींनीं त्यांचेजवळ बरेच दिवस राहून निरनिराळ्या पुराणकथा सांगून व धर्मासंबंधीं अनेक विषयांचा बोध करून त्यांस उपदेशामृत पाजिलें. हा भाग महाभारतांत 'मार्कंडेयसमस्या' या नांवानें प्रसिद्ध आहे. (वनपर्व अ० १५७—२३५.)

वनवासांत राहून याप्रमाणें हालअपेष्टा सोशीत पांडव दिवस कंठीत असतां इकडे हस्तिनापुरांतील दुर्योधनादि चांडाळमंडळ स्वस्थ बसलें नव्हतें. पांडवांचें सर्व वैभव नष्ट होऊन आतां ते वनामध्यें द्रौपदीसह वल्कलें नेसून राहिले आहेत; तेव्हां कोणत्या तरी निमित्तानें तिकडे जाऊन व आपलें वैभव दाखवून त्यांना लाजवावें आणि त्यांचे दुःखावर डागण्या द्याव्या, अशी अजब युक्ति कर्ण व शकुनि यांनीं काढली; व ती दुर्योधनास कळविली. **सज्जनांना अन्यायानें छळून त्यांस नुसत नागविण्यानेंच दुष्टांचें समाधान होत नसतें.**

सज्जन दुःखांत असतां आपलें वैभव त्यांचे डोळ्यापुढें नाचवून त्यांस हिणविण्यांतच दुष्टांना मोठा आनंद होत असतो. द्वैतवनामध्यें कौरवांचें घोष ( खिल्लारखाने ) होते ते पहाण्यासाठीं व मृगया करण्यासाठीं वनांत जावयाचें, असें निमित्त करून त्यांनीं ती गोष्ट धृतराष्ट्रापाशीं काढिली. परंतु त्यास हा बेत कांहीं निराळ्याच कारणामुळें रुचला नाहीं. कौरवांच्याच अन्यायाचरणामुळें सांप्रत पांडव वनांत दुःख भोगीत आहेत; तेव्हां कौरवांना पहातांच कदाचित् ते चवताळून येऊन दुर्योधनाचा वध करून सूड उगवतील अशी धृतराष्ट्रास भीति वाटली ! म्हणून प्रथमतः त्यानें या गोष्टीस अनुमोदन दिलें नाहीं. शकुनीमामास पांडवांचा स्वभाव अधिक चांगला ठाऊक होता; व तो त्याचा फायदा घेण्याचा नेहमीं उपदेश करी. धर्मराजा सत्य सोडणार नाहीं; तो प्रतिज्ञाभंग कधींहि करणार नाहीं. त्याचे बंधुहि सदोदित त्याचे आज्ञेत वागणारे आहेत. तेव्हां आपणांस भीति बाळगण्याचें कांहीं कारण नाहीं.' अशा प्रकारें मामांनीं समजूत घातल्यामुळें अखेरीस धृतराष्ट्रानें घोषयात्रेची परवानगी दिली. नंतर दुर्योधन आपलें सैन्य, बंधु व स्त्रिया या सर्वांना बरोबर घेऊन द्वैतवनांत आला. प्रथम घोषांत जाऊन त्यांनीं तेथील गाई, बैल, वासरें वगैरे पाहिलीं; व नंतर सर्वांनीं मृगया केली. शेवटीं पांडव त्या वनांतील ज्या सरोवराजवळ रहात होते, तेथें जाऊन जलक्रीडा करण्याचा दुर्योधनानें बेत केला; व आपले सेवक तिकडे पाठविले. तेथें त्यांचे आधींच चित्रसेन गंधर्व अप्सरांसह जलक्रीडा करीत होता; म्हणून इतर गंधर्वांनीं कौरवांच्या सेवकांना धिःकारून परत जावयास सांगितलें. दुर्योधनाचा असा अपमान झालेला पाहून कौरवांनीं गंधर्वांशीं युद्ध सुरू केलें. लढाईचे आरंभीं कौरवांनीं बराच पराक्रम केला; परंतु शेवटीं गंधर्वांनीं कर्णाचे घोडे, सारथी व रथ यांचा विध्वंस केल्यामुळें तो खालीं उतरून विकर्णाचे रथांत बसून पळून गेला. नंतर कांहीं वेळ दुर्योधन, दुःशासन इत्यादिकांनीं युद्ध चालविलें. परंतु शेवटीं चित्रसेनानें दुर्योधनादि कौरव पराभूत केले; आणि ते व त्यांच्या स्त्रिया यांस कैद करून त्या सर्वांना घेऊन जयघोष करीत तो जाऊं लागला ! इकडे त्या युद्धांतून जीव घेऊन पळून गेलेले कौरवांचे अमात्य युधिष्ठिरास शरण आले; आणि दुर्योधनाला व कौरवस्त्रियांना मुक्त करून कुरुकुलाची लाज राखा, अशी त्यांनीं विनंति केली. हें वृत्त ऐकून भीमसेन आनंदानें म्हणालाः—' आम्ही क्षत्रिय असूनहि आज येथें वनांत हातपाय जोडून माशा मारीत बसलों असतां, तिऱ्हाइतानें आमच्या

शत्रूस पराभूत करून आमची लाज राखली म्हणायची! जें काम करावयास आम्हांला मोठें सैन्य तयार करून युद्ध करावें लागलें असतें, तें आयतें परभारें तिसऱ्यानेंच केलें; ही चांगली गोष्ट झाली.' परंतु हें बोलणें अर्थात् धर्मास खपलें नाहीं. " **हे लोक आपणांसच शरण आले आहेत; तेव्हां त्यांचें रक्षण करणें हें आपणां क्षत्रियांचें कर्तव्य आहे. आपल्या ज्ञातीमध्यें किंवा कुलामध्यें कितीहि कलह होवो, त्यास जेव्हां कोणी बाहेरचा मनुष्य त्रास देईल किंवा अपमान करील, तेव्हां त्याचा प्रतिकार प्रत्येकानें केला पाहिजे.** कुरुकुलांतील स्त्रियांना गंधर्वांनीं कैद करून घेऊन जावें व आपण स्वस्थ बसावें हें आपल्या कुलास व आपल्या क्षत्रियत्वासहि लांछन आहे.

**ते शतं हि वयं पंच परस्पर-विवादने ।**
**परैस्तु विग्रहे प्राप्ते वयं पंचाधिकं शतम् ॥**

**आपसांत भांडण असेल तेव्हां ते शंभर व आपण पांच आहोंच. पण तिसऱ्याशीं तंटा असेल तेव्हां आपण एकशेंपांच झालें पाहिजे.** याप्रमाणें बोध करून दुर्योधनास सोडवून आणण्यासाठीं त्यानें भीमादिकांस पाठविलें. त्यांनीं चित्रसेनाबरोबर पुष्कळ वेळ युद्ध करून त्याच्या मायेसहि न जुमानतां आपलें शौर्य व आपला पराक्रम त्यास दाखविला. शेवटीं चित्रसेन स्वतः अर्जुनाकडे येऊन म्हणालाः—' तुम्ही वनवासांत असतां तुम्हाला आपलें वैभव दाखवून हिणविण्यासाठीं हा दुर्योधन इकडे आला होता; म्हणून त्याला पकडून आणण्यासाठीं इंद्रानेंच आम्हांस आज्ञा केल्यावरून, आम्ही त्याला कैद केलें.' यानंतर सर्व कैद्यांना घेऊन चित्रसेन धर्माकडे आला. धर्मराजानें तात्काळ सर्वांना बंधमुक्त केलें. चित्रसेन धर्मार्जुनांचा निरोप घेऊन निघून गेल्यावर धर्मराजा दुर्योधनास म्हणालाः—' दुर्योधना, असें साहस पुनः करूं नको. **साहसी पुरुषांना कधींहि सुख होत नाहीं;** तुझें व तुझ्या भावांचें कल्याण असो. तूं आनंदानें आपल्या घरीं जा; व झाल्या गोष्टीबद्दल किमपिहि विषाद मानूं नको.' हें ऐकून अतिशय लाज्जित झालेला दुर्योधन युधिष्ठिरास नमस्कार करून तेथून मुकाट्यानें चालता झाला. आपलें व आपल्या स्त्रियांचें वैभव दाखवून, वल्कलें नेसून वनांत दिवस कंठणाऱ्या

भीमार्जुनांस व द्रौपदीस हिणविण्यासाठीं जे आपण आलों, त्यांस उलट त्यांचे समोर कैदी म्हणून उभें रहावें लागलें व सुटकाहि त्यांचेमुळेंच झाली; आपल्या स्त्रियांसमक्ष आपल्यावर आलेला हा दुर्धर प्रसंग व झालेली ही फजिती दुर्योधनाचे मनास फारच बोचूं लागली. वाटेंत कर्णाची व त्याची गांठ पडली; तेव्हां दुर्योधन गंधर्वांचा पराजय करून येत आहे, असें वाटून कर्ण त्याचें अभिनंदन करूं लागला. परंतु गंधर्वांनीं आपला केलेला पराभव व त्याचे मनास त्याहूनही अधिक लज्जास्पद व दुःखदायक वाटणारी अशी पांडवांनीं केलेली सुटका, ह्या संबंधाची हकीकत त्यानें कर्णास सांगितली. पांडवांच्या हातून सुटका होण्यापेक्षां गंधर्वांबरोबरच्या युद्धांत आपणांस मरण आलें असतें तरी बरें झालें असतें, असें त्या मानी दुर्योधनास वाटलें. या एकंदर प्रकारामुळें दुर्योधनाचें मन इतकें उद्विग्न झालें कीं, त्यास जिवाचाहि कंटाळा आला. आपल्या मागें दुःशासनानें राज्यावर बसावें, असें सांगून तो ‘ प्रायोपवेशन ’ करून आत्महत्या करण्यास सिद्ध झाला ! दुःशासन, शकुनि वगैरे बरोबरचे लोक त्याची समजूत करूं लागले. ‘ तूं या सर्व पृथ्वीचा राजा आहेस. पांडव हे तुझ्या राज्यांतच रहाणारे तुझे प्रजाजन आहेत. तेव्हां त्यांनीं आपल्या राजाला—तुला-बंधमुक्त केलें या गोष्टीचें तुला दुःख वाटण्याचें कारण नाहीं. पांडवांनीं जें केलें तें त्यांचे, तुझे प्रजाजन या नात्यानें, कर्तव्यच होतें ’ इत्यादि प्रकारें कर्ण समजूत करूं लागला; पण व्यर्थ ! दुर्योधनानें आत्महत्या केल्यास आपल्या पक्षाची हानि होणार असें पाहून दानवांनीं अथर्ववेदक मंत्रांनीं एक कृत्या उत्पन्न केली आणि तिजकडून दुर्योधनास पाताळांत आणविलें. ‘ दुर्योधना तूं आपलें मन निराश होऊं देऊं नको. तुजसाठीं दानवांनीं भूलोकीं भगदत्त वगैरे राजांच्या रूपानें जन्म घेतले आहेत; ते तुजला साह्य करतील. कर्ण हा पूर्वजन्मी नरकासुर होता, तो निःसंशय अर्जुनाचा वध करील; व सर्व पांडवांचा वध होऊन तूं अक्षय्य राज्य संपादन करिशील. ’ इत्यादि बोलून दानवांनीं त्याचें मन वळविलें व पुनः त्या कृत्येकडून त्यास पहिल्या जागीं आणून ठेविलें. दुर्योधन स्वप्नांतून जागा झाल्यासारखा उठला, तेव्हां त्यास थोडी हुषारी वाटली. कर्ण अर्जुनाचा वध करील, वगैरे सर्व गोष्टी त्याला आतां शक्य वाटूं लागल्या व प्रायोपवेशन करण्याचें साहस सोडून देऊन तो हस्तिनापुरास परत आला.

यानंतर दुर्योधनासाठीं दिग्विजय करण्यास बरोबर सैन्य घेऊन कर्ण निघाला; आणि पृथ्वीवरील सर्व राजे जिंकून व पुष्कळ करभार घेऊन परत हस्तिनापुरास

आला. हा दिग्विजय झाल्यानंतर पांडवांप्रमाणें आपणहि राजसूय यज्ञ करावा असें दुर्योधनाचे मनात आलें. परंतु आपला पिता धृतराष्ट्र जिवंत असतां व भारतकुलांतील राजसूय यज्ञ केलेला पुरुष युधिष्ठिर जिवंत असतां आपणांस राजसूय यज्ञ करितां येत नाहीं, असें पुरोहिताचे सांगण्यावरून त्यास कळलें. तेव्हां राजसूय यज्ञाच्या तोडीचाच ' विष्णुयाग ' करण्याचा निश्चय करून त्यानें त्याची तयारी केली; व सर्वांना आमंत्रणें करण्यास दूतहि पाठविले. दुःशासनानें मुद्दाम सांगितल्यावरून एका दूतानें धर्मराजाकडे येऊन त्यासहि निमंत्रण केलें. ' तूं हा जो यज्ञ करीत आहेस तें कृत्य भारतकुलांतलि पुरुषांस अत्यंत उचित असेंच आहे; आम्हीहि यज्ञास मोठ्या आनंदानें आलों असतों; पण आम्हांला आपली प्रतिज्ञा मोडतां येत नाहीं ' असा सामोपचाराचा निरोप धर्मानें त्या दूताबरोबर दुर्योधनाकडे पाठविला. परंतु भीमाचा निरोप निराळाच होता ! ' ज्या यज्ञामध्यें शस्त्रास्त्रांपासून उत्पन्न झालेला अग्नि पेटविण्यांत येईल, त्या रणयज्ञाचे वेळीं मी धर्मासह खचित येईन, असें तुझ्या राजास जाऊन सांग जा. ' असें भीमानें अतिशय त्वेषानें दूतास उत्तर दिलें. असो; सर्व कौरवांच्या साह्यानें तो यज्ञ शेवटास गेला. पण पांडवांप्रमाणें राजसूय यज्ञ करावयाचा, ही गोष्ट दुर्योधनाचे मनांतून जाईना. तेव्हां कर्णानें त्यास प्रतिज्ञापूर्वक आश्वासन दिलें:—' मी पांडवांना रणामध्यें ठार मारीन व मग तूं राजसूय यज्ञ कर; त्यावेळीं मी तुला साह्य करीन याविषयीं तुला खात्री वाटत नसल्यास मी आज अशी प्रतिज्ञा करतों कीं, अर्जुनास ठार मारीपर्यंत मी आपले पाय दुसऱ्याकडून धुवविणार नाहीं मद्य, मांस वर्ज करीन; व मला कोणीहि जो जो पदार्थ मागेल; तो तो त्यास देईन, नाहीं म्हणणार नाहीं. ' इकडे ह्या सर्व गोष्टी घडेपर्यंत पांडव द्वैतवनांत एक वर्ष आठ महिने होते; नंतर ते काम्यकवनांत परत आले. ( वनपर्व अ० २३६--२५८ )

काम्यक वनांत येऊन राहिल्यानंतर पांडव व द्रौपदी यांजवर आणखी एक दोन संकटे यावयाचीं ती आलीच. दुर्वास नांवाच्या एका शिघ्रकोपी ऋषीस दुर्योधनानें महत्प्रयासानें प्रसन्न करून घेतलें होतें; व द्रौपदीचें जेवण झाल्यानंतर स्थालीं रिकामी पडल्यावर तुम्ही आपल्या सर्व शिष्यांसह पांडवांकडे भोजनाला जावें ' असा वर त्यानें त्यांचेकडून मिळविला होता. त्याप्रमाणें एके दिवशीं सर्व ब्राह्मण, पांडव वगैरेंचीं भोजनें होऊन द्रौपदीचेंहि जेवण झालें; आणि सूर्यानें दिलेली स्थाली रिकामीं पडली. इतक्यांत दुर्वास ऋषि आपल्या हजारों शिष्यांसह

अकस्मात् पांडवांकडे भोजनासाठीं आले. युधिष्ठिरानें त्यांना, नदीवर जाऊन स्नान व आन्हिक आटोपून येण्यास सांगितलें; त्याप्रमाणें ते नदीवर गेले. इकडे स्थाली रिकामी पडल्यानंतर ऋषि आलेले पाहून आतां आपलें सत्त्व जातें, असें वाटून द्रौपदीनें श्रीकृष्णाचें स्मरण केलें व भक्तवत्सल श्रीकृष्ण तात्काळ तेथें धांवून आले ! त्यांनीं द्रौपदीपासून रिकामी स्थाली घेतली; व तिचे गळ्याजवळ थोडा भाजीचा अंश राहिला होता तो त्यांनीं मोठ्या प्रेमानें खाल्ला; व तेवढ्यानें त्यांची भूक नाहींशीं झाली ! नदीवर जाऊन ऋषींना भोजनास बोलावून आणण्यास श्रीकृष्णानीं सहदेवास पाठविलें. इकडे दुर्वासाचे सर्व शिष्य स्नान वगैरे आटोपून वर येतात तों, आपली आकंठ भोजन केल्याप्रमाणें तृप्ति झाली असून आपणांस आतां जेवणाची मुळींच इच्छा नाहीं, असें त्यांना आढळून आलें; व तें त्यांनीं दुर्वासास कळविलें ! अन्नावांचूनच सर्व शिष्यांची तृप्ति झालेली पाहून दुर्वासास आश्चर्य वाटलें व धर्मराजा हा अंबरिषाप्रमाणेंच राजर्षि आहे, आपण त्याशीं विनाकारण कपटाचरण केलें; याबद्दल आपले तो काय करील कळत नाहीं; असें वाटून भीतीनें दुर्वास ऋषि आपल्या सर्व शिष्यांसह पळून गेले ! इकडे सहदेव नदीवर येऊन पहातों तों कोणीहि ऋषि नाहीं ! हें पाहून त्यास मोठा अचंबा वाटला. परंतु तेथील दुसऱ्या कांहीं ब्राह्मणांचे सांगण्यावरून दुर्वासाच्या पळून जाण्याचें कारण त्यास समजलें व परत येऊन त्यानें ही हकीकत पांडवादिकांस सांगितली.

पुढें एके दिवशीं द्रौपदीला तृणबिंदु ऋषीच्या आश्रमांत ठेवून पांडव मृगयेस गेले असतां, सिंधु देशाचा राजा जयद्रथ शाल्व देशाहून परत जात असतां त्या वनांत उतरला. आश्रमाच्या दारांत उभ्या असलेल्या द्रौपदीस पाहून जयद्रथाचे मनांत पापविचार आला. ती स्त्री कोण, कोणाची, येथें वनांत कां राहिली आहे, इत्यादि विचारपूस करण्यास त्यानें आपल्या बरोबरचा ‘ कोटिकास्य ’ नांवाचा राजपुत्र तिकडे पाठविला. त्यावेळीं द्रौपदी आश्रमाचे दाराजवळील एका कदंबवृक्षाची फांदी एका हातानें वांकवून धरून उभी होती. कोटिकास्यास पाहतांच फांदी सोडून देऊन तिनें झटकन् आपला पदर सावरला. कोटिकास्यानें तिच्या लावण्यादि गुणांची स्तुति करून, ती कोणाची कोण, वगैरे विचारपूस केली. आपण कोण व वनांत कां राहिलों आहों, तें सांगून ती म्हणाली:—पांडव मृगयेस गेले आहेत. तुम्ही व जयद्रथानें आज येथेंच मुक्काम करावा. तुम्हांला पाहून अतिथि-प्रिय युधिष्ठिरास फार संतोष होईल. ’ असे म्हणून ती त्यांचे आदरातिथ्याची तयारी करावयास पर्ण-

कुटिकेंत निघून गेली. आश्रमांतील स्त्री कोण आहे हें कोटिकास्यानें परत येऊन जयद्रथास सांगितल्यावर जयद्रथ स्वतः आश्रमामध्यें आला. आरंभीं क्षेमकुशलाचे प्रश्न झाल्यानंतर पाद्य व आसन देऊन, फराळास कांहीं देऊं का ? म्हणून मोठ्या मर्यादेनें द्रौपदीनें त्यास विचारिलें. परंतु त्या दुष्ट पुरुषास या आतिथ्याची किंमत काय ? ' पांडव राज्यभ्रष्ट होऊन वनांत राहिले आहेत. त्यांचेजवळ राहून तूं दुःखांत वां दिवस कंठीत आहेस ? तूं माझ्या रथावर बैस; आपण सिंधुदेशास जाऊं. तेथें गेल्यावर तुला दुःख म्हणून कसलें तें क्षणमात्रहि होणार नाहीं. ' इत्यादि बाष्कळपणाचें बोलणें तो बोलूं लागला. तेव्हां द्रौपदीनें ' मैवं ' ( हें काय बोलतां ? ) ' लज्जस्व ' ( कांहीं लाजलज्जा आहे कीं नाहीं ? ) इत्यादि बोलून त्याची निर्भर्त्सना केली; तरी जयद्रथानें आपलें निर्लज्जपणाचें बोलणें तसेंच चालविलें. सामोपचारानें द्रौपदी ऐकत नाहीं असें पाहून त्यानें तिला बलात्कारानें उचलून आपल्या रथावर घातलें; व तिला घेऊन तो त्वरेनें निघून जाऊं लागला. तिचा आक्रोश ऐकून धौम्य पुरोहित तेथें आले. आणि ' पांडवांचे अपरोक्ष द्रौपदीला असें चोरून नेणें हें खऱ्या क्षत्रियाचें काम नव्हें. पांडवांना युद्धांत जिंकून मग तिला नेणें शूरास योग्य आहे ' असें म्हणत धौम्य पुरोहित रथाचे मागोमाग धांवत निघाले.

पांडव मृगया करून परत येतात तों आश्रमाजवळ द्रौपदीची दासी रडत आहे, असें त्यांना आढळलें तिचे तोंडून सर्व हकीकत ऐकिल्यावर त्वरित रथ सज्ज करून सर्वजण जयद्रथाचे पाठोपाठ निघाले. कांहीं अंतरावर त्याची गांठ पडतांच लागलीच त्यांनीं युद्ध सुरूं केलें. भीमानें पहिल्या सपाट्यासरसें कोटिकास्याचें शिर उडवितांच जयद्रथाचें सैन्य पराभूत होऊन पळत सुटलें. तेव्हां, आतां आपला निभाव लागत नाहीं, असें पाहून जयद्रथानें द्रौपदीला रथांतून खालीं सोडून पलायनास प्रारंभ केला ! नंतर अर्जुन व भीम दोघेच जयद्रथाचे पाठीमागें त्वेषानें निघाले; तेव्हां ' जयद्रथ हा जरी दुष्ट आहे तरी दुःशला व गांधारी यांचेसाठीं, आपण त्याचा वध करणें उचित नाहीं ' असें धर्मानें त्यांना बजाविलें. अर्जुन व भीम याशिवाय इतर सर्व मंडळी परत आश्रमास आली. अर्जुनाचे रथापासून जयद्रथ एक कोस लांब होता तरी अर्जुनानें आपल्या अस्त्रप्रभावानें त्याच्या रथाचे घोडे ठार केले. तेव्हां रथावरून खालीं उडी टाकून जयद्रथ पायींच पळूं लागला. परंतु भीमानें त्यास

गांठलें; व त्याचे केश धरून ओढून त्यास खालीं पाडलें; आणि उठूं लागतांच त्यास लत्ताप्रहार करून ' दासोऽस्मि ' ( मी तुमचा दास आहे ) असें म्हणशील तर तुला जीवदान देतों, असें धिक्कारानें म्हटलें ! जयद्रथानें दीन होऊन दासोऽस्मि ' म्हटलें. भीमानें आपल्या अर्धचंद्र बाणानें त्याचे डोकीवर पांच पाट काढिल्यानंतर अर्जुनानें त्यास आपल्या रथावर बांधून घालून युधिष्ठिराकडे, आणिलें. ' हा पापी जयद्रथ आजपासून पांडवांचा दास झाला आहे ' असें भीमानें आनंदानें द्रौपदीस सांगितलें. परंतु त्यास दास्यांतून मुक्त करून युधिष्ठिर म्हणालाः—' तूं अदास आहेस; आतां आपल्या देशीं परत जा. असें साहस पुन्हा करूं नको. ' या एकंदर प्रकाराबद्दल जयद्रथास अत्यंत वाईट वाटून पांडवांचा सूड कसा उगवावा या विचारास तो लागला. आपल्या सिंधुदेशास परत न येतां गंगाद्वारी जाऊन व घोर तप करून त्यानें शंकरास प्रसन्न केलें; व ' मी एकदां तरी पांडवांना जिंकावें ' असा त्यानें वर मागितला. तेव्हां, ' अर्जुन दुसरीकडे असतांना एक दिवस तूं बाकीच्या चारी पांडवांना पराभूत करशील ' असा त्यास शंकरानीं वर दिला; व जयद्रथ सिंधुदेशास परत आला. ( वनपर्व अ० २५९–२७२ ) पुढें एके दिवशीं, वनवासांतील दुःखें व हालअपेष्टा सोसूनहि जी पतीबरोबर आनंदानें वनांत रहात आहे, त्या द्रौपदीसारखी दुसरी साध्वी स्त्री कोणी जगांत झाली नसेल, असें बोलणें धर्मराजानें काढलें. त्यावेळीं मार्कंडेय ऋषींनीं त्यांना सावित्रीची कथा सांगितली. ( वनपर्व अ० २७३–२९९ )

अर्जुनास दिव्य अस्त्रें देऊन इंद्रानें पांडवांवर एक मोठाच उपकार केला होता; आतां त्यांना शत्रूची भीति उरली नव्हती. पण कर्णाला जन्मापासूनच कवच–कुंडलें होतीं; तीं जोंपर्यंत त्याजजवळ आहेत तोंपर्यंत त्याचे शरीरावर बाणांचा कांहीं एक परिणाम व्हावयाचा नाहीं, हें त्यांस ठाऊक होतें. तीं तेवढीं कवचकुंडलें कर्णापासून घेतलीं म्हणजे पांडवांचें बहुतेक काम होईल, असें वाटून हरप्रयत्नानें तीं त्याजपासून काढून घेण्याचा इंद्रानें निश्चय केला.

कर्णाची जन्मकथा अशी होती कीं, कुंतिभोजाचे येथें कुंती असतां तिनें एका ऋषीची सेवा करून त्यांजपासून मंत्र मिळविले होते. त्यांचा प्रभाव असा होता कीं, त्यांपैकी एक मंत्र जपून कोणत्याहि देवास बोलाविलें असतां, तो येऊन प्रत्यक्ष दर्शन देई ! ' ऋषीनें दिलेले हे मंत्र खरे आहेत कीं नाहींत हें

पाहण्याची कुंतीला. पोरवय असल्यामुळें, इच्छा उत्पन्न झाली; व तिनें एक मंत्र जपून सूर्यास बोलाविलें. तात्काळ सूर्यदेव तिजपुढें उभा राहिला. 'मंत्र खरा आहे कीं नाहीं हें पाहण्यासाठीं मी तुला बोलाविलें, तूं आतां परत जा.' असें ती त्यास म्हणाली. परंतु 'देवांना विनाकारण केव्हांहि बोलावूं नये; मला जर तूं आतां असाच परत पाठविशील तर मी तुला शाप देईन. कुंती, तूं मला वश हो; मजपासून तुला माझ्याप्रमाणेंच अत्यंत तेजस्वी व जन्मापासून अमृतमय कवचकुंडलें धारण करणारा पुत्र होईल' असें सूर्य म्हणाला. तेव्हां कुंती अतिशय भिऊन गेली. असल्या कृत्यामुळें आपलें कौमार्य नष्ट होईल, या भीतीनें ती त्याचें म्हणण्यास मान्य होईना. परंतु सूर्यानें तिला आपल्या तेजानें मोहित करून शय्येवर मूर्च्छित करून ठेविलें व तिचें कौमार्य नष्ट न करितां योगबलानें तिचे शरीरांत प्रवेश करून त्यानें गर्भ ठेविला. कौमार्यामध्यें राहिलेला हा गर्भ तिनें नऊ महिने अगदीं गुप्त ठेविला; व प्रसूत झाल्यावर त्या तेजस्वी मुलास आपल्या दाईकडून एका पेटींत घालून ती चांगली बंद करविली; आणि तिचेकडून कोणास न कळत अश्वनदीमध्यें नेऊन टाकविली. ती पेटी वहात वहात त्या नदींतून चर्मण्वती नदींत, तेथून यमुनेंत व यमुनेंतून गंगेंत वहात चालली; व शेवटीं ती गंगेच्या कांठच्या चंपानगराजवळ तीरास लागली. त्यावेळीं गंगेवर स्नान करण्यासाठीं, धृतराष्ट्राचा आधिरथ नांवाचा एक सारथी परम स्नेही होता, तो आपल्या भार्येसह आला होता. त्यांनीं ती पेटी वर आणून उघडली. राधेला मूल नसल्यामुळें, देवानें आपणासच हा मुलगा पाठविला, असें वाटून तिला अतिशय आनंद झाला. त्यास घरीं आणून त्यांनीं त्याचें पालनपोषण उत्तम रीतीनें केलें. आपला पुत्र आधिरथ सारथ्याचे येथें सुखरूप असल्याचें ऐकून कुंतीसहि संतोष झाला. त्याचें नांव 'वसुषेण' असें ठेवण्यांत आलें, त्याला वृष असेंहि म्हणत असत. तो मोठा झाल्यावर आधिरथानें त्यास द्रोणाचार्याकडे पाठवून अस्त्रविद्या शिकविली. तेथेंच त्याचा सहाध्यायी दुर्योधन याशीं त्याचें सख्य होऊन पांडवांशीं व विशेषतः अर्जुनाशीं वैर पडलें.

कर्णाचें अंगीं वरील प्रकारचें सूर्यदत्त कवच असल्यामुळें तो युद्धांत केव्हांहि मरण पावणार नाहीं, अशी पांडवांस फार भीति होती. ती नाहींशी करण्यासाठीं इंद्र कर्णाकडे येऊन ती कवचकुंडलें घेणार आहे, हें वर्तमान सूर्यास कळलें. तेव्हां तो ब्राह्मणाचें रूप घेऊन कर्णाकडे आला व त्यास म्हणाला:—'कर्णा, जो



ती पेटी वर आणून त्यांनीं उघडली.

[ पृ. १००

कोणी जें कांहीं मागेल तें त्यास दिल्याशिवाय रहावयाचें नाहीं, या तुझ्या व्रताचा फायदा घेऊन इंद्र तुझीं कवचकुंडलें मागावयास येणार आहे. तेव्हां पांडवांचा पराभव करण्याची–किंबहुना स्वतः जिवंत राहण्याची–जर तुझी इच्छा असेल तर तूं त्याला दुसऱ्या हव्या त्या वस्तू दे, पण कवचकुंडलें देऊं नको ' इत्यादि प्रकारें सूर्यानें त्याच्या हिताच्या गोष्टी सांगितल्या. पण त्यावर कर्णानें उत्तर केलें:–'पांडवांचे हातून येणाऱ्या **मरणाची मला मोठीशी पर्वा वाटत नाहीं. पण मी आपलें व्रत–आपली प्रतिज्ञा–मोडल्यास जी अपकीर्ति होईल तिचें मला मृत्युहून जास्त भय वाटतें.** तर तुम्ही मला माझा नियम मोडण्याविषयीं आग्रह करूं नका. ' ब्राह्मणानें पुन्हां पुष्कळ बोधकरून पाहिला. परंतु त्याचा जेव्हां कांहीं उपयोग होत नाहीं असें त्यानें पाहिलें. तेव्हां इंद्राला कवचकुंडलें देतांना त्याजपासून उलट एका शत्रूला निःसंशय ठार मारणारी अमोघ शक्ति तरी मागून घे, असें त्यानें कर्णास सुचविलें; व तो ब्राह्मण निघून गेला. पुढें कांहीं दिवसांनीं इंद्रानें कर्णाकडे ब्राह्मणाचें रूपानें येऊन कवचकुंडलें मागितलीं. तीं कर्णानें देण्याचें कबूल केलें; परंतु तीं कवचकुंडलें आंगचीच असल्यामुळें तीं द्यावयाचीं म्हणजे शरीराचें कातडें काढून दिलीं पाहिजे होतीं. तेव्हां अशा रीतीनें तीं काढून दिलीं असतां शरीर हिडिस दिसेल, तर तें तसें दिसूं नये व एका शत्रूचा खात्रीनें वध करणारी अमोघ शक्ति आपणांस द्यावी, हे दोन वर त्यानें इंद्रापासून मागून घेतले. तेव्हां त्यास ती शक्ति देऊन इंद्र म्हणालाः—' ही अमोघ शक्ति तूं ज्यावर सोडशील तो एक योद्धा खात्रीनें ठार होईल; व नंतर ती शक्ति मजकडे परत येईल. ' ही शक्ति मिळाल्यावर कर्णानेंहि आपल्या आंगचें कवच व कानाजवळचीं कुंडलें शस्त्रानें कापून काढून इंद्रास दिलीं ! इंद्रहि कृतकृत्य होऊन स्वर्गास निघून गेला. ( वनपर्व अ० ३००--३१० )

वनामध्यें राहून पांडव अनेक प्रकारच्या विपत्ति व संकटें अनुभवीत असतां वनवासाचीं बारा वर्षें भरत आलीं. बारावें वर्ष संपण्यास थोडे दिवस उरले असतां पांडव पुन्हा काम्यक वन सोडून द्वैतवनांत गेले. नंतर कांहीं दिवसांनीं एक तपस्वी ब्राह्मण पांडवांकडे येऊन म्हणूं लागलाः—' अग्नि उत्पन्न करण्याचा मंथा व अरणी हीं मीं एका झाडाला अडकवून ठेविलीं होतीं. तों एक मृग आपलीं शिंगें त्या झाडास घांशीत असतां तीं दोन्हीं त्याचे शिंगांत अडकलीं, व त्यांसह तो वनांत पळून गेला. यामुळें माझ्या अग्निहोत्राचें काम बंद पडलें

आहे. तर कृपा करून तुम्ही वनांत जाऊन त्या मृगाला मारून माझी मंथा व अरणी हीं मल परत आणून द्या.' हें ऐकून सर्व पांडव धनुष्यें सज्ज करून वनांत गेले. त्यांनीं वनांत अनेक ठिकाणीं शोध केला; पण अरणी व मंथा शिंगामध्यें अडकलेला असा मृग त्यांना कोठेंच आढळला नाहीं. शेवटीं श्रमानें व तहानेनें व्याकूळ होऊन ते एका वडाचे झाडाखालीं बसले. नकुलानें झाडावर चढून पाहिलें तों त्यास दूर अंतरावर एके ठिकाणीं पाणी दिसलें. 'खालीं उतरून तिकडे जा; व पाणी पिऊन आम्हांसाठीं बाणांच्या भात्यांतून तें घेऊन ये' असें सांगून धर्मानें नकुलास तिकडे पाठविलें. नकुल तिकडे गेल्यावर त्यास एक स्वच्छ व सुंदर सरोवर दिसलें. तेथील पाणी पिण्यासाठीं तो जाऊं लागला तों 'अरे, असें साहस करूं नको; या सरोवरावर माझी सत्ता आहे. माझ्या प्रश्नांचीं समर्पक उत्तरें देऊन मग पाणी पी व तें घेऊन जा.' असे शब्द त्यास ऐकूं आले. परंतु तिकडे दुर्लक्ष करून तो तसाच पाणी प्याला; तेव्हां तात्काळ तो तेथेंच मरून पडला! इकडे नकुलास येण्यास उशीर कां लागला, तें पहाण्यास व पाणी आणण्यास धर्मानें सहदेवास पाठविलें. त्याचीहि नकुलाप्रमाणेंच स्थिति होऊन तोहि मरून पडला! नंतर धर्मराजानें क्रमानें अर्जुन व भीम यांनाहि पाठविलें; त्यांचीहि तीच अवस्था झाली! आपण पाठविलेले आपले चारी भाऊ अझून येत नाहींत, असें पाहून धर्म त्या सरोवराजवळ आला. तों तेथें आपले चौघे भाऊ मरून पडलेले पाहून त्यास अतिशय दुःख व आश्चर्य वाटलें. त्यांचे शरीरावर शस्त्राचा वगैरे प्रहार मुळींच झालेला नव्हता; व तेथें कोणाचीं पावलेंहि उमटलेलीं नव्हतीं. तेव्हां त्यांच्या मरणाचें धर्माला मोठें गूढ पडलें. तहान अतिशय लागल्यामुळें तोहि पाणी पिण्यास गेला; तेव्हां त्याला तेथील एक बकपक्षी वरीलप्रमाणेंच बोलला. तेव्हां अतिशय तहान लागली होती तरी ती आवरून धर्मानें उत्तर केलें:— 'ज्यावर तुझी सत्ता आहे, तेथलि पाणी परवानगीशिवाय मी पीत नाहीं. यःकश्चित् पक्षी दिसत असून तूं माझ्या भावांना मारलेंस; यांवरून तूं खरोखर कोणी तरी दुसराच असावास. तर तूं कोण ते मला सांग; व तुझे काय प्रश्न आहेत ते मला विचार. मी त्यांचीं यथामति उत्तरें देईन.' हें ऐकून त्यानें तें बगळ्याचें रूप टाकून देऊन एका भयंकर यक्षाचें स्वरूप धारण केलें. आणि युधिष्ठिरास व्यवहार, नीति, धर्म, तत्त्वज्ञान इत्यादि विषयांसंबंधीं अनेक प्रश्न विचारले. त्यांचीं धर्मानें यथायोग्य उत्तरें दिलेलीं पाहून यक्षास फार संतोष

वाटला. हा भाग '**यक्षप्रश्न**' या नांवानें महाभारतांत प्रसिद्ध आहे. **धर्माचीं** उत्तरें ऐकून संतुष्ट होऊन 'या तुझ्या चार भावांपैकीं कोणास जिवंत करूं.' असें त्यानें **धर्मास** विचारलें असतां त्यानें **नकुलास** जिवंत करण्याविषयीं विनंति केली. तेव्हां यक्ष म्हणालाः—'तुम्हांपैकीं सर्वांत बलवान् जो **भीम** किंवा अत्यंत पराक्रमी जो **अर्जुन** या तुझ्या सख्या भावांपैकीं कोणा एकाला जिवंत करावयास सांगण्याचें टाकून, सावत्र भाऊ **नकुल** यास सजीव करण्यास तूं कां सांगत आहेस ?' तेव्हां **धर्मानें** उत्तर केलें:—'माझ्या पित्याला **कुंती** व **माद्री** या दोन बायका होत्या. त्या दोघींनाहि मी सारख्याच मानीत आलों आहे. **कुंतीचा** मी एक पुत्र जिवंत आहे; तेव्हां आतां **माद्रीचाहि** एक पुत्र जिवंत असावा, म्हणून मी **नकुलासच** जिवंत करण्याची तुम्हांस विनंति केली आहे!' **धर्माची** ही समबुद्धि पाहून विशेष प्रसन्न होऊन यक्षानें त्या चौघांनाहि जिवंत करून उठविलें! आपण यक्ष नसून साक्षात् **यमधर्मच** आहों असें जेव्हां त्यानें **पांडवांस** कळविलें, तेव्हां **धर्मानें** त्यास पुढील तीन वर मागितले. तो म्हणालाः—'त्या बिचाऱ्या ब्राह्मणाची मंथा व अरणी परत मिळावी; अज्ञातवासाच्या वर्षांत आम्हांस कोणी ओळखूं नये; आणि लोभ, मोह व क्रोध यांना जिंकण्याचें मला सामर्थ्य येऊन दान, तप व सत्य यांचे ठिकाणीं माझें मन रमावें.' ब्राह्मणाची अरणी व मंथा हीं **यमधर्मानेंच** मृगाचें रूप घेऊन नेलीं होतीं, तीं **धर्मास** परत देऊन त्यानें दुसरेहि वर त्यास दिले. अज्ञातवासाचें वर्ष **विराटराजाचे** नगरांत राहून काढा, असें त्यांना सांगून **यमधर्म** गुप्त झाला. **पांडवाहि** आनंदित होऊन आश्रमांत परत आले. मनुष्याचे अंगीं चातुर्य व विद्वत्ता हे गुण असले तरी **संकटांतून पार पडून यश येण्यास अढळ मनो-निग्रह व दृढ न्यायबुद्धि यांची आवश्यकता आहे** हा बोध ह्या यक्ष-कथेवरून घेण्यासारखा आहे. ( वनपर्व अ० ३११–३१५ ).

---

# प्रकरण ५ वें.



## अज्ञातवास.




गील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें अनेक हालअपेष्टांत व कष्टांत पांडवांच्या वनवासाचीं बारा वर्षें संपलीं. उरलेलें अज्ञातवासाचें तेरावें वर्ष मत्स्य देशांत विराट राजाचे राजधानींत घालविण्याचें ठरवून तेथें प्रत्येकानें कोणत्या वेषानें रहावें व कोणतें काम करावें, याचाहि पांडवांनीं आपसांत निश्चय करून ठेविला. त्यांनीं आपले रथ व इंद्रसेन वगैरे सारथी यांना द्वारकेस पाठविलें; बरोबरची आचारी मंडळी व धौम्य पुरोहित यांना अग्नीसह द्रुपदाकडे, आणि चाकरनोकर व द्रौपदीच्या दासी यांना पांचाल देशांत पाठवून दिलें. आपण कोठें जाणार हें त्यांनीं धौम्य गुरुवांचून इतर कोणासहि कळविलें नाहीं. बरोबरचीं सर्व माणसें याप्रमाणें चोहोंकडे पाठवून दिल्यावर आपण विराटाचे शिकारी लोक आहों, अशा बहाण्यानें द्रौपदीसह पांडव पायींच प्रवास करूं लागले. दशार्ण देशाच्या उत्तर बाजूनें व पांचाल देशाच्या दक्षिण बाजूनें वाट चालत अनेक पर्वत, नद्या व वनें ओलांडून ते विराट नगराजवळ येऊन पोंचले. बरोबरचीं शस्त्रें, धनुष्यबाण वगैरे नगरांत नेल्यास लोक कदाचित् आपणांस ओळखतील असें वाटून, तीं नगराबाहेरच कोठें तरी सुरक्षित जागीं लपवून ठेवण्याचें त्यांनीं ठरविलें, त्याप्रमाणें त्यांनीं आपापलीं शस्त्रें, कवचें, धनुष्यें, बाण व त्यांचे भाते वगैरे सर्व एके ठिकाणीं बांधून, नगराबाहेरच्या स्मशानाजवळील एका मोठ्या शमीवृक्षाच्या ढोलींत ठेविलीं; व तेथें कोणीं येऊं नये- म्हणून एक प्रेत त्या झाडाचे फांदीस टांगून ठेविलें. गुप्तपणा रहाण्यासाठीं आपल्याकडून होईल तितकी व्यवस्था केल्यावर पांडव विराटाचे नगरांत गेले. ब्राह्मणाचा वेष घेऊन प्रथमतः युधिष्ठिर विराटाकडे गेला व त्यास म्हणाला:—' मी युधिष्ठिराचा मित्र आहे; माझें नांव ' कंक ' असून द्यूतविद्या मला उत्तम अवगत आहे. शिवाय मला तुम्ही सभासद कराल तर राज्यकारभारासंबंधानें हरएक प्रकारची सल्लामसलतहि मी तुम्हांस देईन. ' विराटानें त्याचा सत्कार करून त्यास आपला मंत्री नेमिलें.

नंतर भीमाहि बल्लवा-(•आचाऱ्या ) चे वेषानें त्याचकडे येऊन म्हणालाः— ' मी सूपकर्मांत ( स्वयंपाकाचे कामांत ) कुशल आहे. शिवाय रानटी हत्ती, माजलेले बैल यांजबरोबर व प्रसंगीं मल्लांशींहि मी कुस्ती करीन. मला आपल्या पदरीं ठेवावें.' भीमाचें धिप्पाड शरीर व प्रचंड बल पाहून,हा आचाऱ्याचे कामापेक्षां युद्धाचेच कामास अधिक योग्य आहे, असें विराटास वाटलें. तथापि त्यास त्यानें आपल्या महानसा-( मुदपाकखान्या -) वर मुख्य नेमिलें. द्रौपदीनें सैरंध्रीचे वेषानें विराटाची भार्या सुदेष्णा इजकडे जाऊन तिची दासी होऊन रहाण्या-विषयींची आपली इच्छा तिला कळविली. तेव्हां तिचें सौंदर्य पाहून सुदेष्णाला फारच अचंबा वाटला. ही कोणी तरी देवांगना, राक्षसी किंवा गंधर्व स्त्री असावी, असे ती म्हणूं लागली. तेव्हां द्रौपदीनें उत्तर केलें:—' मी राक्षसी वगैरे कोणी नसून सैरंध्रीच आहे. मीं केशकर्मांमध्ये ( वेणीफणी इ० कामांत ) व निर-निराळ्या फुलांच्या उत्तम उत्तम माळा व हार गुंफण्यांत कुशल आहे. मी पूर्वी श्रीकृष्णाची स्त्री सत्यभामा व पांडवांची भार्या द्रौपदी यांचे आश्रयास होतें.' सैरंध्रीला आपल्याजवळ ठेविल्यास कदाचित् तिला पाहून राजाचें मन तिजवर बसण्याचा संभव आहे, असें सुदेष्णा अर्धवट म्हणाली. तेव्हां सैरं-ध्रीनें उत्तर केलें—' पांच गंधर्व माझे पति आहेत. हे नेहमीं गुप्तरूपानें माझें संर-क्षण करीत असतात; तेव्हां माझा कोणी उपमर्द करतील तर ते त्यांचा तात्काळ वध करितील. माझेविषयीं तुम्ही भीति बाळगण्याचें कारण नाहीं.' हें ऐकून विशेष शंका न काढतां राणीनें सैरंध्रीस आपलेपाशीं ठेविलें. अर्जुनानें स्त्रीवेषानें येऊन ' मी बृहन्नला आहे; मला गीत, नृत्य, वाद्य वगैरे कला पूर्णपणें अवगत आहेत, ' असें सांगितल्यावरून, राजानें त्यासहि नगरांतील स्त्रिया, राजस्त्रिया व विशेषतः आपली लहान कन्या उत्तरा इजला या कला शिकविण्यास ठेविलें. नकुल व सहदेव यांनींहि येऊन आपली नांवें ' ग्रंथिक ' व ' तंतिपाल ' असल्याचें व आपणांस अनुक्रमें अश्वविद्या व गोविद्या येत असल्याचें कळविलें. तेव्हां विराटानें सहदेवास गोपालांचा व नकुलास पागेवरील मुख्य अधिकारी नेमिलें. याप्रमाणें विराटाचे राजवाड्यांत आपापली कामें करीत पांडव गुप्तपणें राहूं लागले. ते तेथें राहिल्यानंतर चार महिन्यांनीं त्या नगरामध्यें ब्रह्मदेवाचा एक मोठा उत्सव झाला. त्यावेळीं तेथें मोठमोठे प्रख्यात मल्ल आले होते. त्यांपैकीं ' जीमूत ' नांवाच्या एका प्रसिद्ध मल्लास भीमानें कुस्तींत ठार केलें ( विराटपर्व अ० १-१३)

लहानपणापासून राजविलास व राज्यवैभव भोगण्याची ज्यांना संवय होती ते पांडव व द्रौपदी विराटाचे राजवाड्यांत याप्रमाणें केवळ चाकरांचीं कामें करीत असतां दहा महिने लोटले व अज्ञातवासाचे फक्त दोनच महिने उरले. तरी त्या दोन महिन्यांतहि त्यांचेवर एक मोठें संकट आलें. राणी सुदेष्णा हिचा कीचक नांवाचा एक पराक्रमी व शूर असा मानलेला भाऊ असून तो विराटाचा सेनापतिहि होता. त्यानें एकदां सहज राजवाड्यांत द्रौपदीस पाहिलें. तिचें तें सुस्वरूप व तिच्या शरीराचा सुगंध पाहून कीचक अगदीं वेडावून गेला; आणि ‘ तूं अशी सुंदर असून येथें दासीचें काम करीत आहेस हें योग्य नाहीं. मी शूर व बलाढ्य आहे. विराट हा फक्त नामधारी राजा असून या मत्स्य देशावर वास्तविक सत्ता माझीच आहे तूं माझी भार्या होऊन मजबरोबर ऐश्वर्य व सुख यांचा उपभोग घे ! ’ अशीं निर्लज्जपणाचीं भाषणें तो तिच्याशीं बोलूं लागला. ‘ मी परस्त्री आहे; मजशीं असलें भाषण करूं नका. माझे पांच गंधर्व पति गुप्तपणानें माझें संरक्षण करीत असतात. तुम्ही जर मजशीं असलें भाषण किंवा दुसरें कांहीं अयोग्य वर्तन कराल, तर ते तुमचा निःसंशय वध करतील. ’ असें म्हणून द्रौपदी त्याचा प्रत्येक वेळीं निषेध करी. तरी त्यानें तिचा पिच्छा सोडला नाहीं. ती आपणांस प्राप्त व्हावी म्हणून कीचक आपली बहीण सुदेष्णा इजपाशीं रोज कटकट करूं लागला. शेवटीं मद्य आणण्याचे मिषानें द्रौपदीला कीचकाचे घरीं पाठविण्याचें तिनें कबूल केलें. कांहीं दिवस लोटल्यावर, कीचकाचे घरांतून मद्य आण जा, असें तिनें द्रौपदीस सांगितलें. ‘ कीचक कामांध झाला आहे; मी तेथें गेल्यास तो कदाचित् मजवर बलात्कारहि करील. कृपा करून मला तिकडे पाठवूं नका. तुमच्या दुसऱ्या दासींपैकीं कोणास तरी पाठवा ’ अशी ती सुदेष्णेची विनवणी करूं लागली. परंतु ‘ तो तुझ्याशीं अयोग्य वर्तन करणार नाहीं; मद्य घेऊन उलट पावलीं परत ये ’ असें म्हणून तिनें तिलाच जाण्याविषयीं आग्रह केला. तेव्हां निरुपाय होऊन ती कीचकाचे घरीं जाण्यास निघाली. आपल्या पातिव्रत्याचें संरक्षण करण्याविषयीं भक्तिपुरःसर सूर्याची प्रार्थना करून ती जाऊं लागली; तेव्हां, तिचें रक्षण करण्यासाठीं सूर्यानें एक राक्षस पाठविला, तो तिचे बरोबर गुप्तरूपानें फिरूं लागला. द्रौपदी आपले दाराजवळ आलेली पाहून कीचक मोठ्या आनंदानें उठून तिचें स्वागत करूं लागला. परंतु तिकडे लक्ष न देतां तिनें आपल्या यजमानणीचा निरोप कळवून मद्य देण्यास सांगितलें. तेव्हां, ‘ दुसरी दासी मद्य घेऊन जाईल; तूं इकडे ये आणि मला वश होऊन माझी व या राज्याची मालकीण हो ’ असें

म्हणून त्यानें तिचा डावा हात धरला, तेव्हां अतिशय आवेशानें व त्वेषानें द्रौपदीनें हिसडा दिला. त्यासरशीं कीचक धाडकन् जमिनीवर पडला ! द्रौपदी धांवत धांवत राजसभेकडे जाऊं लागली; व कीचकहि तिचे पाठोपाठ धांवत गेला आणि तिला भरसभेंत गांठून व तिचे केश धरून तिला खालीं ओढून त्या चांडाळानें तिला लाथ मारली ! तेव्हां तिजबरोबर गुप्त रूपानें असलेल्या राक्षसानें प्रहार करून त्यास भूमीवर मूर्च्छित पाडलें. आपल्या पत्नीला याप्रमाणें भरसभेंत लत्ताप्रहार करणाऱ्या कीचकास ठार मारण्याचे हेतूनें भीमसेन उठला; व कांहींतरी शस्त्र हवें म्हणून जवळच्या एका वृक्षाकडे पाहूं लागला. भीम जर वृक्ष उपटून आतां कीचकास ठार करील तर आपण ओळखले जाऊं, अशी धर्मराजास भीति वाटली म्हणून तो त्यास म्हणाला:—' बल्लवा, या वृक्षाकडे काय पहातोस ? तुला स्वयंपाकास सर्पण पाहिजे असेल तर, हा वृक्ष तोडूं नको; बाहेरील दुसरीं झाडें तोड. ' याप्रमाणें वडील भावाची इशारत मिळतांच मोठ्या कष्टानें आपला राग आवरून भीमसेन तेथून निघून गेला. विराटराजा व दुसरे सभासद यांचे समक्ष कीचकानें आपणांस लाथ मारली तरी विराट त्यास कांहींच शासन करीत नाहीं, असें पाहून ती मानी द्रौपदी राजाचीहि भरसभेंत निंदा करूं लागली. तिच्या फिर्यादीची दाद लावण्याची सल्ला देण्याऐवजीं सर्व सभासद तिचें तें रूप पाहून आश्चर्यचकित झाले; व ' ही ज्याची भार्या असेल तो मोठाच भाग्यवान् होय ' इ० बाष्कळ भाषणें बोलूं लागले. **कीचकासारख्या पराक्रमी पण दुष्ट पुरुषाच्या हातचें बाहुलें बनलेला राजा किंवा त्याचे मंत्री अन्यायाची व जुलमाची दाद कशी लावणार** ? आपल्या पत्नीच्या सौंदर्यासंबंधानें सभासदांनीं चालविलेलें हें भाषण धर्मास अर्थात् रुचलें नाहीं. तो द्रौपदीस उद्देशून म्हणाला:—' सैरंध्री, तूं आतां येथें उभी राहूं नको. मुकाट्यानें सुदेष्णेच्या महालांत जा. आपल्या **पतीकरितां वीरपत्नी पतिव्रता स्त्रिया संकटें सोसण्यास तयार असतात**, हें लक्षांत ठेव. तुझे गंधर्व पति या वेळीं तुझें रक्षण करण्यास आले नाहींत; यावरून क्रोधवश होऊन सूड उगविण्याची ही वेळ नव्हे, असें त्यांना वाटत असावेसें दिसतें. ज्यानें तुला लाथ मारली त्याचें पारिपत्य तुझे पति योग्य वेळीं करतील तूं येथें क्षणभरहि राहूं नको. ' यांवर द्रौपदी म्हणाली:—' माझे गंधर्व पति असावे त्याहून अधिक दयाळू असल्यामुळें व त्यांपैकीं वडील तर अतिशय द्यूतासक्त असल्यामुळें मला व त्यांना असा अपमान सहन करावा लागत आहे.' इतकेंच बोलून द्रौपदी तेथून निघून गेली.

दुष्ट कीचक जोंपर्यंत जिवंत आहे तोंपर्यंत तो आपला असाच सारखा छळ करणार, असें वाटून त्याचा वध करण्यास कोण समर्थ आहे याविषयीं द्रौपदी विचार करूं लागली. भीमसेनावांचून या संकटांतून आपणांस मुक्त करणारा दुसरा कोणी नाहीं, असें जाणून तिनें आपलें दुःख त्यास कळविण्याचा निश्चय केला. रात्रीं चोहोंकडे सामसूम झाल्यावर स्वयंपाकघरामध्यें भीमसेन घोरत गाढ निजला होता, तेथें ती आली. आणि दुःखातिशयामुळें भान न राहून, 'अहो उठा ! तुम्ही मेला आहां कीं जिवंत आहां ' असें म्हणत तिनें त्यास जागें केलें व आपलें मनोगत त्यास कळविलें. आणि " माझ्या पातिव्रत्यावर आग पाखडणारा नीच कीचक उद्यां जर जिवंत राहिला तर मी प्राण देईन. सार्वभौम राजाची मी पट्टराणी असूनहि वनांत होतें तेव्हां मला इतकें दुःख झालें नाहीं. पण आतां येथें सुदेष्णेची नोकरी करतां करतां माझी काय अवस्था झाली आहे ती पहा. " असें म्हणून तिनें, गंध उगाळून आपल्या कोमल हाताला पडलेले घट्टे त्यास दाखविले. कौरवांचें कपट, सभेंतील द्रौपदीचा छळ, वनांतील संकटें विराट नगरांतील दीनवाणी स्थिति व कीचकानें केलेला लत्ताप्रहार, या सर्व गोष्टी मनांत येऊन त्या उभयतांचेंहि दुःख अनावर झालें; व तीं उभयतां एकमेकांस आलिंगून बराच वेळ अश्रु ढाळीत बसलीं. नंतर दोघांचा विचार होऊन असें ठरलें कीं, कीचक पुन्हां तिजशीं लघळपणा करूं लागला म्हणजे तिनें त्याचे हेतूस कबूल झाल्यासारखें बाह्यात्कारीं दाखवावें; व त्यास रात्रीं अंधारांत नृत्यशाळेमध्यें येण्यास सांगावें. नृत्यशाळेमध्यें दिवसा राजकन्या नृत्य शिकत असत व रात्रीं ती अगदीं मोकळीच असे. या ठिकाणीं भीमसेनानें आधीं जाऊन लपून बसावें व कीचक येतांच त्यानें त्याचा समाचार घ्यावा, असें ठरलें. दुसरे दिवशीं सकाळींच कीचक द्रौपदीकडे येऊन म्हणाला:—' भरसभेमध्यें मीं तुला लत्ताप्रहार केला असतांहि तुझें रक्षण करण्यास कोणीहि आला नाहीं व विराटानेंहि माझें कांहीं पारिपत्य केलें नाहीं, हें तूं पाहिलेंसच. विराट नांवाचा राजा आहे; मत्स्य देशाचा वास्तविक राजा मीच आहे. मजपासून तुझें कोणीहि व कधींहि रक्षण करणार नाहीं; तूं मला मुकाट्यानें वश हो. ' हें ऐकून रात्रीं ठरलेल्या बेताप्रमाणें द्रौपदी त्यास म्हणाली:—' मी तुमच्या म्हणण्यास कबूल आहे; परंतु तुमची माझी होणारी भेट तुमच्या मित्रांना किंवा भावांनासुद्धां अगदीं कळतां उपयोगीं नाहीं. मला लोकापवादाची भीति वाटते. ही गोष्ट गुप्त ठेवण्याचें जर कबूल करीत असाल तर, तुम्ही त्या नृत्यशाळेमध्यें

आज रात्रीं काळोख पडल्यावर या; म्हणजे तेथें तुमचें मनोरथ पूर्ण होतील.' हें तिचें बोलणें ऐकून कीचकास अत्यानंद झाला. दिवस अस्तास कव्हां जातो व रात्र केव्हां पडते, असें त्यास होऊन गेलें! चोहोंकडे अंधार झाल्यावर भीमसेन द्रौपदीसह त्या नृत्यशाळेंत जाऊन बसला. संकेताप्रमाणें कीचकहि लवकरच तेथें आला व अंधारांत भीमसेनाजवळ जाऊन द्रौपदीस उद्देशून प्रेमाची भाषण बोलूं लागला! तेव्हां भीमसेनानें एकदम उडी मारून व त्याचे केश धरून त्यास खेंचलें. तेव्हां त्या मोकळ्या नृत्यशाळेमध्यें काळोखांत त्या दोघां वीरांचें बराच वेळ बाहुयुद्ध झालें. शेवटीं भीमानें कीचकास चीत करून त्यास अर्धमेला केला. नंतर तेथेंच थोडासा विस्तव पेटवून त्याची अवस्था द्रौपदीस दाखविली; व त्यास लत्ताप्रहार करून साध्वीच्या छळाचा पुरता सूड उगाविला. नंतर त्याचे डोकें, हात व पाय हीं उपसून काढून व तीं त्याचे पोटांत खुपसून त्याचा एक मांसाचा गोळा बनवून तेथेंच फेंकून दिला. नंतर तेथून आपले मागोमाग लवकर निघून यण्यास द्रौपदीला सांगून भीमसेन बाहेर पडला. द्रौपदीनें निघून जातांना नृत्यशाळेवर पहारा करणाऱ्या शिपायांना जागें केलें; व 'मजवर बलात्कार करणाऱ्या कीचकाला माझ्या गंधर्व पतींनीं ठार केलें आहे; तें पहा' असें ती त्यांना सांगूं लागली. तेव्हां दिवट्या घेऊन ते आंत येऊन पहातात तों कीचकाचें छिन्नविच्छिन्न व गोळा बनविलेलें शरीर त्यांना दिसलें! ही हकीकत त्यांनीं विराटास कळविली. कीचकाचे भाईबंदहि तेथें आले. जवळच खांबाला हातानें विळखा घालून उभी असलेली द्रौपदी त्यांचे दृष्टीस पडली; तेव्हां 'या स्त्रीमुळेंच कीचकाचा वध झाला, म्हणून हिला आधीं ठार करूं या; किंवा मेलेल्या माणसाचें प्रेम त्याचे मरणानंतरहि करावें असें म्हणतात, त्याप्रमाणें हिलाच कीचकाबरोबर जाळून टाकूं या' असें ते आपसांत बोलूं लागले. पुढें या अमानुष कृत्यास त्यांनीं विराटाचीहि संमति मिळविली व ते तिला कीचकाचे बरोबर बांधून स्मशानांत घेऊन जाऊं लागले!' तेव्हां 'हे दुष्ट कीचक मला स्मशानाकडे घेऊन जात आहेत; माझ्या गंधर्व पतींनीं माझें रक्षण करावें' असा तिनें सारखा आक्रोश मांडला. द्रौपदीचा हा विलाप ऐकून, कोणास कळूं नये यासाठीं भीमानें आपला वेष पालटला, व तो शहराचें तट गुप्तपणानें चढून बाहेर गेला; आणि त्यानें स्मशानाजवळचा एक वृक्ष उपटून व कीचकाच्या भावांवर चाल करून त्यांस झोडण्यास प्रारंभ केला! हातांत वृक्ष घेऊन हा द्रौपदीचा गंधर्व आला असें वाटून, द्रौपदीला तेथेंच टाकून ते पळत सुटले. परंतु भीमानें त्या सर्वांना गांठून झाडाच्या तडाक्यांनीं त्या सर्वांस ठार

केलें. याप्रमाणें कीचकाच्या एकशेंपांच भाऊबंदांना यमसदनीं पाठवून भीमसेन निराळ्याच वाटेनें नगरांत येऊन कोणास न कळत मुदपाकखान्यांत जाऊन निजला द्रौपदीहि दुसऱ्या वाटेनें शहरांत आली. आपला शूर सेनापति सर्व बांधवांसह द्रौपदीमुळें ठार झालेला पाहून विराटाचे मनांत भय उत्पन्न झालें. 'तुझ्यामुळें आमचा सर्वांचा नाश होईल. तूं आपली आमच्या राजवाड्यांत राहूं नको? ताबडतोब निघून जा ' असें विराटानें सुदेष्णेकडून द्रौपदीला कळविलें. तेव्हां 'राजानें आणखी फक्त तेरा दिवस मला राजवाड्यांत राहूं द्यावें; नंतर माझे पति मला घेऊन जातील. ते या उपकाराची फेड केल्यावांचून राहाणार नाहींत ' अशीं आर्जवाची भाषणें करून आणखी कांहीं दिवस राजवाड्यांत राहण्याबद्दल तिनें सुदेष्णेची परवानगी मिळविली. ( विराटपर्व अ० १४–२४ )

पांडवांच्या अज्ञातवासास प्रारंभ झाल्यापासून त्यांचा शोध लावून त्यांना पुन्हां बारा वर्षे वनवास करावयास लावण्यासाठीं दुर्योधनानें अनेक दूत चोहींकडे पाठविले होते. त्यांनीं सर्व देशांत पांडवांचा पुष्कळ शोध केला; तरी कोणासहि त्यांचा पत्ता लागला नाहीं. विराट राजाचा बलाढ्य व शूर सेनापति कीचक व त्याचे १०५ भाईबंद यांचा गंधर्वांनीं वध केल्याची बातमी मात्र दूतांनीं दुर्योधनास कळविली. या किचकानें त्रिगर्तदेशचा राजा सुशर्मा याचा अनेक वेळां युद्धांत पराभव केला होता; तेव्हां किचकाच्या वधाची ही संधि साधून त्रिगर्त व कौरव यांनीं एकत्र होऊन मत्स्य देशावर स्वारी करावी व तो प्रांत वांटून घ्यावा, अशी सुशर्म्यानें दुर्योधनास मसलत दिली. ती त्याला पसंत पडून मत्स्य देशावर दक्षिणेकडून सुशर्मानें व उत्तरेकडून कौरवांनीं एकदम स्वारी करावी असें ठरलें. त्याप्रमाणें दक्षिणेकडून सुशर्म्यानें विराटाच्या हजारों गाई बलात्कारानें हरण केल्या व त्यांना घेऊन परत जाऊं लागला. ही बातमी विराटास कळतांच त्यानेंहि युद्धाची तयारी करून व बरोबर अर्जुन खेरीज करून पांडवांना घेऊन त्रिगर्त–सैन्यावर चाल केली. इतर दोहों सैन्यांची गांठ तिसरे प्रहरीं पडून उभयपक्षांचें तुंबळ युद्ध सुरू झालें. रात्र होऊन अंधार पडल्यावर कांहीं वेळ युद्ध बंद राहिलें; पण मध्यरात्रीचे सुमारास चंद्रोदय होतांच युद्धास पुन्हां सुरवात झाली. सुशर्म्यानें विराटास गांठून त्याशीं मोठ्या पराक्रमानें युद्ध केलें. शेवटीं त्यानें विराटाचा रथ मोडून व त्यास पकडून आपल्या रथावर बांधून टाकिलें; व त्यास घेऊन तो निघाला ! विराट राजा त्रिगर्ताचे हातीं

सांपडलेला पाहून मत्स्यसेना पळ काढूं लागली. इतक्यांत युधिष्ठिराचे आज्ञेवरून भीम, नकुल, व सहदेव यांनीं सुशर्म्याचा पाठलाग केला. भीमसेनानें आपल्या गदेनें सर्व सैन्याचा विध्वंस केला, आणि सुशर्म्याचे रथाजवळ जाऊन व त्याचे केश धरून त्याला खालीं ओढले आणि त्यास बांधून धर्मराजाकडे आणलें. धर्मानें आपल्या नेहमींच्या स्वभावाप्रमाणें, ' तूं अदास आहेस, पुन्हां असें करूं नको ' येवढेंच सांगून त्यास सोडून दिलें. आज प्रत्यक्ष मृत्यूचे दाढेंतून पांडवांनीं आपणांस सोडविलेलें पाहून विराटराजाला फार आनंद झाला, आज माझें राज्य व माझे प्राण तुम्हींच मला परत दिले. याउप्पर माझ्या राज्याचे वास्तविक मालक तुम्हींच आहांत ' इत्यादि गौरवाचीं भाषणें बोलून, आणि त्यांना अमोलिक वस्त्रें व भूषणें देऊन विराटानें पांडवांचा कृतज्ञतापूर्वक सत्कार केला; आणि आपल्या या विजयाची बातमी नगरामध्यें दवंडी पिटवून नागरिकांना कळविण्यासाठीं पुढें दूत पाठविले. ( विराटपर्व अ० २५–३४ )

सुशर्मा आपल्या राजधानींतून निघाला त्याचे दुसरेच दिवशीं कौरवसैन्याहि हस्तिनापुरांतून बाहेर पडलें होतें. विराटराजा इकडे त्रिगर्तांशीं युद्ध करण्यांत गुंतला असतां, कौरवांनीं नगराच्या उत्तर बाजूस येऊन तिकडील खिल्लार-खान्यांतील विराटाच्या साठ हजार गाई हरण केल्या. गोपाध्यक्षानें नगरांत येऊन हें वर्तमान राजवाड्यांत कळविलें. राजपुत्र उत्तर त्यावेळीं अंतःपुरांत होता; तेथें त्यास ही बातमी सांगण्यांत आली. तेव्हां 'मी आतांच जाऊन कौरवांना जिंकतों व आपल्या गाई परत आणतों ! परंतु माझा रथ हाकणारा कोणी कुशल सारथी येथें नाहीं. एकादा सारथी तयार करा; म्हणजे सर्व कौरवांचा तर काय, पण प्रत्यक्ष अर्जुन असला तरीहि त्याचा पराजय करून आपले गोधन परत आणतों. ' याप्रमाणें बायकांमध्यें उत्तराची वडबड चालू झाली. इतक्यांत द्रौपदीनें असें सुचविलें कीं, ' बृहन्नलास सारथ्यकर्म चांगलें येतें; पूर्वी तो अर्जुनाचा सारथी होता. तो या प्रसंगीं कदाचित् तुमचा सारथी होईल. ' बायकांना नृत्य–गायन शिकविणाऱ्या बृहन्नलासारख्या क्लीबास सारथ्यकर्म तें काय येणार, असें उत्तरास वाटलें; व हें मत त्यानें तेथें बोलूनहि दाखविलें ! तथापि त्यानें आपली बहीण उत्तरा इजला त्यास बोलावून आणण्यास सांगितलें. तो आल्यावर बोलावण्याचें कारण राजपुत्रानें त्यास कळविलें. अर्जुनानें आरंभीं बरेच आढेवेढे घेऊन शेवटीं उत्तराचा सारथी होण्याचें कबूल केलें. अंगांत

कवचें वगैरे चढवून व शस्त्रास्त्रें बरोबर घेऊन दोघेहि रथांत बसले; इतक्यांत उत्तरा अर्जुनास म्हणाली:—कौरवांना जिंकून परत येतांना त्यांची उत्तम उत्तम उंची वस्त्रें हरण करून आणा, तीं बाहुल्या करण्यासाठीं मला पाहिजे आहेत!' 'उत्तरानें जर कौरवांचा पराभव केला, तर मी वस्त्रें आणीन' असें अर्जुनानें खोंचदार उत्तर दिलें व रथ चालू केला. नगराबाहेर बऱ्याच अंतरावर रथ आल्यानंतर कौरवसेनेंतील उंच उंच ध्वज दिसूं लागले. आपला व द्रौपदीचा अनन्वित छळ करणाऱ्या दुष्टांशीं रणामध्यें पहिली झुंज करण्याचा हा समय आलेला पाहून अर्जुनाचे बाहू स्फुरण पावून त्याचा शौर्यसागर उचंबळून येऊं लागला! पण भीष्म, द्रोण, कर्ण, अश्वत्थामा, दुर्योधन यांच्यासारख्या कसलेल्या धनुर्धरांशीं युद्ध करण्याचा प्रसंग आलेला पाहून उत्तराचें धैर्य अगदींच खचून तो गर्भगळीत झाला! 'माझा बाप दक्षिणेकडे सर्व सैन्य घेऊन गेला आहे, मी लहान असून एकटा आहे. कौरववीरांशीं मला एकट्याला युद्ध करावयाचें नाहीं. माझा रथ येथून नगरांत परत ने. कौरव माझ्या गाई नेवोत किंवा आमचें राज्य जावो. माझा प्राण वांचीव म्हणजे बृहन्नले, मी तुला पुष्कळ धनदौलत व संपत्ति बक्षीस देईन' अशी तो अर्जुनाची विनवणी करूं लागला. '**युद्धाकरतां एकदां उभें राहिल्यावर परत फिरणें हें क्षत्रियांचें ब्रीद नव्हे.** बायकांमध्यें आपल्या शौर्याची तूं फुशारकी मारली आहेस, आतां युद्ध न करतां असाच येथून परत फिरलास तर त्या तुला हांसतील, याचा विचार कर' वगैरे अनेक प्रकारें सांगून त्यास धीर देण्याचा अर्जुनानें प्रयत्न केला, पण व्यर्थ! अर्जुन नगराकडे रथ परत नेत नाहीं, असें पाहून उत्तर रथांतून उडी टाकून पायींच नगराकडे पळत सुटला! अर्जुनानेंहि लागलीच रथावरून खालीं उडी टाकून त्याचा पाठलाग करून त्यास शंभर पावलांचे आंतच पकडलें. 'मी तुला मोहरांच्या राशी, दासदासी, रथ, हत्ति काय मागशील तें बक्षीस देईन, पण यावेळीं तूं मला सोड' अशी तो अर्जुनाची पुनः पायधरणी करूं लागला. परंतु त्याचे बोलण्याकडे लक्ष न देतां अर्जुनानें त्यास उचलून आणून रथांत घातलें! 'तुला युद्ध करावयाचें नसेल तर माझें सारथ्य कर, मी युद्ध करीन, भिऊं नको.' असें सांगून अर्जुनानें रथ नगराबाहेरील स्मशानाकडे फिरविला. शमी वृक्षाजवळ येतांच अर्जुन उत्तरास म्हणाला:-तुझ्या रथांत असलेलीं धनुष्यें व शस्त्रें माझें सामर्थ्य सहन करण्याइतकीं बळकट नाहींत. या शमीचे झाडावर पांडवांचीं शस्त्रें व धनुष्यें आहेत, तीं वर चढून काढ. म्हणजे ती घेऊन मी युद्ध करीन.' उत्तरानें



त्यानं मोठ्या हर्षानं धनुष्याच्या टणत्कारानें दशादशा दणाणून साडल्या. [ पृ. ११३

धनुष्यें व शस्त्रें खालीं काढल्यावर ' पांडव कोठें आहेत ' असें त्यानें बृहन्नलेस विचारिलें. तेव्हां अर्जुनानें आपलें खरें नांव सांगून धर्म, भीम वगैरे कोणत्या वेषानें कोठें आहेत, हेंहि त्यास कळविलें. नंतर अर्जुनानें आपला स्त्रीवेष उतरून शुभ्र वस्त्रांचा पुरुषवेष धारण केला, आणि शुचिर्भूत होऊन व पूर्वदिशेकडे तोंड करून त्यानें आपल्या सर्व दिव्य अस्त्रांचें स्मरण केलें. १२॥ वर्षें हातांत वागविलेलें पण एक वर्षभर स्वस्थ पडून राहिलेलें गांडीव धनुष्य अर्जुनानें हातीं घेऊन सज्ज केलें; आणि मोठ्या हर्षानें व उत्साहानें त्याच्या टणत्कारानें दशदिशा दणाणून सोडल्या ! भक्तिपूर्वक शमी वृक्षास प्रदक्षिणा करून अर्जून रथांत बसला. उत्तरानें रथ चालू करतांच अर्जुनानें आपला देवदत्त शंख जोरानें फुंकिला. शंखाचा तो प्रचंड घोष, धनुष्याचा टणत्कार व रथाचा गंभीर ध्वनि हीं ऐकून हा अर्जुनच येत आहे, अशी कौरवांची खात्री झाली. अज्ञातवासाचें तेरावें वर्ष संपण्यापूर्वीच अर्जून प्रकट झाला, तेव्हां पांडवांनीं पुन्हां बारा वर्षें वनवास केला पाहिजे, अशा-बद्दल कौरवांमध्यें चर्चा सुरू झाली. भीष्म, द्रोण, कृप, अश्वत्थामा इत्यादिकांनीं पांडवांचा पक्ष घेतला, दुःशासन, कर्ण. इत्यादिकांनीं दुर्योधनाची बाजू उचलली. वादविवादाचे भरांत भीष्म, द्रोण, कृप, इ० वृद्ध व पूज्य वीरांना कर्ण फारच टाकून बोलूं लागला आणि हें भांडण विकोपास जाण्याचे बेतांत आलें ; परंतु द्रोण वगैरे समजुतदार पुरुषांनींच माघार घेऊन तें मिटविलें. पांडवांच्या अज्ञातवासानें तेरावें वर्ष भरून गेलें आहे, अशी भीष्मांनीं सर्वांची खात्री केली. नंतर एकचतुर्थांश सैन्य घेऊन दुर्योधनानें हस्तिनापुराकडे निघून जावें ; एक-चतुर्थांश सैन्यानें गाई घेऊन चालूं लागावें; व उरलेल्या निम्म्या सैन्यासह भीष्मादिकांनीं अर्जुनाशीं युद्ध करावें, अशी भीष्मांनीं मसलत सांगितली. तत्प्रमाणें एकचतुर्थांश सैन्य घेऊन दुर्योधन निघून जाऊं लागला; तोंच अर्जुनाचा रथ कौरवांचे सैन्यापासून बाणाचे टप्यावर येऊन धडकला. कौरव-सैन्यामध्यें जेव्हां दुर्योधनाचा ध्वज दिसेना, तेव्हां तो अधमाधम रणांतून पळून जात असावा, असें अर्जुनानें ताडलें; व ह्या सर्व सैन्यास बगल देऊन त्यानें दुर्यो-धनाचें मागोमाग आपला रथ वेगानें काढला. त्यास प्रतिबंध करण्यासाठीं कौरवयोद्धे व सैन्य हीं अर्जून व दुर्योधन यांचेमध्यें येऊं लागलीं. या गडबडींत विराटाच्या गाई बुजून तुफान होऊन पळून गेल्या. अर्जुनाची व कौरवसैन्याची गांठ पडतांच घनघोर युद्ध सुरू झालें. पहिल्याच सपाट्यास अर्जुनानें कर्णाचा भाऊ शत्रुतप यास ठार केलें. नंतर कर्णाचा रथ अर्जुनाचे रथाशीं

भिडला. उभय वीरांच्या त्या युद्धांत कर्ण जखमी झाल्यामुळें त्याच्या सारथ्यानें त्याचा रथ रणांतून दूर नेला. नंतर अर्जुनाचें कृपाचार्यांशीं युद्ध झालें. त्यांत त्यांचा निभाव लागेना म्हणून ते बाजूस निघून गेले. नंतर अर्जून व द्रोण या गुरु-शिष्यांचें युद्ध सुरू झालें. आपल्या वृद्ध गुरूस आधीं पूज्यभावपूर्वक प्रणाम करून, नंतर अर्जुनानें बाण सोडण्यास आरंभ केला. या पराक्रमी गुरु-शिष्यांचें युद्ध होऊन शेवटीं द्रोणाचार्यांचा बचाव करण्यासाठीं त्यांचा पुत्र अश्वत्थामा यास मध्यें पडून अर्जुनाशीं युद्ध करावें लागलें. यानंतर अश्वत्थामा, कर्ण, दुःशासन इत्यादि वीरांचा पराभव केल्यावर अर्जून व भीष्म यांचें युद्ध जुंपलें, दोघांनींहि आपल्या पराक्रमाची शर्थ केली. शेवटीं अर्जुनाचे बाणानें भीष्म रथांत बेशुद्ध पडले असतां सारथ्यानें तो रथ बाजूस काढून नेला. यापुढें दुर्योधन, विकर्ण यांशींहि अर्जुनाचें युद्ध झालें. अर्जून कोणत्याहि एकट्या वीरास आटपत नाहीं असें पाहून, सर्व कौरवांनीं त्याजवर एकदम रथ घातले. तेव्हां त्यानें संमोहनास्त्र सोडून सर्व कौरव योद्ध्यांस एकाएकीं रथांतल्या रथांतच बेशुद्ध झाल्याप्रमाणें मोहित करून सोडलें! नंतर रथाखालीं उतरून त्या सर्वांचीं उत्तरीय वस्त्रें ( उपरणीं ) हिरावून आणण्यास अर्जुनानें उत्तरास सांगितलें. तीं वस्त्रें घेऊन उत्तर रथांत बसल्यावर अर्जुनानें एक बाण सोडून दुर्योधनाचा राजमुकुट तोडून उडवून टाकिला; व पुढें होणाऱ्या राज्यनाशाचा ओनामा केला! याप्रमाणें विराटाच्या गाई सोडवून आणि कौरवांना आपल्या पराक्रमाचें व अस्त्रविद्येचें थोडेसें तेज दाखवून अर्जून परत फिरला. घडलेला सर्व प्रकार गुप्त राखण्याविषयीं उत्तरास बजावून त्यानें रथ पुनः स्मशानाजवळ आणला; आणि आपलें विजयी धनुष्य व शस्त्रें शमीच्या ढोलींत ठेवून अर्जुनानें पुनरपि स्त्रीवेष धारण केला. विजय मिळाल्याची बातमी नगरांत व राजवाड्यांत कळविण्यासाठीं आधीं एका दूतास पुढें पाठवून उत्तर व बृहन्नला हे दोघे नगराकडे येण्यास निघाले. ( विराटपर्व अ० ३५-६७ )

इकडे पांडवांच्याच शौर्यामुळें विजयी झालेला विराट राजा नगरांत आधींच परत आला होता. बृहन्नला सारथि बरोबर घेऊन उत्तर एकटाच कौरवांशीं युद्ध करावयास गेला आहे, असें समजतांच त्याला अतिशय भीति वाटली. ज्याचा सारथि षंढ आहे तो युद्धांतून जिवंत परत येईलसें वाटत नाहीं, असें म्हणून त्रिगर्तांच्या लढाईहून परत आलेल्या सैन्यास उत्तराचे मदतीस जाण्याचा

त्यानें हुकूम केला. ' ज्याचा सारथि बृहन्नला आहे, तो जिवंत परत येणार, येवढेंच नव्हे तर तो विजयीहि होणार ' असें धर्मानें विराटास सांगितलें. इतक्यांत कौरवांस पराभूत करून, विजयी होऊन व गाई घेऊन उत्तर परत निघाल्याचें वर्तमान दूतानें येऊन कळविलें. पुत्राचा हा पराक्रम ऐकून विराटास अत्यानंद झाला. त्यानें सर्व नगर शृंगारून, सैन्य व उत्तरा वगैरे कुमारिका त्याला सामोऱ्या पाठविल्या. विराटाचा हा आनंद चालू असतां, इकडे धर्मानें सारथि बृहन्नलेचीच स्तुति चालविली होती ! कंकाशीं द्यूत खेळत असतां पुनः विराटानें आपल्या पुत्राच्या शौर्याची फुशारकी चालविली; तेव्हां ' ज्याचा सारथि बृहन्नला आहे तो विजयी व्हावयाचाच ' असें धर्मानें उत्तर दिलें. तें ऐकून विराट इतका रागावला कीं, पांडवांनीं नुकताच केलेला उपकार विसरून तो कृतघ्नाप्रमाणें बोलूं लागला. तो म्हणालाः—' माझा उत्तर आणि बृहन्नला सारखेच समजतोस काय ? उत्तराची तारीफ करण्याचे ऐवजीं तू षंढाची सारखी स्तुति चालविली आहेस हें काय ? काय बोलावें आणि काय बोलूं नये हें तुला अगदींच कळत नाहीं. तुला तुझ्या जिवाची जर पर्वा असेल, तर पुनः असे शब्द उच्चारूं नको. ' त्रिगर्तांचे हातून पांडवांनींच आपणांस सोडविलें हें विसरून कृतघ्न विराटानें ही गोष्ट इतक्या विकोपास नेली, तरी द्रोण, भीष्म, कर्ण इत्यादि महापराक्रमी वीरासमोर युद्धांत टिकाव धरणारा बृहन्नलेशिवाय जगांत दुसरा कोणीहि नाहीं, असें प्रत्युत्तर करण्यास धर्मानें मागेंपुढें पाहिलें नाहीं ! तेव्हां विराटाचा क्रोध अनावर होऊन त्यानें त्याचे तोंडावर फांसा मारिला. त्यामुळें त्याचे नाकांतून रक्त वाहूं लागलें. तें भूमीवर पडूं नये यासाठीं धर्मानें तें ओंजळींत धरलें. द्रौपदी जवळच होती, तिनें एक भांडें आणून त्यांत तें गळणारें रक्त धरिलें. इतक्यांत बृहन्नलेसह उत्तर आल्याचें द्वारपाळानें राजास कळविलें. दोघांना आंत घेऊन येण्याची राजानें त्यास आज्ञा केली; परंतु धर्मानें द्वारपालास हळूच सुचविलें:—' विराटानें माझे शरीरांतून रक्त काढलें आहे. युद्धावांचून इतर वेळीं जो कोणी मला जखम करील किंवा माझे अंगांतून रक्त काढील त्याचा तात्काळ वध करावयाचा, अशी बृहन्नलेची प्रतिज्ञा आहे; म्हणून त्यास आतांच आंत आणूं नको. ' धर्माचे या सुचनेप्रमाणें द्वारपालानें एकट्या उत्तरासच आंत पाठविलें. उत्तरानें कंकाची ती स्थिती पाहून असें कोणी केलें म्हणून विचारलें. तेव्हां विराटानें सर्व हकीकत सांगितली. आपल्या बापास थोडासा दोष देऊन उत्तर म्हणाला:—"कौरवांचा पराभव

झाला म्हणून तुम्ही माझें अभिनंदन करूं नका. त्यांना मीं जिंकिलें नाहीं व गाईहि मीं सोडविल्या नाहींत. मी भयानें रणांतून पळून जात होतों. इतक्यांत एका देवपुत्रानें येऊन मला धीर दिला आणि त्यानेंच कौरवांना जिंकिलें व गाई सोडवून आणून मला विजयी केलें. या विजयाचें सर्व श्रेय त्याजकडे आहे. हें महत्कृत्य करून तो अंतर्धान पावला; परंतु तो उद्यां किंवा परवां पुन्हां प्रकट होईल.” असें विराटास सांगून उत्तरानें ती वेळ कशी तरी मारून नेली. या विजयोत्सवांत दोन दिवस निघून गेल्यानंतर तिसरें दिवशीं सकाळीं पांचहि पांडव स्नानें वगैरे करून व शुभ्र वस्त्रे परिधान करून, सर्वांचे आधीं सभेंत येऊन विराटाचे सिंहासनावरच जाऊन बसले! हा उद्धटपणा पाहून विराटास क्रोध आला. ‘मीं तुला सभासद केलें असून तूं माझ्या सिंहासनावर कां जाऊन बसलास?’ असें त्यानें धर्मास विचारिलें. अर्जुनानें धर्मराजाची स्तुति करून युधिष्ठिरासारखा धर्मात्मा सार्वभौमराजा सिंहासनावर बसण्यास कसा योग्य नाहीं? असें विराटास पुशिलें. तेव्हां त्याचा सर्व भ्रम दूर झाला! बल्लव, बृहन्नला वगैरे लोक वास्तविक कोण आहेत; हेंहि त्यास कळून आलें. तेव्हां अत्यंत आनंदित होऊन विराटानें कृतज्ञतापूर्वक आपलें राज्य त्यास देऊं केलें; आणि अर्जुनानें उत्तरेचा स्वीकार करावा अशीहि त्यानें इच्छा दर्शविली; परंतु उत्तरेस नृत्यगायन शिकविल्यामुळें तिचें आपलें गुरु-शिष्याचें नातें झालें आहे; हें जाणून अर्जुनानें विराटाचें तें बोलणें मान्य न करितां अभिमन्यूसाठीं सून या नात्यानें उत्तरेचा स्वीकार केला. यापुढें पांडव मत्स्यदेश व कुरुदेश यांचे सरहद्दीनजीकच्या उपप्लव्य नांवाचे एका नगरांत जाऊन राहिले. धर्मानें आपले आप्त, इष्टमित्र व स्वपक्षास अनुकूल असणारे राजे या सर्वांना तेथें बोलवून आणिलें. द्रुपद, अभिमन्यु, सुभद्रा, श्रीकृष्ण, द्रौपदीचे पांच पुत्र इत्यादि मंडळीहि कांहीं दिवसांनीं तेथें आली. नंतर अभिमन्यु व उत्तरा यांचा विवाह होऊन बारा वर्षें वनवास व एक वर्ष अज्ञातवास या दुःखदायक कालाचा शेवट ह्या विवाहाच्या आनंदोत्सवांत झाला! विराटपर्व अ० ६८–७२)



# प्रकरण सहावें.



## कृष्णशिष्टाई.



धृतराष्ट्राचे आज्ञेप्रमाणें इंद्रप्रस्थ नगरामध्यें **पांडवांनीं** आपलें निराळें राज्य स्थापिलें होतें; पण तें **शकुनीनें** कपटद्यूतानें त्याजपासून हिरावून घेऊन त्यांना वनवास व अज्ञातवास करावयास लाविलें. द्यूताचे वेळीं ठरलेल्या **अटींप्रमाणें** **पांडवांनीं** बारा वर्षें वनवास व एक वर्ष अज्ञातवास पुरा केला. वनवास व अज्ञातवास पूर्ण करून परत आल्यावर ज्याचें राज्य त्यास परत द्यावयाचें, अशी अट द्यूताचे वेळीं दोनहि पक्षांनीं कबूल केली होती; त्या अटी-प्रमाणें आपलें राज्य **दुर्योधन** परत करील कीं नाहीं ? व न केल्यास पुढें आपण कोणता मार्ग स्वीकारावयाचा ? हे दोन प्रश्न आतां **पांडवांचे** मनांत घोळूं लागले. **अभिमन्यूचे** लग्नासाठीं **उपप्लव** नगरांत **द्रुपद** व **पांडवांना** अनुकूल असलेले इतर सर्व राजे जमले होते. विवाहानंतर एके दिवशीं हे सर्व राजे **विराटाचे** सभागृहांत जमले असतां वरील प्रश्न निघाला. त्यावेळीं **श्रीकृष्ण** म्हणाले:— **पांडवांवर** **दुर्योधनानें** लहानपणींच कोणकोणतीं संकटें आणिलीं, सभेमध्यें **द्रौपदीचा** कसा छळ झाला, **पांडवांचें** सर्व राज्य कपटानें कसें हरण करण्यांत आलें व शेवटीं त्यांना वनामध्यें जाऊन कोणकोणते हाल व आपत्ति सोसाव्या लागल्या, हें सर्व तुम्हांस ठाऊक आहेच. पराक्रमी **पांडवांचे** मनांत असतें तर त्यांनीं या संकटांतून आपली सुटका करून पुनः सर्व पृथ्वीचेंहि राज्य मिळविलें असतें. पण **केवळ सत्यासाठीं त्यांनीं तेरा वर्षें वनवासाचीं दुःखें भोगिलीं. पांडवांना अन्यायानें मिळणारें स्वर्गाचें सुद्धां राज्य नको आहे. धर्मास अनुसरून जें मिळवितां येईल तेवढ्यांतच त्यांचें समाधान आहे.** दुर्योधन कपटानें घेतलेलें **पांडवांचें** राज्य त्यांना परत देईल कीं नाहीं, हें कळत नाहीं. तेव्हां अशा स्थितींत काय करावें, कोणती गोष्ट दोहोंपक्षांस हितावह व धर्मास आणि नीतीस अनुसरून होईल, याचा तुम्हीं सर्वांनीं--**दुर्योधनाचा**

वाढता राज्यलोभ व धर्माचा सात्विकपणा लक्षांत आणून-विचार करावा. पांडवांचें अर्धें राज्य परत मागण्यासाठीं आपण एक दूत कौरवांकडे पाठवावा असें मला वाटतें.' यावर बलरामानें उत्तर केलें:—' युधिष्ठिर जर अर्ध्या राज्यावरील आपला हक्क सोडण्यास कबूल आहे, तर दुर्योधनहि बाकीच्या अर्ध्यावरील आपली मालकी खुषीनें सोडील. पांडवांचें सर्व राज्य सध्यां दुर्योधनाचेच हातीं आहे; तेव्हां त्यास यावेळीं नाखुष करणें श्रेयस्कर नाहीं. त्याजकडे जाणाऱ्या दूतानें द्यूताबद्दलचा सर्व दोष युधिष्ठिरासच द्यावा; व अशा तऱ्हेनें दुर्योधनादिकांस खुष करून सांप्रत आपला कार्यभाग साधावा.' बलराम दादाचें हें भाषण सात्यकीस मुळींच आवडलें नाहीं. तो म्हणाला:— धर्मराजा द्यूतामध्यें कुशल नाहीं, असें पाहून दुष्टांनीं त्यास खेळास बोलाविलें व आपलें क्षत्रियव्रत स्मरून तो द्यूतास आला; यांत धर्माचा कोणता अपराध आहे! त्यानीच कौरवांच्या सभेमध्यें धर्माच्या दूतानें जाऊन धर्माचीच निंदा करावी व अशा रीतीनें आपलयोग्या दुष्ट लोकांचा तोंडपुजेपणा करून आपलें राज्य मिळवावें, ही युक्ति अत्यंत निंद्य होय. यापेक्षां मर्द क्षत्रियाप्रमाणें एकदम युद्ध सुरू करणेंच चांगलें.' याप्रमाणें वादविवाद चालला असतां वृद्ध द्रुपद राजानें पोक्तपणाची मसलत सांगितली; व ती सर्वांना पसंतहि झाली. तो म्हणाला:— ' दुर्योधन स्वभावतःच दुष्ट आहे, तो सामोपचारानें पांडवांचें राज्य त्यांना परत द्यावयाचा नाहीं. धृतराष्ट्र, पुत्रप्रेमामुळें, भीष्म-द्रोण मिंधेपणामुळें व कर्ण आणि शकुनि मूर्खपणामुळें दुर्योधनासारखेच नाचणार. **अशांशीं सामोपचाराच्या गोष्टी बोलणें म्हणजे गाढवास गोंजारण्यासारखें आहे.** सौम्यपणानें बोलूं लागल्यास पांडव निर्बल व भित्रे आहेत असें त्यास वाटेल. दुर्योधनानें तिकडे युद्धाचीहि तयारी चालविली असेल; तेव्हां श्रीकृष्णांचे मसलतीप्रमाणें आपण एक दूत धृतराष्ट्राकडे पाठवावा, व इकडे आपणांस युद्धांत साह्य करण्याविषयीं विनंती करण्यासाठीं निरनिराळ्या राजांकडे दूतहि पाठवावें. ज्यांचा दूत प्रथम येईल त्यांस मदत करणें आपलें कर्तव्य आहे, असें राजे लोक समजतात; यासाठीं आपण दूत पाठविणें ते लवकर पाठवावें हें बरें.' द्रुपदराजाचे या मसलतीप्रमाणें करावयाचें ठरलें. श्रीकृष्ण द्वारकेस गेल्यानंतर द्रुपदानें आपला पुरोहित कौरवांकडे पाठविला; तसेंच युद्धांत मदत मागण्याकरितां पांडवांनींहि सर्व देशांचे राजाकडे दूत पाठविले. ( उद्योगपर्व अ० १-६ )

पुढें होणाऱ्या भयंकर व तुंबळ युद्धामध्यें आपणांस श्रीकृष्णांचें साहाय्य



श्रीकृष्ण जागे झाल्यावर त्यांनीं प्रथम अर्जुनास व नंतर दुर्योधनास पाहिलें. [ पृ.११९

असावें, असें कौरव व पांडव या दोघांनाहि वाटत होतें. त्याप्रमाणें त्यांस आमंत्रण करण्यासाठीं पांडवांचे बाजूनें अर्जुन व कौरवांचे बाजूनें दुर्योधन हे द्वारकेस गेले; दोघेहि एकाच दिवशीं तेथें पोंचले. दुर्योधन राजवाड्यांत गेला त्यावेळीं श्रीकृष्ण निजले होते; म्हणून तो त्यांचे उशाचे बाजूस एका आसनावर बसला. मागाहून अर्जुन आला; परंतु तो नम्रपणानें श्रीकृष्णांचे पायांशीं बसला. श्रीकृष्णांनीं जागे झाल्यावर प्रथमतः अर्जुनास व नंतर दुर्योधनास पाहिलें. त्यांनीं दोघांचेंहि आगतस्वागत केलें. ' युद्धामध्यें आपलें साहाय्य मागण्यास मी आधीं आलों आहे, माझ्या पक्षाकडे तुम्हीं यावें ' असें दुर्योधनानें म्हटलें असतां श्रीकृष्णांनीं उत्तर केलें:—'दुर्योधना, तूं आधीं आलास खरा; पण मीं अर्जुनासच आधीं पाहिलें. तेव्हां मी दोन्ही पक्षांस साह्य करितों. एका पक्षास माझे दहा लक्ष यादव योद्धे साह्य करितील. व दुसऱ्या पक्षास मी स्वतः युद्ध न करितां व हातीं शस्त्र न घेतां एकटा साह्य करीन, या दोहोंपैकीं अर्जुना, तुला कोणतें पत्करतें तें सांग. ' हें ऐकून अर्जुनानें, श्रीकृष्णानेंच आपणांस साह्य करावें, असें म्हटलें. निःशस्त्र व युद्ध न करणाऱ्या श्रीकृष्णापेक्षां दहा लक्ष सशस्त्र यादव वीर आपणांस मिळालेले पाहून दुर्योधनासहि फार आनंद झाला ! बलरामानें, कोणत्याच पक्षास साह्य करावयाचें नाहीं' असें ठरविलें. दुर्योधन तेथून निघून गेल्यानंतर, ' यादवसैन्य न मागतां तूं माझेंच सहाय्य कां मागितलेंस ? ' असें कृष्णांनीं अर्जुनास विचारलें. तेव्हां त्यानें उत्तर केलें:—' आमच्या शत्रूंचा वध करण्यास मी एकटाच समर्थ आहे; त्याकामीं मला तुसें यादवसैन्य काय करावयाचें आहे ! परंतु **श्रीकृष्णा ! जिकडे तूं तिकडे यश व किर्ति असते**, हे जाणून मी तुझें साह्य मागितलें. तूं माझें सारथ्य करावें अशी माझी फार दिवसांपासून इच्छा होती; ती पूर्ण करण्याचा हा उत्तम समय आला आहे. ' अर्जुनाची ही इच्छा ऐकून श्रीकृष्णांनीं त्याचें सारथ्य करण्याचें मोठ्या आनंदानें कबूल केलें; व कांहीं थोडेसे यादववीर बरोबर घेऊन श्रीकृष्ण व अर्जुन युधिष्ठिराकडे आले.

पांडवांचे दूत येऊन युद्धास बोलावून गेल्यानंतर मद्र देशाचा राजा शल्य आपलें सर्व सैन्य बरोबर घेऊन, पांडवांचे मदतीस येण्यास निघाला. ही बातमी दुर्योधनास कळतांच त्यानें त्याचे सोयीसाठीं वाटेंत जागोजाग उत्तम उत्तम शिबिरें, बागा, तळीं व विहिरी बांधविल्या; आणि त्याची व त्याच्या सैन्याची

सर्व प्रकारची व्यवस्था ठेविली. आपलें हें सर्व आदरातिथ्य युधिष्ठिराकडूनच होत आहे असें वाटून, शल्यास फार आनंद झाला. आदरातिथ्याची अशी उत्तम प्रकारची व्यवस्था ठेवणाऱ्या सेवकांना बक्षीस देण्यासाठीं जेव्हां त्यानें बोलाविलें, तेव्हां गुप्तपणानें दुर्योधनच पुढें झाला. त्याचें हें कपट न समजून शल्यानें ' हवा तो वर माग ' असें म्हटलें, तेव्हां एकदम पुढें होऊन ' तुम्हीं आपलें भाषण आतां खरें केलें पाहिजे. माझ्या सैन्याचें सेनापतित्व तुम्ही स्वीकारावें, हेंच मला या सेवेबद्दल बक्षीस द्या ' ! याप्रमाणें वचनाचे पेचांत सांपडल्यामुळें दुर्योधनाचें मागणें शल्यास कबूल करावें लागलें, नंतर युधिष्ठिराकडे येऊन त्यानें घडलेली सर्व हकीकत त्यांस सांगितली; तेव्हां युधिष्ठिर म्हणालाः— बरें असो, झालें तें योग्यच झालें. परंतु माझें एक मागणें आहे तेवढें मात्र तुम्हीं मान्य करावें. सारथ्यकर्मांत तुमची व श्रीकृष्णांची योग्यता सारखीच आहे; तेव्हां अर्जुन व कर्ण यांच्या द्वंद्वयुद्धाचे वेळीं जेव्हां कर्णाचें सारथ्य तुमचेकडे येईल, तेव्हां अर्जुनाची स्तुति व कर्णाची निंदा करून तुम्हीं त्याचा तेजोवध ( तेजोभंग ) करावा व त्याचें धैर्य खचवावें. धर्माचें हें म्हणणें मान्य करून शल्य आपल्या सैन्यासह दुर्योधनाकडे निघून गेला. ( उद्योगपर्व अ० ७—१८ )

भरत— भूमींतील निरनिराळे प्रबळ राजे आपापल्या पक्षाला अनुकूल करून घेण्याचा प्रयत्न उभयपक्षांकडून जारीनें चाललें असतां, दोहोंबाजूंचीं सैन्यें हळुहळु जमूं लागलीं. इकडे द्रुपदाचा पुरोहित हस्तिनापुरास आला; व कौरवसभेत येऊन त्यानें पांडवांचा निरोप धृतराष्ट्रास कळविला. तो म्हणालाः— " पूर्वपरंपरा पाहातां पांडूचे पश्चात् वडिलोपार्जित राज्य पांडवांनाच मिळावयास पाहिजे होतें; पण तें तुम्हीं अन्यायानें आपल्याकडे ठेविलें. बरें, तें एक असो! पांडवांनीं स्वपराक्रमानें संपादिलेलें राज्यहि द्यूतामध्यें कपटानें हरण करून तुम्हीं त्यांना तेरा वर्षें देशोधडीस लाविलें. असें असतांहि सभेंतील छळ, हृदयाला घरें पाडणारीं दुर्भाषणें व वनवासांतील हाल हीं सर्व विसरून जाऊन, ते तुम्हांजवळ आपलें हक्काचें अर्धें राज्य सामोपचारानें परत मागत आहेत. भयंकर प्राणहानि न होतां आपलें राज्य परत मिळत असेल तर तें त्यांना हवेंच आहे. पण तें शक्यच नसेल तर युद्ध करण्यासहि ते एका पायावर तयार आहेत. ज्ञातिहित व राष्ट्रहित आणि धर्म व नीति यांस धाब्यावर बसवून दुर्योधन अविचार करूं लागेल, तर त्यास ताळ्यावर आणणें हें तुमचें कर्तव्य आहे.

तर या सर्व गोष्टींचा तुम्हीं योग्य तो विचार करून पांडवांचें राज्य त्यांस परत द्यावें., पुरोहिताचे हें भाषण भीष्मांस पसंत पडलें, त्यांनीं धर्माच्या सात्त्विकपणाची आणि अर्जुनाच्या शौर्याची व पराक्रमाची वाखाणणी चालविली असतां, कर्णानें एकदम मध्येंच उद्धटपणानें तोंड घालून पांडवांची निंदा सुरू केली. धर्म जो राज्य परत मागत आहे तो द्यूताचे वेळच्या अटीप्रमाणें मागत नसून, मत्स्य व पांचाल यांच्या सैन्याच्या व सम्बंध्यांच्या घमेंडीवर मागत आहे. धर्माच्या या सैन्यास व धमक्यांस भिऊन दुर्योधनानें अर्धे तर काय पण चतुर्थांशहि राज्य त्यांना देऊं नये. त्यांनीं युद्ध केलेंच तर त्यांचा समाचार घेण्यास मी समर्थ आहे, असें कर्ण म्हणाला. तेव्हां भीष्मानीं कर्णाची चांगलीच कानउघाडणी केली. ते म्हणाले:—पांडवांना युद्धांत जिंकण्याची कर्णाची घमेंड व्यर्थ आहे. एकट्या अर्जुनानें जेव्हां उत्तरगोग्रहणाचे वेळीं सहा वीरांना फजित केलें, तेव्हां कर्णाचें शौर्य कोठें गेलें होतें ? या ब्राह्मणाच्या म्हणण्याप्रमाणें जर आपण पांडवांना त्यांचें अर्धें राज्य दिलें नाहीं, तर आपणासर्वांना लवकरच रणांगणांतील धूळ खात पडावें लागेल, यांत शंका नाहीं. ' इतक्यांत, आपले हे सर्व बेत पांडवांचे दूतासमक्ष होणें बरें नव्हें, असें धूर्तपणानें जाणून धृतराष्ट्रानें द्रुपदाच्या पुरोहिताचा सत्कार केला; व ' आम्हीं सर्व गोष्टींचा विचार करून संजयाला युधिष्ठिराकडे पाठवितों. असा निरोप पांडवांना कळवा ' असें सांगून त्यास निरोप दिला. नंतर धृतराष्ट्रानें संजयास बोलावून आणिलें. ' पांडवांकडे जाऊन त्यांना कुशल प्रश्न विचारून मग ' युद्ध करणें चांगलें नाहीं, त्यामुळें प्राणहानि फार होते व प्रजाजनांचे अति हाल होतात; आजपर्यंत धर्मानें वागून आतांच तुम्ही निष्ठूर होऊं नये. ऐहिक वैभवाकरितां तुम्ही युद्धासारखें क्रूर व घोर कृत्य करणार नाहीं; कारण तुम्ही सर्व धर्मनिष्ठ आहां. यासाठीं उभयतांचें सख्य असावें ' असा निरोप पांडवांना कळविण्यासाठीं त्यास पाठविलें. संजयानें पांडवांकडे येऊन धृतराष्ट्राचा हा मोघम व कावेबाज निरोप त्यांस कळविला. धृतराष्ट्र आपलें अर्धें राज्य परत देणार आहे कीं नाहीं, याचा संजयाच्या निरोपावरून पांडवांस कांहींच थांग लागेना. फक्त ' युद्ध करणें चांगलें नव्हें. त्यांपासून कौरवकुलाचा नाश होईल ' इ० इ० मोघम उपदेशच त्या निरोपांत होता. हा निरोप ऐकून युधिष्ठिरासहि राग आला; त्यानें आवेशानें उत्तर केलें:—आम्ही म्हणजे युद्ध करून जीवहत्या

करण्यास अतिशय उत्सुक आहों असें नाहीं; पण आमचें राज्य आम्हांला परत न दिल्यास आम्हांस खास युद्ध करावें लागेल. आमचें इंद्रप्रस्थाचें अर्धें राज्य आम्हांस दिल्यास आम्हीं सलोखा करण्यास तयार आहों.' राज्यासाठीं युद्ध करून सर्व कुल व राष्ट्र यांचा नाश करण्यापेक्षां भिक्षा मागून उदरनिर्वाह करणें बरें' असें संजय प्रतिपादन करूं लागला! तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले:—'पांडवांचें जें मागणें आहे तें धर्मास व राजनीतीस अनुसरूनच आहे. **भिक्षा मागणें किंवा याचना करणें हें क्षत्रियांचें ब्रीद नसून पराक्रमानें राज्य मिळवून व प्रजेचें पालन करून यश संपादन करावें हें क्षत्रियाचें कर्तव्य आहे.** कौरवांनीं पांडवांचा अनेक प्रकारें छळ केला असूनहि त्याबद्दल सूड उगविण्याची गोष्ट मनांत न आणतां ते अझूनहि सख्य करण्याची इच्छा करीत आहेत, हा त्यांचा मोठेपणा आहे. **पण भिक्षा मागून व क्षत्रियाचें ब्रीद सोडून होणारें सख्य करण्यास ते बिलकुल तयार नाहींत.** सख्याचें आड पांडव येत नसून धृतराष्ट्र व त्याचे दुर्योधनादि पुत्र यांचा राज्यलोभच आड येत आहे. अशा स्थितींत तुम्ही उलट पांडवांसच धर्मनितीचा उपदेश करतां, हें आश्चर्य आहे. प्रत्येक युद्ध म्हणजे पापकर्मच आहे असें नाहीं. दुसऱ्यांचीं राज्यें जुलमानें अगर कपटानें हिरावणाऱ्या दुष्ट राजांचें शासनार्थ युद्ध व शस्त्रास्त्रें निर्माण झालीं आहेत. अशा प्रकारचें युद्ध पाप नसून पुण्यच आहे. दुसऱ्याचें द्रव्य लुबाडणाऱ्या मनुष्यास चोर समजतात. पांडवांचें राज्य कपटद्यूतानें कौरवांनीं घेतलें व वनवासानंतर तें परत देण्याचेंहि कबूल केलें. हें आपणांजवळ ठेव म्हणून असलेलें जें अर्धें राज्य त्याचा अपहार करूं इच्छिणारे कौरव सामान्य चोराहूनहि दुष्ट आहेत. भरसभेंत पांडवांच्या पट्टराणीचे तुम्ही काय धिंडवडे केलेत! भीष्मासारख्यांनीं सुद्धां डोळेझाक केली! तथापि हे सर्व मागील भयंकर अपराध विसरून कौरवांकडे जाऊन त्यांचें मन वळविण्याचा मी स्वतःच प्रयत्न करणार आहे. इतकेंहि करून जर ते अर्धें राज्य देणार नाहींत, तर युद्ध झाल्यावांचून राहणार नाहीं!' इतकें बोलणें झाल्यावर पांडव व श्रीकृष्ण यांचा निरोप घेऊन संजय हस्तिनापुरास जाण्यास निघाला असतां, युधिष्ठिरानें दुर्योधनास पुढील अखेरचा निरोप पाठविला. 'आपण एकट्यानेंच कुरुराष्ट्रावर राज्य करावें, हा जो तुझा हेतु आहे तो अगदीं अन्यायाचा आहे. आमचें इंद्रप्रस्थ आम्हांस परत द्यावें किंवा युद्धास सिद्ध व्हावें, हे दोनच मार्ग आतां

राहिले आहेत. लहानपणीं तुम्हीं आमच्याशीं केलेलें वर्तन, दुःशासन कर्ण व तूं यांनीं आमच्या साध्वी स्त्रीची सभेमध्यें केलेली विटंबना आणि वनवासांतील व अज्ञातवासांतील संकटें व हाल हीं सर्व विसरण्यास आम्हीं तयार आहों. आमच्याच हातून आमच्या कुरुकुलाचा संहार होऊं नये, यासाठीं आम्ही तुला पूर्वींच्या सर्व अपराधांची क्षमा करीत आहों. आम्हांस अर्धें राज्य, एकादा प्रांत, किंबहुना—

'इंद्रप्रस्थं वृकप्रस्थं माकंदीं वारणावतम् ।
देहि मे चतुरो ग्रामान्पंचमं कंचिदेव तु ॥'

आम्हां पांच भावांना इंद्रप्रस्तादि पांच गांवें तरी दे; आम्हांतेवढ्यातहि समाधान होईल. पांच गांवें दिलींस तरी आम्हीं सख्य करण्यास तयार आहों. याप्रमाणें युधिष्ठिराचा निरोप ऐकल्यानंतर, सर्वांचा निरोप घेऊन संजय हस्तिनापुरास परत आला. ( उद्योगपर्व अ० १९–३१ )

उपलव्य नगराहून हस्तिनापुरास परत आल्यानंतर दुसरें दिवशीं सभेमध्यें धृतराष्ट्र, भीष्म, द्रोण, दुर्योधन वगैरे सर्व मंडळी जमली असतां पांडवांचा निरोप संजयानें त्यांस सांगितला. नंतर त्यासंबंधानें भीष्म, दुर्योधन, कर्ण इत्यादिकांमध्यें वादविवाद सुरू झाला. 'श्रीकृष्ण व अर्जुन हे पूर्वजन्मींचे नर-नारायण आहेत, त्यांजबरोबर युद्धांत कोणीहि टिकाव धरणार नाहीं. तेव्हां त्यांचें राज्य त्यांना मुकाट्यानें परत द्यावें, हेंच सर्वांना श्रेयस्कर आहे' याप्रमाणें भीष्मानीं अनेक प्रकारानें सांगितलें. द्रोणाचार्यांनींहि न्यायाचा व सत्याचा पक्ष घेऊन चंचल धृतराष्ट्र व हटवादी दुर्योधन यांचें मन वळविण्याचा प्रयत्न केला; पण सर्व व्यर्थ झालें. भीष्म व द्रोण यांच्या उपदेशाकडे लक्ष्य न देतां धृतराष्ट्र पांडवांचें सैन्य किती आहे, त्यांत कोण कोण योद्धे आहेत, वगैरे प्रकारचीच विचारपूस संजयापाशीं करूं लागला! संजयानें सैन्याची माहिती सांगतांना अर्जुनाच्या पराक्रमाचें व भीमाच्या बलाचें असें वर्णन केलें कीं, तें ऐकून धृतराष्ट्राचे मनांत फारच दहशत उत्पन्न झाली. भीमाची गदा व अर्जुनाचें गांडीव यांचे योगानें सर्व क्षत्रियांचा व कौरवांचा सारखा संहार होत आहे असें, डोळे नसतांहि, त्याला दिसूं लागलें! या भयंकर भावी नाशाबद्दल तो नुसता मनांत हळहळूं लागला; परंतु आपल्या पुत्रांची मसलत

न ऐकतां पांडवांचें राज्य त्यांना परत देण्याची मात्र गोष्ट त्याचे मनांत येईना ! आपल्या पित्याच्या मनाची ही द्विधा स्थिति पाहून दुर्योधन त्यास धीर देऊं लागला. तो म्हणालाः—'पांडव आमचा युद्धांत नाश करतील ही गोष्ट अगदींच अशक्य आहे. आपले बाजूस भीष्म, द्रोण, अश्वत्थामा, कृप, कर्ण यांचेसारखे महारथी आहेत; गदायुद्धामध्यें तर मजप्रमाणें तरबेज कोणीच नाहीं. मी एकटाच भीमाचा समाचार घेण्यास पुरेसा आहे. तेव्हां त्यांच्या धमक्यांस भीक घालून राज्य परत देण्याची कांहीं जरूर नाहीं. पांडव आणि आम्ही कौरव दोघेहि राजे या नात्यानें एकत्र राहणें आतां शक्य नाहीं. त्यांना मारून मी एकटा तरी राज्याचा स्वामी होईन किंवा ते तरी आम्हांस मारून राजे होतील.

**यावद्धि सूच्यास्तीक्ष्णाया विध्येदग्रेण मारिष ।**
**तावदप्यपरित्याज्यं भूमेर्नः पांडवान्प्रति ॥**

अर्धे राज्य किंवा पांच गांवें देण्याची तर गोष्टच नको; पण सुईच्या तीक्ष्ण अग्रावर जेवढी माती राहील तेवढीहि पांडवांना परत देण्यास मी तयार नाहीं ! दुर्योधनानें याप्रमाणें बोलणें चालविलें तरी पांडवांशीं युद्ध करावें असें धृतराष्ट्रास निश्चयानें वाटेना. 'या कलहापासून क्षत्रियांचा व सर्व कुरुसैन्याचा संहार होईल. दुर्योधना, भरतवर्षाचें अर्धें राज्य तुझ्या मनाचें समाधान करण्यास व तुझें वैभव कायम ठेवण्यास पुरे नाहीं काय ? पांडवांसारखे पराक्रमी मला कोणीच दिसत नाहीं. हें भांडण सख्य करूनच मिटवावें असें मला वाटतें.' इत्यादि प्रकारें धृतराष्ट्र दुर्योधनाची समजूत करूं लागला. त्यामुळें दुर्योधनास अधिकच त्वेष येऊन तो आपल्या पराक्रमाची, शौर्याची व अस्त्रविद्येची प्रौढि सांगूं लागला. 'भीष्म, द्रोण वगैरेंचीहि मला मुळींच अपेक्षा नाहीं. कर्ण, दुःशासन व मी येवढे तिघेच सर्व पांडवांचा वध करण्यास समर्थ आहों' असें त्यानें प्रलाप चालविले ! यांवर कर्णाहे त्यास पाठबळ देऊन म्हणालाः—'तुम्हां दोघांचीहि गरज नाहीं. भगवान् परशुरामांपासून मिळविलेल्या अस्त्राचे योगानें व इंद्रानें दिलेल्या दिव्य शक्तीनें मी एकटाच पांडवांचा व त्यांच्या सर्व सैन्याचा वध करून टाकितों. भीष्म-द्रोणांनीं व तुम्हीं कौरवांनीं स्वस्थ राहून प्रेक्षकांप्रमाणें युद्ध पहावें. पांडवांचा नाश करण्याचें काम मजकडे लागलें !' ही आत्मश्लाघेची बडबड ऐकून भीष्म तू म्हणालेः—'मूढा, उगीच आपली प्रौढि कां मिरवितोस ? इंद्रानें दिलेल्या तुझ्या त्या

शक्तीचा, सर्पमुख बाणांचा व अस्त्रांचा ऐन प्रसंगीं काडीइतकाहि उपयोग व्हावयाचा नाहीं. अर्जुनाचें संरक्षण स्वतः श्रीकृष्ण करणार आहे, त्याजपुढें तुझें काय चालणार आहे ? तुला मात्र अर्जुन खास यमसदनीं पाठविणार.' हें भाषण ऐकून भीष्मानीं नेहमीं नेहमीं असा आपला पाणउतारा करावा, हें कर्णास अगदीं खपलें नाहीं. त्यानें अत्यंत क्रोधायमान होऊन अशी प्रतिज्ञा केली कीं, भीष्मांना सभेमध्यें किंवा युद्धामध्यें मी आतां मुळींच तोंड दाखविणार नाहीं; भीष्म रणांगणांत पडल्यानंतर मग माझा पराक्रम सर्वांस दिसून येईल ! या प्रमाणें प्रतिज्ञा करून कर्ण सभेंतून उठून निघून गेला. कांहीं वेळानें भीष्म, द्रोणादिकहि सभेंतून गेले. नंतर धृतराष्ट्रानें पुनः दुर्योधनाची समजूत करण्याचा प्रयत्न चालविला; पण त्यानें आपला दुराग्रह सोडला नाहीं. ' श्रीकृष्ण व अर्जुन या उभतांनीं कुरुकुळाचा व सर्व क्षत्रियांचाच काय, पण सर्व पृथ्वीचा नाश केला तरी मी त्यांशीं सख्य करणार नाहीं ' असें त्यानें निर्वाणीचें उत्तर दिलें ! दुर्योधन आपलें ऐकत नाहीं, हें पाहून धृतराष्ट्र व गांधारी यांना फार वाईट वाटलें. परंतु करतात काय ! दुष्ट व दुराग्रही मुलापुढें त्यांचें कांहींच चालेना ! दुर्योधनाचा वध करून किंवा त्यास कारागृहांत टाकून धृतराष्ट्रानें स्वतःच पांडवांशीं सख्य करावें, तर त्यांतहि पुत्रप्रेम आड येऊं लागलें ! ( उद्योगपर्व अ० ४५-६९ )

कौरवांच्या सभेमध्यें याप्रमाणें भाषणें व वादविवाद चालला असतां इकडे पांडवांचे बाजूसहि, युद्ध करावें कीं न करावें याबद्दल आपसांत वाटाघाट चालली होती. ' आम्हांस फक्त पांच गांवें द्या, म्हणजे तीं घेऊन सख्य करण्यास तयार आहों, अशी मीं दुर्योधनाची याचना केली, तरीहि तीं देण्यास तो कबूल होत नाहीं. तेव्हां आतां अशा समयास काय करावें हें, श्रीकृष्णा, तूंच आम्हांस सांग ' असें युधिष्ठिर म्हणाला. त्यावर कौरव व पांडव यांचेमध्यें सख्य करण्याचा प्रयत्न करण्यासाठीं आपण स्वतःच कौरवांकडे जाणार असल्याचें श्रीकृष्णांनीं सांगितलें. श्रीकृष्णांनीं एकट्यानें कौरवांकडे जावें, हें युधिष्ठिरास बरें वाटेना. कारण, त्यांस दुर्योधन कांहीं तरी अपाय करील असें त्यास वाटत होतें. परंतु ' माझ्याविषयीं तुला चिंता करण्याचें कारण नाहीं. मी एकटा सुदर्शन चक्र घेऊन उभा राहिल्यावर मजपुढें नुसतें उभें राहण्याची कोणत्या राजाची छाती होणार आहे ? तिकडे जाणें अगदींच निरर्थक व्हावयाचें नाहीं; कदाचित्

आपला हेतु साध्यहि होईल. साध्य न झाला तरी मग पुढील युद्धाचा मनुष्यसंहाराचा व कुलक्षयाचा दोष आपल्यावर येणार नाहीं ' असें श्रीकृष्णानीं उत्तर दिलें. युद्ध न करितां भिक्षेवर उदरनिर्वाह करावा, असें तुला कदाचित वाटेल; पण, **भिक्षेवर चरितार्थ चालविणें हें क्षत्रियांचें काम नव्हे. न्यायानें युद्ध करून त्यांत जय मिळविणें किंवा रणांगणीं वध पावणें, हीच क्षत्रियांचीं कर्तव्यें** आहेत ' इत्यादिहि त्यांनीं धर्मास सांगितलें. श्रीकृष्णांनीं कौरवांकडे गेल्यावर सामोपचारानें बोलावें, दुर्योधनाचें मन दुखवूं नये, होतां होईल तों युद्धाचा प्रसंग न आणितां सख्य होईल असें करावें, असें यावेळीं भीमाचेंहि म्हणणें पडलें ! मोठ्या पर्वतानें आपलें प्रचंड रूप टाकून उकिरडा बनावें किंवा भडकलेल्या अग्नीनें थंड व्हावें, त्याप्रमाणें भीमाचें हें भाषण सर्वांना वाटलें. ' पूर्वीं तुझे बाहु युद्धाकरितां तर कसे फुरफुरत होते ! आणि आतां युद्ध होतां होईल तो टाळावें असें म्हणतोस यास काय म्हणावें ? तुझ्या मनांत भय उत्पन्न झालें आहे कीं काय ? ' असें श्रीकृष्ण त्यास थोडेसें टोंचून म्हणाले. तेव्हां भीमसेनास क्रोध येऊन तो म्हणाला:— ' माझा पराक्रम व सामर्थ्य माहीत असूनहि तूं असें बोलावें हें योग्य नव्हे. आपल्याच हातून आपल्या कुलाचा नाश होऊं नये, येवढ्याकरतांच मी असें बोललों. ' तेव्हां श्रीकृष्णांनीं उत्तर दिलें—**भीमा, मनुष्यानें नेहमीं आपल्या कर्तव्याकडे लक्ष देऊन तेंच करीत असावें. आपल्या कर्तव्याचा परिणाम कसा होईल, इकडे पाहूं नये. फलाऐवजी कर्तव्याकडे नजर ठेवून वागणें हेंच सर्व प्रसंगीं श्रेयस्कर आहे.** युद्ध केलें तर भारतकुलाचा नाश होईल या परिणामाकडे पाहण्याचें कारण नाहीं. खलांनीं हरण केलेलें आपलें राज्य सामोपचारानें परत मागितलें तरी ते देत नाहींत व क्षत्रियांस तर राज्य हवें, अशा प्रसंगीं युद्धच करणें कर्तव्य आहे व तें कांहीं झालें तरी तुह्मांसारख्या क्षत्रियांनीं केलेंच पाहिजे. ' होतां होईल तों युद्ध न करितां आपलें राज्य परत मिळविण्याचा प्रयत्न करावा व तो साध्य झाला नाहींच तर मग युद्ध करावें असें अखेर धर्म, भीम, अर्जुन, श्रीकृष्ण, नकुल वगैरेंचें मत पडलें. पण सहदेव, सात्यकी वगैरे तरुण योद्ध्यांना, कौरवांशीं सख्य करण्याचा प्रयत्नसुद्धा करूं नये, एकदम लढाईच करावी हें चांगलें, असें वाटलें.

कौरवांशीं सख्य करण्याची वाटाघाट चालू असल्याचें आतांपर्यंत द्रौपदीस कळलें नव्हतें. शत्रूंच्या नरडीचा एकदम घोट घेऊन साध्वीच्या छलाचा सूड उग-

विण्याचें सोडून देऊन, आपला इतका छल व विटंबना झाली आणि सर्वांचा अनन्वित उपपर्द व हाल झालें, तरी पांडव सख्याचीच गोष्ट काढीत आहेत, हें ऐकून द्रौपदीस फार त्वेष आला व वाईटहि वाटलें. तिनें श्रीकृष्णाकडे जाऊन पूर्वी कौरवांनीं केलेल्या कोणत्या अनन्वित विटंबना व विलक्षण छळ आपण संहन केले आहेत, याची त्यांस आठवण करून दिली; व शेवटीं दुःशासनानें भरसभेमध्यें जोरानें हिसके देऊन ओढलेले आपले केस एका हातानें पुढें धरून व डोळ्यांत अश्रु आणून ती म्हणालीः—

' अयं ते पुंडरीकाक्ष दुःशासनकराद्धृतः ।
स्मर्तव्यः सर्वकार्येषु परेषां संधिमिच्छतः ॥

'कौरवांशीं सख्य करावयाची तुम्ही इच्छा करीत आहां; पण कोणतेंहि कृत्य करतांना दुःशासनानें भरसभेमध्यें ओढलेल्या या माझ्या केसांची आठवण असूं द्या. अर्जुनासारखा पराक्रमी व भीमासारखा बलाढ्य योद्धा आपलें कर्तव्य विसरून जर सख्य करण्याची इच्छा करीत असेल, तर माझा वृद्ध पिता व माझे पांच शूर पुत्र अभिमन्यूला सेनापति करून युद्ध करतील. पेटलेल्या अग्नीप्रमाणें आपला राग आज तेरा वर्षें मी आपल्या पोटांत ठेविला; पण तो आतां शमन झालाच पाहिजे.

दुःशासनभुजं श्यामं संछिन्नं पांशुगुंठितम् ।
यद्यहं तु न पश्यामि का शांतिर्हृदयस्य मे ॥

ज्यानें माझी सभेंत विटंबना केली तो दुःशासनाचा हात रणांगणांत तुटून धुळींत लोळत पडेपर्यंत माझ्या मनास कांहीं केलें तरी समाधान व्हावयाचें नाहीं. याप्रमाणें बोलत असतां रागानें द्रौपदीचें शरीर कांपूं लागलें व तिच्या नेत्रांतून सारख्या अश्रुधारा चालल्या ! श्रीकृष्णांनीं, ' तुझ्या पतीचे शत्रु लवकरच रणांत वध पावून पांडव विजयी होतील, यांत तिळमात्र संदेह नाहीं; तूं आपला शोक आवर' इत्यादि सांगून तिचें समाधान केलें.

विराट, द्रुपद, धर्मराजा वगैरे सर्व राजांचा निरोप घेऊन ठरल्याप्रमाणें श्रीकृष्ण एका सात्यकीस मात्र बरोबर घेऊन हस्तिनापुराकडे निघाले. पांडवांकडून समेटाचें बोलणें करण्यासाठीं स्वतः श्रीकृष्ण येणार, हें ऐकून त्यांचे आदरा-

तिथ्याची व प्रवासांतील इतर सर्व प्रकारची तजवीज करण्याची धृतराष्ट्रानें आज्ञा केली. त्याप्रमाणें त्यांचेसाठीं वाटेंत मोठमोठे डेरे दिले होते व पाण्याच्या विहिरी वगैरे बांधल्या होत्या त्यांची प्रवासांत कोणतीहि गैरसोय होऊं नये, अशी व्यवस्था करण्यांत आली होती. अशा प्रकारच्या थाटाच्या स्वागतानें आपण श्रीकृष्णास वश करूं, अशी धृतराष्ट्रास आशा वाटत होती. विदुरानें भाविष्य केल्याप्रमाणें वरील थाटामाटाकडे नुसत्या वाकड्या नजरेनेंहि न पाहतां श्रीकृष्ण त्वरेनें हास्तिनापुराजवळ येऊन वृकस्थळ नांवच्या गांवांत राहिले. उघडच आहे; **जे खरे कार्यकर्ते पुरुष असतात त्यांचें सर्व लक्ष फक्त कार्यसिद्धीवर असतें; स्वतःच्या बडेजावाची किंवा मानसन्मानाची त्यांस फिकिर नसते.** श्रीकृष्णास मोठमोठे रथ, उत्तम अश्व, सुवर्णभूषणें रत्नें वगैरे नजराणा देऊन खुष करून आपल्या बाजूला वळविण्याचा कार्येबाज म्हातारा धृतराष्ट्र याचा विचार होता. पण विदुरानें त्याची चांगलीच कान-उघाडणी केलीः—, तूं दिलेल्या नजराण्याचाच काय पण सर्व पृथ्वीचे राज्याचाहि उपभोग घेण्याची श्रीकृष्णाची योग्यता आहे. तुझ्या या नजराण्यास भुलून तो पांडवांचा पक्ष सोडील. असें मनांतहि आणूं नको, श्रीकृष्णास पांडव व कौरव यांचेमध्यें ऐक्य झाल्यास तें पाहिजे आहे. तेवढें श्रीकृष्णास दे म्हणजे झालें., भीष्मानींहि आपलें असेंच मत दिलें. पण दुर्योधन म्हणालाः- कृष्णाचें एवढें आदरातिथ्य करण्याचें व त्याला नजराणा देण्याचें वस्तुतः कांहींच कारण नाहीं. मी एक दुसरीच युक्ति योजली आहे. कृष्ण हाच कायतो पांडवांस मुख्य आधार आहे. उद्यां तो येथें आल्यानंतर मी त्यालाच कैद करून बंदींत टाकतों; म्हणजे सर्व यादव मला पूर्णपणें वश होतील व पांडवांचेंहि मग कांहींएक चालणार नाहीं!, हें त्याचें भाषण ऐकून धृतराष्ट्रासहि व वाईट वाटलें. पांडांना अर्धें राज्य परत देण्याचें जरी त्याचे मनांत नव्हतें, तरी दुर्योधनानें योजिलेलें साहस करणें चांगलें— किंबहुना सुरक्षित नाहीं हें तो जाणून होता. श्रीकृष्ण हा पांडवांचा दूत होऊन येत आहे; शिवाय तो आपला संबंधींहि आहे. त्याशीं असें कपट करणे धर्म, नीति व व्यवहार यांस अगदीं विरुद्ध आहे' असें धृतराष्ट्र म्हणाला.' मला असलें भाषण ऐकवत नाहीं' असलें साहस जर दुर्योधन करील तर एका क्षणांत त्याचा व इतर सर्व कौरवांचा नाश होईल; हें, धृतराष्ट्रा तूं पक्कें समजून ठेव., असें सांगून भीष्म उद्वेगानें निघून गेले. ( उद्योगपर्व अ० ७०—८८ )

दुसरे दिवशीं वृकस्थलाहून निघून **श्रीकृष्ण** हस्तिनापुरास आले. गर्विष्ठ **दुर्योधनाशिवाय** इतर सर्व मंडळी त्यांस सामोरी गेली. **धृतराष्ट्रानें** सन्मानपूर्वक **श्रीकृष्णास** आपल्या राजवाड्यांत आणलें. तेथें सर्वांशीं कुशल प्रश्न वगैरे झाल्या-वर **श्रीकृष्ण विदुराचे** घरीं आले. तेथें तेरा वर्षें दुःखांत काळ कंठणारी **पांडवांची** माता कुंती ही होती. **श्रीकृष्णास** पाहातांच, **पांडवांची** व त्यांनीं तेरा वर्षें भोगलेल्या हालअपेष्टांची आणि संकटांची आठवण होऊन तिला एकदम दुःखाचा उमाळा आला! तथापि वनवास व अज्ञातवास यांतील दुःखाचें तिला फारसें वाईट वाटलें नाहीं; पण **द्रौपदीला** रजस्वला असतांना भरसभेंत ओढून आणून **दुःशासनादिकांना** वडील माणसांदेखत जी तिची विटंबना केली, त्याबद्दल तिला असह्य दुःख होत होतें. म्हणून या कृत्यांचा पुरा सूड उगविण्याबदलचें स्फुरण आणणारे निरोप **पांडवांना** कळविण्यास तिनें **श्रीकृष्णाला** सांगितले. ती म्हणालीः—अरे! सख्य करण्याची ही वेळ नाहीं. **विदुलेच्या** उपदेशाप्रमाणें वागण्याचा हा समय आहे. **सिंधुराजानें** राज्य हरण केलेल्या आपल्या **संजय** पुत्रास **विदुलेनें** जो उपदेश केला तोच माझा निरोप, **श्रीकृष्णा**, **पांडवांना** कळीव! **अपमानाबद्दल ज्याला राग व त्वेष येत नाहीं, तो खरा क्षत्रिय नव्हे.** कुलक्षय होईल या भीतीनें स्वस्थ बसून अथवा निराश होऊन नीच स्थितींत राहूं नका. सापांच्या दाढा उपटून काढण्याचे कामीं मेलांत तरी बेहेत्तर, पण कुत्र्यासारखे मरूं नका.

**अलातं तिंदुकस्येव मुहूर्तमपि हि ज्वल ।**
**मा तुषाग्निरिवानार्चिर्धूमायस्व जिजीविषुः ॥**

टेंभुरणाच्या कोलतीप्रमाणें क्षणभर चमकलांत तरी पुरे आहे; परंतु जीवाच्या आशेनें किंवा दुसऱ्या कसल्या भीतीनें भातेणाच्या ज्वालाहीन अग्नीप्रमाणें धुमसत राहूं नका. **शत्रूंनीं केलेला अपमान, तिरस्कार व छळ यांचा भार गाढवाप्रमाणें सहन करणें हा क्षत्रियांचा धर्म नव्हे.** बुडण्याचें किंवा पडण्याचें जरी नशिबीं आलें तरी शत्रूच्या कमरेस घट्ट मिठी मारून बुडावें. **योग्य प्रसंग असतांहि, जीवाच्या आशेनें किंवा भीतीनें जो क्षत्रिय आपलें तेज दाखवीत नाहीं, तो क्षत्रिय नसून चोर आहे हें लक्षांत ठेवा.**

**अष्यपर्वणि भज्येत न नमेतेह कस्यचित् ।**

**क्षत्रियांनीं उंसाप्रमाणें शत्रूंसमोर मोडावें पण वांकूं नये, हें** लक्षांत ठेवा.

**यदर्थं क्षत्रिया सूते तस्य कालोऽयमागतः ।**
**काले हि समनुप्राप्ते त्यक्तव्यमपि जीवितम् ॥**

ज्यासाठीं क्षत्रिय वीरस्त्री पुत्राला जन्म देते तें करण्याचा हाच समय आहे. यावेळीं जर लोकांच्या म्हणण्याला भुलून आपलें कर्तव्य करण्यास चुकाल तर मी तुमचा सर्वथा त्याग करीन. योग्य वेळ आली म्हणजे क्षत्रियानें आपला प्राणहि देण्यास तयार असलें पाहिजे.' 'आपल्या सर्व शत्रूंच वध करून व विजयी होऊन पांडव लौकरच राज्य संपादन करतील' असें खात्रीपूर्वक सांगून, श्रीकृष्णानीं तिचें समाधान केलें व ते दुर्योधनास भेटावयास आले. दुर्योधनानें श्रीकृष्णाचें योग्यप्रकारानें आदरातिथ्य केलें व नंतर त्यास आपल्या वाड्यांतच भोजन करण्याचा आग्रह केला. तेव्हां श्रीकृष्णांनीं उत्तर केलें:—'**आपला हेतु साध्य होईपर्यंत दूत भोजन करीत नसतात.** मी ज्या हेतूनें येथें आलों आहे, तो साध्य झाल्यावर मग तुझ्या घरीं भोजन करीन.' यावर दुर्योधन म्हणालाः—'तुझा हेतु साध्य होवो वा न होवो, आमच्या येथें भोजन करण्यास तुला काय हरकत आहे? आमचें कांहीं तुजशीं वैर नाहीं. एवढेंच नव्हें तर तूं आम्हांस साह्य करण्याचेहि कबूल केलें आहेस; आमचा तूं संबंधीहि आहेस. असें असतां भोजन करण्याचें नाकारणें हें योग्य नाहीं.' हें ऐकून श्रीकृष्णानीं बऱ्याच आवेशानें उत्तर केलें:– 'ऐकमेकांमध्यें प्रेम असेल तर त्यांनीं एकमेकांचे घरीं भोजन करावें; किंवा एकादा जर संकटांत असेल तर त्यानें दुसऱ्याचें अन्न घ्यावें, असें शास्त्र आहे. तुझें व माझें प्रेमहि नाहीं व मीहि संकटांत नाहीं. तुझे भाऊ जे सद्गुणी पांडव त्यांचा तूं लहानपणापासून विनाकारण द्वेष करीत आहेस. **सद्गुणी मनुष्यांचा जो विनाकारण द्वेष करितो तो 'पुरुषाधम' याच पदवीस योग्य आहे.** त्याच्या स्पर्शानें दूषित झालेलें अन्न मी कधींहि घेणार नाहीं. त्यापेक्षां विदुराचे घरीं भोजन करणें अधिक चांगलें. असें मला वाटतें.' याप्रमाणें बोलून श्रीकृष्ण तेथून निघून विदुराचे घरीं आले.

दुसरे दिवशीं श्रीकृष्णास राजसभेमध्यें आणण्यासाठीं दुर्योधन, विदुर व शकुनी हे आले. सात्यकि व कृतवर्मा यांस बरोबर घेऊन श्रीकृष्ण विदुराचे घरांतून बाहेर पडले व रथांत बसून राजवाड्यांत आले. श्रीकृष्णाची स्वारी सभेमध्यें येतांच भीष्म धृतराष्ट्रादि सर्वजण त्यांचे सन्मानार्थ उभे राहिले. श्रीकृष्ण आपल्या आसनावर बसून चोहोंकडे शांतता झाल्यानंतर सर्वांचें लक्ष्य, आतां ते काय सांगतात, इकडे लागलें. सभेमधील गडबड बंद झाल्यानंतर मेघासारख्या गंभीर वाणीनें श्रीकृष्णानीं बोलण्यास आरंभ केला. ते म्हणाले:—

कुरूणां पांडवानां च शमः स्यादिति भारत ।
अप्रणाशेन वीराणामेतद्याचितुमागतः ॥

"हजारों वीरांचा नाश न होतां कौरव व पांडव यांचें सख्य व्हावें असें मागणें करण्यास मी येथें आलों आहे. धृतराष्ट्रा, पांडवांशीं सख्य केलें असतां कुरुकुलाचें व राष्ट्राचें संरक्षण कौरव पांडव मिळून करूं लागतील व त्यामुळें या कुलाचें वैभव फारच वृद्धिंगत होईल. पण सख्य न करतां जर तुम्ही युद्धाचा प्रसंग आणाल तर त्यांत कोणाचेंच हित नाहीं. युद्धामध्यें पांडवांचा किंवा कौरवांचा कोणाचाहि नाश झाला तरी तुझ्या सुखावर पाणी हें पडणारच आहे. लहानपणीं पांडवांचा पिता परलोकवासी झाल्यानंतर ज्या प्रेमानें तूं त्यांचें पालनपोषण केलेस त्याच प्रेमानें तूं सध्यां त्यांजशीं वर्तन कर. अटींप्रमाणें तेरा वर्षे वनवास व अज्ञातवास करून पांडवांनीं सत्य स्मरून आपलें कर्तव्य केलें आहे, धृतराष्ट्रा, तूंहि आतां आपलें कर्तव्य कर. पांडवांनीं तुला निरोप सांगितला आहे तो ऐक. 'तुम्हांला आम्ही आपल्या वडिलांचे जागीं मानून तुमच्या आज्ञेनें तेरा वर्षे आम्ही मुकाट्यानें हाल सोसले आहेत; आतां तुम्हीहि आम्हांशीं वडिलांस साजेल असेंच वर्तन ठेवा. आमचें आचरण जर धर्म व न्याय यांस विरुद्ध होत असेल तर आमची चूक आम्हांस दाखवा; व तुम्हीहि धर्माप्रमाणें व सत्याप्रमाणें वागा.' धृतराष्ट्रा, लहानपणापासून तुझ्या मुलांचें पांडवांशीं कसें वर्तन आहे,ते तूं ध्यानांत आण. द्यूत कसें झालें, द्रौपदीची कशी विटंबना झाली, पांडवांनीं आपलें कर्तव्य स्मरून वचन पाळण्यांसाठीं तेरा वर्षे कशीं हालअपेष्टेंत काढलीं, या सर्व गोष्टींचा विचार कर. कौरवांस या सर्व अपराधांची क्षमा करण्यास ते

आज तयार आहेत धर्माकरितां, न्यायाकरितां, सत्याकरितां निदान स्वतःच्या हितासाठीं, सुखासाठीं तरी, पांडवांना राज्याचा अर्धा भाग देऊन त्यांशीं सख्य करा; व एकमेकांचे वध करण्यासाठीं दोहोंपक्षांकडे जमलेल्या योद्धयांचा नाश होऊं देऊं नका. तुझ्या मुलांचे मनांत लोभाचें फारच प्राबल्य माजलें असून ते उच्छृंखल झाले आहेत, त्यांना आवरून धर.

**स्थिताः शुश्रुषितुं पार्थाः स्थिता योद्धुमरिंदमाः ।**
**यत्ते पथ्यतमं राजँस्तस्मिंस्तिष्ठ परंतप ।**

पांडवांविषयीं म्हणशील तर ते जसें युद्ध करण्यास तयार झालें आहेत, तसेंच ते तुझी सेवा करण्यासहि तयार आहेत. याउपर जो मार्ग तुला श्रेयस्कर व हितकारक वाटेल त्याचा स्वीकार कर. , श्रीकृष्णाचें हें गंभीर भाषण संपल्यानंतर कांहीं वेळ सर्व सभासद आश्चर्यानें अगदीं स्तब्ध राहिले. यानंतर तेथें आलेल्या अनेक ऋषींनीं **अभिमान, गर्व व लोभ, यांचे पायीं मनुष्याचा समूळ नाश होतो,** हें अनेक उदाहरणें देऊन दुर्योधनास सांगितलें. ' अभिमान व क्रोध सोडून देऊन श्रीकृष्णाचे व इतर आप्तांचे सांगण्याप्रमाणें पांडवांशीं सख्य कर. असाहि त्यांनीं उपदेश केला; परंतु तो सर्व व्यर्थ गेला. दुष्ट व दुराग्रहि दुर्योधनाचें मन वळविण्याचा श्रीकृष्णानींहि एकदा स्वतः प्रयत्न करून पाहावा, अशी धृतराष्ट्रानें विनंति केली. तेव्हां श्रीकृष्ण दुर्योधनाजवळ जाऊन सौम्यपणानें त्यास उपदेश करूं लागले:— ' दुर्योधना, तूं आपला हा दुराग्रह सोडून दे व पांडवांशीं सख्य कर. त्यांचें अर्धें राज्य त्यांना परत देऊन समेट करावा, असेंच धृतराष्ट्र, विदुर, भीष्म, द्रोण इत्यादिकांचें मत आहे. त्याप्रमाणें तूं वर्तावें, यांत सर्वांचें कल्याण आहे. **अधर्माचरण केलें असतां त्यापासून मोठी हानि होत असते.** तुझ्या दुराग्रहामुळें तुझे आप्त व मित्र आणि तुमच्या पक्षाचे राजे व्यर्थ प्राणास मुकतील. पांडवांशीं सख्य केल्यास ते धृतराष्ट्रास महाराज्य व तुला यौवराज्य देतील. कुरुकुल नामशेष होऊं नये व तुला लोकानीं ' कुलांगार ' म्हणूं नये, यासाठीं त्यांचें अर्धें राज्य त्यांना परत देऊन सख्य करावें, हें तुला उचित आहे. ' यानंतर भीष्म, विदुर, द्रोण, धृतराष्ट्र यांनींहि पुन्हां पुन्हां श्रीकृष्णाचे म्हणण्याप्रमाणें करण्याविषयीं दुर्योधनास परोपरीनें सांगितलें. परंतु त्यामुळें दुर्योधनाचें मन वळण्याऐवजीं त्यास राग मात्र

अधिक आला. तो म्हणाला:—, माझ्याकडे कोणताहि अपराध नसतां कृष्ण, विदुर, धृतराष्ट्र, द्रोण, भीष्म हे तुम्ही सर्व माझीच निंदा करितां यांस काय म्हणावें ? धर्मालाच द्यूत खेळण्याची हौस फार आहे; तेव्हां द्यूतामध्यें जर शकुनीनें त्याचें राज्य हरण केलें, तर त्याचा मजकडे काय दोष आहे ? द्रुपद राजाच्या व पांचाल सैन्याच्या आश्रयानें आम्हांस धमकी देऊन पांडव राज्य मागत आहेत. या त्यांच्या धमकीस भिऊन राज्य परत देणें माझ्यासारख्या मानी क्षत्रियाचें ब्रीद नव्हें. पांडवांपुढें मान लवविण्यापेक्षां युद्धामध्यें आह्मां सर्वांना रणभूमीवरील धुळीमध्यें मरण आलें, तरी त्याचा मला मुळींच विषाद अथवा दुःख वाटणार नाहीं. सुईच्या अग्रावर राहील एवढी मातीहि पांडवांना देण्यास मी तयार नाहीं; मग अर्ध्या राज्याची किंवा पांच गांवांची गोष्ट कशास पाहिजे ? मग याकरितां आमच्या कुरुकुलाचा, सर्व क्षत्रियांचा किंवा राष्ट्राचा जरी नाश झाला तरी हरकत नाहीं. दुर्योधनाचीं आर्जवें करणें व्यर्थ आहे, असें दिसल्यानंतर श्रीकृष्णांनीं आवेशानें उत्तर केलें:—' तुला रणांगणामधील धुळींत लोळण्याची इच्छा आहे काय ? ठीक आहे. तुझी ही इच्छा लवकरच पांडव पूर्ण करतील. द्यूतांत कपट करून राज्य हरण करणें, आपल्या भावजयीची भरसभेंत विटंबना करणें, भीमाला विष चारून नदींत बुडविणें, पांडवांना व त्यांच्या मातेला वारणावतास लाक्षागृहांत जाळूं पहाणें, असलीं दुष्ट कृत्यें करून, आपले अपराध कांहींच नाहींत, असें तुला वाटतें काय ?

**यच्चैभ्यो याचमानेभ्यो पित्र्यमंशं न दित्ससि ।**
**तच्च पाप प्रदातासि भ्रष्टैश्वर्यो निपातितः ॥**

" आमचें पितृपरंपरागत अर्धें राज्य परत दे ' अशी तुझी याचना पांडव करीत आहेत, तरी तूं तें देत नाहींस. पण युद्धामध्यें भ्रष्टवैभव होऊन जेव्हां तूं धुळीमध्यें लोळत पडशील, तेव्हां मात्र तें तुला मुकाट्यानें द्यावें लागेल, हें तूं पक्कें समज. श्रीकृष्णांनीं भरसभेंतील केलेला हा तिरस्कार ऐकून दुर्योधन उद्धटपणानें कांहीं एक उत्तर न देतां सभेंमधून उठून चालता झाला; व त्याचे मागून दुःशासनादि सर्व कौरवाहि निघून गेले. कौरवकुलाचा व सर्व क्षत्रियांचा होणारा भावी संहार टाळण्यासाठीं दुर्योधन, दुःशासन, कर्ण व शकुनि यांना कैद करून पांडवांचे स्वाधीन करावें, अशी मसलत श्रीकृष्णांनीं स्पष्टपणानें धृतराष्ट्रास सांगितली. धृतराष्ट्रानें शेवटचा उपाय म्हणून गांधारीस बोलावून आणून दुर्योधनाची समजूत

करण्यास सांगितलें. दुर्योधनास पुनः सभेमध्यें बोलावून आणल्यानंतर, गांधारीनें आपल्याकडून दुर्योधनास पुष्कळ सांगितलें; पण तिच्या बोलण्याकडे दुर्लक्ष्य करून तो पुन्हां सभेंतून उठून उद्धटपणानें चालता झाला ! ' धृतराष्ट्र, भीष्म, वगैरेंचे संमतीनें श्रीकृष्णानें आपणांस कैद करण्यापूर्वी आपणच श्रीकृष्णास बंदींत टाकावें; म्हणजे दांत पाडलेल्या सापाप्रमाणें पांडव तेव्हांच नरम येतील. ' असा दुर्योधन, दुःशासन, शकुनि व कर्ण या चांडाळचौकडीनें बेत केला. हा त्यांचा बेत चाणाक्ष सात्यकीस कळून आला; तेव्हां त्यानें तो धृतराष्ट्र, विदुर व श्रीकृष्ण यांना कळविला. श्रीकृष्णास बलात्कारानें कैद करणें म्हणजे लहान मूर्ख पोरांनीं पेटलेल्या अग्नीला आपल्या वस्त्रांनीं बांधण्यासारखेंच साहसाचें आहे, असें त्यानें धृतराष्ट्रास सांगितलें ! तेव्हां श्रीकृष्ण किंचित् हांसून म्हणालेः— 'राजा दुर्योधनाला जें काय करावयाचें असेल तें करूं दे. त्याचा हेतु मी सफल होऊं देणार नाहीं. रागानें मी कांहीं भलतेंच करीन, अशीहि शंका मनांत आणूं नको. दुर्योधनादिकांस पुनः सभेमध्यें बोलवून आणल्यानंतर 'श्रीकृष्णाचें सामर्थ्य व पराक्रम तुला माहीत नाहीं काय? त्यास कैद करण्याचा प्रयत्न करणें म्हणजे अग्नीमध्यें पतंगानें आपण होऊन जाऊन पडण्यासारखें आहे' इत्यादि प्रकारानें विदुरानें त्यास बोध केला. नंतर श्रीकृष्ण त्यास म्हणालेः—' दुर्योधना, मी येथें एकटा आहे असें समजून मला पकडून कैद करण्याचा तुझा विचार आहे. पण मी एकटा नाहीं; मजबरोबर पांडव, यादव व सर्व देवगणहि येथें आले आहेत, हें तुला मूढाला कोठें ठाऊक आहे ! असें म्हणून श्रीकृष्ण मोठ्यानें हांसले. तों त्यांचे शरीरांतून एकदम दिव्य तेज निघून विद्युद्रूपी देवगण बाहेर पडले! एकाएकीं चोहोंकडे अतिशय तेज फांकलें! श्रीकृष्णाचे एका बाजूस अर्जुन दुसरे बाजूस बलराम व मागले बाजूस चौघे पांडव याप्रमाणें उभे असलेले सर्वांस दिसले! हा चमत्कार पाहून सर्व सभासद कांहीं वेळ आश्चर्य करीत आहेत तों तें तेज, देवगण वगैरे सर्व नाहींसें झालें! श्रीकृष्णहि तेथून उठून बाहेर आपल्या रथाकडे निघाले. तेव्हां 'पांडवांविषयीं माझे मनांत पापबुद्धि नाहीं. पण दुर्योधन माझें ऐकत नाहीं, त्यास मी काय करूं?' असें धृतराष्ट्र त्यांचेजवळ येऊन म्हणाला. त्यास कांहींच उत्तर न देतां श्रीकृष्ण सभासदांस व कौरवपक्षाकडील राजांस उद्देशून म्हणालेः— 'सख्य करण्यासाठीं मी आलों असतां, मंद-

बुद्धि दुर्योधन सभेंतून रागानें व उर्मटपणानें कसा गेला व धृतराष्ट्रहि आपल्या पुत्रास आवरण्यास समर्थ नाहीं हें तोच सांगत आहे, त्यावरून तुम्हांस ठाऊक आहे, आतां युद्धावांचून दुसरा मार्ग उरला नाहीं! असें म्हणून श्रीकृष्ण सभेंतून बाहेर पडले. आधीं त्यांनीं कुंतीकडे येऊन तिला घडलेली सर्व हकीकत कळविली. 'तुमचा राज्यांतील अर्धा अंश जर दुर्योधन देत नाहीं, तर आतां क्षत्रियास उचित असें युद्ध करा; आणि माझें दुःख, द्रौपदीचा छळ व तुमचा अपमान यांचें स्वपराक्रमानें परिमार्जन करा,' असा निरोप तिनें पांडवांना कळविण्याविषयीं श्रीकृष्णास सांगितलें. नंतर श्रीकृष्ण आपल्या रथांत कर्णास घेऊन नगरांतून बाहेर पडले. ( उद्योगपर्व अ० ८७–१३७ )

इकडे भीष्म व द्रोण यांनीं पांडवांशीं सख्य व्हावें यासाठीं दुर्योधनास बोध करण्याचा पुनः प्रयत्न केला. द्रोणगुरु म्हणाले:—' आमचीं दोघांचींहि अंतःकरणें पांडवांकडे आहेत. अर्जुन तर मला अश्वत्थाम्याहूनहि प्रिय आहे. असें असून त्यांशीं आम्हांला युद्ध करावें लागणार आहे, हें केवढें दुर्दैव होय ! जन्मास येऊन जीं कर्तव्यें करावयाचीं तीं यथास्थित करून आम्ही कृतकृत्य झालों आहों. आमचे आतां या जगांतील दिवस थोडे राहिले आहेत. परंतु दुर्योधना, तूं तरुण आहेस; तुला राज्यसुख भोगावयाचें आहे. यासाठीं पांडवांबरोबर युद्ध करून सुख, राज्य, धन, आपले मित्र व शेवटीं पंचप्राण यांना मुकूं नको' वगैरे अनेकप्रकारें सांगितलें. परंतु भीष्म, धृतराष्ट्र, विदुर यांच्यासारख्या पूज्य वडील माणसांचें न ऐकणारा दुर्योधन गुरूस थोडाच मानणार!

या ठिकाणीं सहजच असा एक प्रश्न उद्भवतो कीं, पांडवांचे पक्षास न्याय, सत्य व श्रीकृष्ण यांचें पाठबळ असून शिवाय भीष्मद्रोणादिकांचीं मनें तिकडे ओढ घेत असतांहि त्यांनीं पांडवांच्या पक्षाकडे न जातां त्यांजवरच शस्त्र उचलिलें तें काय म्हणून? अर्जुनावर जर अश्वत्थाम्यापेक्षांहि द्रोणाचार्यांचें प्रेम अधिक होतें तर पांडवांशींच लढण्यास ते कसे सिद्ध झाले? धर्म काय, अधर्म कोणता, सत्य पक्ष कोणता आहे, हें सर्व जाणत असूनहि, भीष्म खोट्या पक्षाचे बाजूनें सत्पक्षावर शस्त्र उपसण्यास कां तयार झाले? सकृद्दर्शनीं भीष्म- द्रोणांचें हें कृत्य गैरशिस्त वाटण्याचा संभव आहे. पण थोडासा विचार केला

असतां असें कळून येईल कीं आणीबाणीच्या वेळीं त्यांची कर्तव्यनिष्ठा जितक्या पूर्णत्वानें दिसून आली तितकी इतर कोणत्याहि वेळीं दिसून आली नसेल. भीष्म, द्रोण हे धृतराष्ट्र व त्याचे पुत्र यांची एका दृष्टीनें सेवाच करीत होते व त्यांचें अन्न खात होतें. पांडवांनीं इंद्रप्रस्थास राज्य स्थापिलें तेव्हांच जर ते त्यांजकडे गेले असते तर गोष्ट निराळी होती. परंतु ते धृतराष्ट्र व दुर्योधन यांचे प्रजाजन होते, तसेंच त्यांचे योद्धे आणि मंत्री होते. त्यांनीं आपला जन्म त्यांचे सेवेंत घालविला होता. पांडवांशीं युद्ध करावें कीं सख्य करावें, याविषयीं मंत्री या नात्यानें योग्य ती सल्लामसलत देणें त्यांचें काम होतें. पण ती सल्लामसलत राजास पसंत न पडून युद्ध करावयाचें असें एकदां ठरल्यावर, न्याय व सत्य कोणत्या पक्षाकडे आहे हें पाहणें बरोबर नव्हतें. **राजासाठीं, स्वामीसाठीं व देशासाठीं लढणें हें क्षत्रियांचें कर्तव्य आहे**; व त्याप्रमाणें त्यांनीं, स्वतःचें मत बाजूस ठेवून, सर्व प्रसंगीं वागलेंच पाहिजे. भीष्मद्रोणांचें प्रेम, त्यांची भक्ति व त्यांचीं अंतःकरणें हीं श्रीकृष्ण व पांडव यांचेकडे ओढ घेत होती. परंतु या सर्व गोष्टी विसरून जाऊन आपलें शरीरसामर्थ्य, आपलें युद्धकौशल्य व आपली बुद्धिमत्ता आपल्या स्वामीसाठीं—दुर्योधनासाठीं—युद्धामध्यें खर्च करणें, हें त्यांचें कर्तव्य होतें. हें कर्तव्य करतांना खऱ्या पक्षावर शस्त्र उचलल्याबद्दल मनाला कितीहि दुःख झालें, अंतकरणास कितीहि पीळ पडला,—किंबहुना त्यामध्यें मरण आलें—तरी तिकडे लक्ष द्यावयाचें नाहीं, हेंच त्यांचे त्यावेळीं काम होतें. धृतराष्ट्र व दुर्योधन यांचे अन्नावर वाढलेल्या शरीराची त्यांचेसाठीं रणयज्ञांत आहुती देण्याचें त्यांनीं ठरविलें तें योग्यच केलें, हें वरील विवेचनावरून सहज दिसून येईल.

इकडे कर्ण आंत बसल्यानंतर श्रीकृष्णाचा रथ चालूं लागला. कांहीं वेळानें श्रीकृष्ण त्यास म्हणाले:—‘ कर्णा, तुझी खरी आई कुंती आहे. ती आपल्या माहेरीं असतांना कौमार्यावस्थेंत तूं तिला सूर्यापासून झाला आहेस. तेव्हां खरें पाहिलें असतां पांडु हा तुझा पिता असून पांडव हे तुझे धाकटे भाऊ आहेत. मी आतां तुला त्यांच्याकडे नेऊन तुझ्या जन्माची खरी हकीकत सांगतों. पांडव तुला आपला वडील भाऊ समजून सर्व राज्य तुलाच अर्पण करितील, व पुढेंहि त्या सर्वांचे मदतीनें तुला पृथ्वीचेंहि राज्य प्राप्त होईल. ’ श्रीकृष्णाचें हें भाषण ऐकून कर्णानें उत्तर केलें:—‘ श्रीकृष्णा, कुंती ही माझी माता व पांडुराजा पिता आहे हें मला माहीत आहे. पण मी जन्मतांच कुंतीनें माझा त्याग

केल्यानंतर आधिरथानें मला आपल्या घरीं नेलें. राधेनें बालपणांत आईप्रमाणें माझें संगोपन केलें व आधिरथानें माझें पुत्राप्रमाणें पालन करून, माझें शिक्षण, विवाह वगैरे केलें आहे. तारुण्यांत आल्यानंतर त्यांच्याच संमतीनें सूतज्ञातींतील स्त्रियांशीं मीं लग्नें केलीं आहेत. त्यांचेपासून मला मुलेंबाळें व नातूपणतूहि झाले आहेत. आजपर्यंत दृढ झालेलीं ही सर्व प्रेमबंधनें तोडून टाकून ऐन युद्धाचे वेळीं मला पांडवांकडे येतां येत नाहीं. दुर्योधनाचेंच आश्रयानें मी आजपर्यंत राहिलों आहे; त्यानेंच मला अंगदेशाचें राज्य देऊन गौरविलें आहे. अर्जुनाबरोबर युद्ध करून मी त्यास ठार करीन, या आशेवरच त्यानें युद्धास प्रारंभ केला आहे. **अशा वेळीं त्यास सोडून पांडवांचे पक्षास जाणें म्हणजे अतिशय नीच कृतघ्नपणा आहे.** युधिष्ठिर हाच राजा होण्यास सर्वथैव योग्य आहे, यांत बिलकूल शंका नाहीं. त्याला माझ्या जन्माची हकीकत कळवूं नका. नाहीं तर तो युद्धाहि करणार नाहीं. व राज्याचाहि स्वीकार करणार नाहीं. लवकरच सुरूं होणाऱ्या भयंकर रणयज्ञांत सर्व कौरवांची व क्षत्रियांची आहुति पडणार आहे, हें मीं जाणून आहे, पण अशा प्रसंगीं दुर्योधनास सोडून जाणें अधमपणाचें आहे. दुर्योधनास बरें वाटण्यासाठीं पांडवांना व द्रौपदीला जीं मी दुर्भाषणें बोललों, त्याबद्दल मला आतां पश्चाताप होत आहे. शेवटीं रणांगणामध्यें आह्मां सर्वांचा नाश होऊन सर्व क्षत्रियांचा उद्धार होवो, येवढीच श्रीकृष्णा, माझी आतां इच्छा राहिली आहे ' श्रीकृष्ण म्हणाले:—' माझ्या उपदेशाप्रमाणें पांडवांकडे तूं येत नाहींस, यामुळें तूं पृथ्वीच्या राज्यास मुकत आहेस. बरें तुझी मर्जी. पांडवांना या युद्धांत जय येणार हें खास आहे, असो आजपासून सात दिवसांनीं अमावास्या आहे. त्या दिवशीं युद्धास प्रारंभ होईल असें द्रोण, भीष्म, कृप आणि धृतराष्ट्र यांना कळीव. ' यानंतर कर्णानें श्रीकृष्णास मोठ्या प्रेमानें गाढ आलिंगन दिलें व त्यांचा शेवटचा निरोप घेतला. ' या महायुद्धांतून जर आम्ही जिवंत राहिलों तर तुझी आमची पुन्हां गांठ पडेल; नाहीं तर तुमची आमची यापुढें आतां स्वर्गांत भेट ! ' याप्रमाणें निरोप घेऊन खालीं उतरून कर्ण आपल्या रथांत बसून हस्तिनापुरास परत आला.

युद्धाची तयारी दोहोंपक्षांकडून सुरूं झाली आहे, हें कुंतीस समजतांच कर्णाकडे जाऊन व त्याला खरी हकीकत सांगून पांडवांचे पक्षास येऊन मिळण्याबद्दल त्याचें मन वळवावें, असें तिच्याहि मनांत आलें. दैववशात् तिची व त्याची भागिरथी नदीवर गांठ पडली. तिला पाहतांच कर्णानें ' हा

राधापुत्र तुला नमस्कार करीत आहे ' असा नामोच्चारपूर्वक नमस्कार केला. तेव्हां तूं राधापुत्र नसून कुंतीपुत्र आहेस, असें म्हणून त्यास तिनें त्याच्या जन्माची खरी हकीकत सांगितली. ती म्हणाली:—'कर्णा, तूं व अर्जुन हे युद्धामध्यें शत्रूसारखे भिडण्यापेक्षां भाऊ भाऊ म्हणून तुमचा जर समागम होईल, तर किती तरी चांगलें होईल. तूं सूत नसून पार्थ आहेस; तर कौरवांकडे राहण्यापेक्षां आपल्या पांच भावांना जाऊन मिळशील तर तें अधिक शोभेल.' यानंतर आकाशवाणीचे रूपानें सूर्यानेहि, कुंतीचें भाषण खरें आहे, तूं पांडवांकडे जा; असें सांगितलें. कौमार्यावस्थेमध्यें कुंतीनें मूर्खपणाच्या जिज्ञासेनें सूर्यास बालावल्यामुळें आपली उत्पत्ति झाली; आपण उपजतांच आपणांस हिनें निर्दयपणानें टाकून दिलें, व आतां मात्र युद्ध होण्याची वेळ आली असतां कुंती आपणास पांडवांस जाऊन मिळण्यास सांगत आहे; या तिच्या निष्ठुरपणाबद्दल व आप्पलपोटेपण बद्दल कर्णानें तिला दोष दिला. तो म्हणाला:—''आजपर्यंत सूत असा माहीत असून ऐन युद्धाचे वेळीं ' मी पांडवांचा खरा भाऊ आहे ' असें म्हणून जर त्यांचेकडे गेलों तर सर्व क्षत्रिय मला काय म्हणतील याचा विचार कर. माझ्या संबंधानें कौरवांची जी इच्छा आहे, तीच तडीस नेण्यास मला झटलें पाहिजे. आजपर्यंत ज्यांनीं ज्यांनीं दुर्योधनाचें अन्न खाल्लें त्यांनीं त्यांनीं त्याचें चीज करून दाखविण्याची हीच वेळ आहे. ही संधि प्राण गेला तरी मी व्यर्थ जाऊं देणार नाहीं. तथापि तुझी माझी जी ही भेट झाली ती मी अगदींच निष्फळ होऊं देणार नाहीं. धर्म, भीम, नकुल व सहदेव यांचा मी युद्धामध्यें वध करणार नाहीं. परंतु अर्जुनाशीं मात्र, त्याचा किंवा माझा वध होईपर्यंत मी युद्ध करणार, यांत संशय नाहीं. युद्धानंतर अर्जुन किंवा कर्ण यांपैकीं एक नाहींसा होऊन तुझे पांच पुत्र कायम राहतील, असें मी वचन देतों. ' येवढ्या वचनानें कुंतीचें समाधान होऊन ती विदुराचे घरीं परत आली. ( उद्योगपर्व अ० १३८–१४६ )

इकडे पांडव अजून विराटाचे मत्स्यदेशाच्या सरहद्दीजवळच्या उपप्लव्य नगरांतच होते. श्रीकृष्णांनीं तेथें जाऊन कौरवसभेमध्यें झालेली सर्व हकीकत युधिष्ठिरास कळविली. पराक्रमी कुरुकुलाच्या या दोन शाखांमध्यें सख्य होऊन युद्धामुळें होणारा भयंकर क्षत्रियनाश व कुलक्षय टळावा, या हेतूनें श्रीकृष्णांनीं व इतरांनीं केलेले प्रयत्न याप्रमाणें निष्फळ झाले; कौरवपक्षांकडील ११ अक्षौहिणी सैन्याचा कुरुक्षेत्रांत पूर्वीच तळहि पडला होता; तेव्हां आतां यापुढें युद्धांवाचून दुसरा मार्गच राहिला नाहीं. पांडवांचे पक्षास एकंदर ७ अक्षौहिणी सैन्य

जमलें. पांडवांनीं द्रुपद, विराट, धृष्टद्युम्न, शिखंडी, सात्यकि, चेकितान व भीम या सात योद्ध्यांना ७ अक्षौहिणींचे सेनापति केलें. सर्व सैन्याचा मुख्य सेनापति कोणी व्हावें,: याबद्दल भवति न भवति होऊन श्रीकृष्णांनीं द्रौपदीचा भाऊ धृष्टद्युम्न ह्यास मुख्य सेनापति नेमावें असें सुचविलें. तें सर्वांस पसंत पडून त्यास सेनापतीचा अभिषेक करण्यांत आला. कौरवांकडील ११ अक्षौहिणींचें आधिपत्य भीष्मांनीं स्वीकारावें, अशी दुर्योधनानें विनंति केली. कर्ण नेहमीं मजशीं स्पर्धा करीत असतो; माझ्यासारखा वीर नाहीं, अशी त्यास घमेंड आहे. यासाठीं त्याला किंवा मला कोणालातरी एकट्याला प्रथम लढण्याची संधि मिळत असेल तर सेनापति होण्यास मी तयार आहें असें भीष्मांनीं उत्तर दिलें. कर्णासहि तेंच पाहिजे होतें. शल्य, शकुनि, जयद्रथ, कृतवर्मा वगैरे दहा महारथींस १० अक्षौहिणींचे सेनापति नेमून भीष्म स्वतः पांढरें चिलखत चढवून व पांढरा फेटा बांधून अकराव्या कौरव अक्षौहिणीचे सेनापति झाले. इकडे द्रौपदी, इतर राजस्त्रिया व दासदासी यांस बंदोबस्तानें उपप्लव्य नगरांतच ठेवून तेथून पांडवांचें सैन्य निघालें, व थोडक्याच दिवसांत कुरुक्षेत्रांचे रणभूमींत दाखल होऊन त्यानें आपला तळ दिला. कौरव-सैन्यहि हस्तिनापुरांतून पूर्वींच बाहेर पडून कुरुक्षेत्रांत येऊन डेरे-दाखल झालें होतें. पांडवसैन्याचें तोंड पूर्वेस असून कौरवांचें पश्चिमेकडे होतें. दोहोंपक्षाकडील छावणींत हत्तींच्या गर्जना, घोड्यांचें खेकाळणें, योद्ध्यांचे सिंहनाद, धनुष्यांचा टणत्कार आणि भेरी, नगारे, शंख इत्यादिकांचा गंभीर ध्वनि यांचा एकच प्रचंड कोलाहल होऊन सर्व कुरुक्षेत्र दुमदुमून राहिलें. * ( उद्योगपर्व अ० १४७-१९६ )

---

* या भयंकर युद्धामध्यें बळराम व रुक्मी यांजखेरीज त्या काळचे इतर सर्व बलाढ्य क्षत्रिय वीर सामील झाले. बलरामाचा ओढा दोहोंपक्षाकडे सारखाच असून दुर्योधन व भीम हे त्याचे सारखेच शिष्य होते. यासाठीं व पुढील युद्धात होणारा नाश पाहावयास नको म्हणून बळराम तीर्थाटनास गेले! रुक्मी हा फार पराक्रमी असून गांडीव व शार्ङ्ग या दिव्यधनुष्यांच्या तोडीचें इंद्राचें विजय धनुष्य त्यास मिळालें होतें. भारतीय युद्धांत सामील होण्यसाठीं तो सैन्य घेऊन आला होता. परंतु तो फार घमेंडखोर व गार्विष्ठ असल्यामुळें त्याची कुमक दोनहि पक्षांनीं नाकारली!

# प्रकरण सातवें.

## युद्धाचा पूर्वभाग



कुरुक्षेत्राचे मैदानांत दोन्ही सैन्यांचे तळ पडल्यानंतर, भगवान् व्यास ऋषि धृतराष्ट्राकडे आले. युद्धचमत्कार पाहण्याची इच्छा असल्यास मी तुला तेवढ्यापुरती दृष्टि देतों, असें ते म्हणाले. परंतु बहुतेक जन्म आंधळेपणांत घालवून, शेवटीं ज्यांत आपल्या सर्व ज्ञातीचा नाश होऊन कुलक्षय होणार तें युद्ध पाहण्यासाठीं तेवढी दृष्टि यावी, अशी त्यास इच्छा नसल्यामुळें, युद्धाची इत्थंभूत हकीकत मात्र आपणांस ऐकण्यास सांपडावी, अशी धृतराष्ट्रानें आपली उत्कंठा प्रदर्शित केली. तेव्हां व्यासांनीं संजयास दिव्यदृष्टि देऊन 'युद्धामध्यें व रणभूमीवर दिवसां किंवा रात्रीं प्रत्यक्ष किंवा गुप्तपणानें जें जें काय घडेल तें तें तुला समजेल,' असा त्यास वर दिला; व युद्धाची सर्व हकीकत दररोज धृतराष्ट्रास सांगण्याचें काम संजयानें पत्करलें. युद्धामध्यें जय कोणास मिळणार याविषयीं व्यासानीं अर्थात्, यतो धर्मस्ततो जयः **जिकडे धर्म तिकडे जय** असाच अभिप्राय दिला. ( भीष्मपर्व अ० १–२५)

इकडे कुरुक्षेत्रांतील रणभूमीमध्यें दोन्ही सैन्यें युद्धास तयार होऊन समोरासमोर उभीं राहिलीं. अनेक वर्षें ज्याविषयीं अत्यंत उत्कंठा वाटत होती तें युद्ध करण्यासाठीं आपल्या रथावर चढण्यापूर्वीं अर्जुनानें श्रीकृष्णाचे सांगण्यावरून भक्तिपूर्वक दुर्गेची स्तुति करून गांडीव धनुष्य हातांत घेतलें व नंतर तो रथावर चढला दोहों सैन्यांमध्यें शंख, नगारे, दुंदुभी इत्यादिकांचे ध्वनि व वीरांचे सिंहनाद सुरू झाले. श्रीकृष्णांनीं अर्जुनाचा रथ दोहों सैन्यांमध्यें आणून उभा केला. भोंवतालच्या सैन्यांकडे दृष्टि फेकल्यावर अर्जुनाचे हृदयांत निराळेंच विकार उद्भवून त्याचें मन माघार खाऊं लागलें. आपल्या शत्रूंच्या किंवा मरणाच्या भीतीमुळें त्याचें धैर्य खचलें असें नव्हे; पण आपले इष्टमित्र, नातेवाईक लहानपणचे जिवलग स्नेही, भीष्मासारखे पितामह, द्रोण–कृप यांजसारखे गुरु, कौरवांसारखे भाऊबंद, द्रुपद–विराटासारखे संबंधी राजे आणि



' न योत्स्य ' मी युद्ध करीत नाही, असें त्यानें श्रीकृष्णास सांगितलें. [ पृ. १८१

आर्यावर्तांतील इतर शूर योद्धे व क्षत्रिय यांचा यःकश्चित राज्याकरितां आपले हातून संहार होणार, हें ध्यानांत येऊन त्याचें मन कचरूं लागलें. भूलोकींच्या राज्यासाठीं तर काय पण त्रैलोक्याचे राज्यासाठींहि आपल्या कुलाचा संहार करणें महापातक होय, असें वाटून ' न योत्स्ये ' ( मी युद्ध करीत नाहीं ) असें श्रीकृष्णांस सांगून त्यानें हातांतील धनुष्यबाण खालीं ठेवले! तेव्हां श्रीकृष्णांनीं जो उपदेश करून त्याचा मोह व भ्रांति हीं दूर केलीं आणि निर्भयपणें स्वकर्तव्य करण्यास तयार केलें, तो भाग **भगवद्गीता** या नांवानें प्रसिद्ध आहे. ते म्हणाले:— ' **भीष्मादि पूज्य वडील माणसें व इतर आप्त** आपले हातून मरणार ही तुझी चुकीची समजूत आहे. **तूं मी, भीष्म व** हे सर्व राजे आत्मस्वरूपानें भूतकालीं सदैव अस्तित्वांत होतों व लौकिकीं मरणानंतर भविष्यत्कालींहि असूं. आपणांतील मुख्य तत्त्व जो आत्मा तो कोणाला मारीत नाहीं व स्वतःहि मरत नाहीं; किंवा त्याजवर दुसरा कोणताहि परिणाम होत नाहीं. जुनीं वस्त्रें टाकून मनुष्य जशीं इच्छेनुरूप नवीं वस्त्रें धारण करतो, त्याप्रमाणें मरण म्हणजे आत्म्यानें कर्मानुसार एक देह टाकून दुसरा धारण करणें होय. यांत दुःख करण्याचें कारण काय आहे? तथापि हा नेहमीं मरतो व जन्मतो असें जरी मानलें तरी, जो जन्मला त्यास मृत्यु व जो मेला त्यास जन्म हीं अपरिहार्य असल्यामुळें त्याबद्दल शोक करून काय उपयोग आहे? जन्मापूर्वी हा देह अव्यक्त स्वरुपांतच होता व मरणानंतरहि त्याच स्थितींत जाणार; तर मग ही मधली थोडा वेळ टिकणारी स्थिती जर संपूं लागली तर शोक कां करावा? आपला स्वतःचा धर्म—स्वकर्तव्य—पाहाशील तरीहि असा शोक करून युद्ध टाळणें बरोबर नाहीं, हें तुला कळेल. **न्यायानें केलेल्या युद्धाहून दुसरी श्रेयस्कर गोष्ट क्षत्रियांस कोणतीच नाहीं.** प्रयत्नाशिवाय सहजगत्या उपस्थित झालेलें **हें युद्ध म्हणजे स्वर्गाचें उघडलेलें दारच आहे. असें धर्ममूलक युद्ध भाग्यशील क्षत्रियांनाच मिळत असतें.** ही संधि तूं फुकट घालवूं नको. हें धर्मयुद्ध जर तूं करणार नाहींस तर स्वधर्म व किर्ति यांचा नाश होऊन तुला पाप मात्र लागेल; तुझी अक्षय्य अपकीर्ति होऊन ती निरंतर लोक सांगतील. **मानी पुरुषास मरणापेक्षांहि अपकीर्तीचें भय अधिक वाटतें.** जे तुला आजपर्यंत मोठा योद्धा मानीत होते' त्यांना, तूं भिऊन युद्ध टाळलें, असें वाटून त्यांच्या दृष्टीनें तूं भ्याड ठरशील. दुर्योधनादि तुझे शत्रु तूं निर्बल आहेस असें जाणून

तुझी निर्भर्त्सना व उपहास करतील; यापेक्षां दुसरी आधिक दुःखाची कोणती गोष्ट आहे ? **युद्ध करणें हें क्षत्रियाचें कर्तव्य आहे.** व या युद्धांत न्याय, धर्म व सत्य आपले पक्षास आहे. यासाठीं तें करतांना कोणाचा व कितीहि नाश झाला तरी त्याचा दोष तुजकडे नाहीं. सुखदुःख, लाभहानि, जयापजय यांविषयीं हर्ष–विषाद न मागतां व फलाची अपेक्षा न धरतां कर्तव्य म्हणून युद्ध केलेंस तर त्याचें पातक तुजकडे मुळींच नाहीं. अरे युद्धांत मरण पावलास तर स्वर्गसुख भोगशील, जय मिळाला तर राज्यसुख संपादशील; यासाठीं ही भ्रांति सोडून दे आणि उठून युद्धास प्रारंभ कर. ' इत्यादि उपदेशानें सर्व मोह नष्ट झाल्यानंतर अर्जून पुन्हां युद्ध करण्यास तयार झाला. ( भीष्मपर्व अ० २५–४२ )

आतां दोहों पक्षांचीं सैन्यें युद्ध करावयास भिडणार इतक्यांत एक चमत्कारिक गोष्ट घडून आली ! धर्मराजानें आपली शस्त्रें व कवच रथांत ठेविलें, व तो पायीच कौरवांच्या सैन्याकडे निघाला. निःशस्त्र होऊन धर्म कौरव सैन्याकडे कां जात आहे, हें पांडवांना व त्यांच्या पक्षाकडील इतर राजांना कांहींच कळेना ! अर्जुन, भीम, नकूल, सहदेव, श्रीकृष्ण व त्यांचे पक्षाकडील प्रमुख राजे धर्मराजाचे पाठोपाठ निघाले. आपल्या भावांसह धर्म कौरवांकडे येत आहे. हें पाहून ' अरे, हा अगदीं भित्रा आहे. क्षत्रिय असूनहि युद्ध न करतां हा शस्त्रें खालीं ठेवून कौरवांस शरण येत आहे ' याप्रमाणें कौरवांकडील योद्धे आपसांत त्याचा धिःकार करूं लागले. धर्म प्रथमतः थेट भीष्मांकडे गेला, व त्यांचे चरणावर मस्तक ठेवून नम्रपणानें म्हणालाः— आजोबा, मी तुम्हांस नमस्कार करतों; आम्ही तुम्हांशीं युद्ध करीत आहों, याबद्दल आम्हांस तुमची अनुज्ञा असावी व आम्हांस आपण आशीर्वाद द्यावें. ' वृद्ध व वडील माणसांविषयींची धर्माच्या अंतःकरणांतील ही पूज्यबुद्धि पाहून भीष्मांस संतोष वाटला व त्यांनीं त्यास वर देऊं केलाः—' द्रव्याच्या योगानें मी कौरवांचे पक्षास बांधला गेलों आहें; युद्धावांचून दुसरा कोणताहि वर माग. ' भीष्मांचा वध कसा होईल व त्यांना युद्धांत कसें जिंकावें, याविषयींची मसलत आपणास सांगण्याविषयीं त्यानें भीष्मांसच विनंति केली ! तेव्हां ते म्हणालेः—' मी जोंपर्यंत शस्त्र घेऊन लढत आहें, तोंपर्यंत मला जिंकण्याचें किंवा माझा वध करण्याचें कोणासहि सामर्थ्य नाहीं. पुन्हां केव्हां तरी भेटावयास ये, म्हणजे याविषयींचा उपाय मी तुला सांगेन. ' हें ऐकून धर्मराजानें द्रोणगुरूंकडे जाऊन त्यांसहि नमस्कार केला. त्यांनींहि संतोषित

होऊन वर देऊं केला असतां धर्मानें भीष्माप्रमाणेंच द्रोणगुरूंसहि प्रश्न केला. तेव्हां ' एकाद्या मनुष्याच्या तोंडून दुष्ट वार्ता ऐकल्यामुळें मी शस्त्रें खालीं ठेवून समाधि लावून बसेन, त्यावांचून इतर वेळीं कोणासहि माझा वध करतां येणार नाहीं. ' असें त्यांनीं सांगितलें. यानंतर युधिष्ठिर कृपाचार्य व शल्य यांजकडे गेला; आणि त्यांस नमस्कार करून व त्यांचे आशीर्वाद घेऊन तो पांडवांसह आपल्या सैन्याकडे परत फिरला. कौरवांचे सैन्यांतून परत येऊन दोहों सैन्यांचे मध्यें उभें राहून, ' युद्धामध्यें आम्हांस मदत करण्यासाठीं ज्याला आमच्या पक्षाकडे येणें असेल त्यानें यावें ' असें धर्मानें म्हटलें. तेव्हां ' युयुत्स ' कौरवांचा पक्ष सोडून पांडवांकडे आला; त्यास घेऊन पांडव आपल्या सैन्यांत येऊन पोंचले. ( भीष्मपर्व अ० ४३ )

नंतर उभय पक्षांच्या सैन्यांमध्यें भेरी, मृदंग, शंख. दुंदुभि इत्यादिकांचे गंभीर ध्वनि व हत्ती, घोडे वगैरेचें ओरडणें, यांचा मोठाच कल्होळ सुरू झाला. त्या दिवसाच्या तिसरे प्रहरीं दोन्हीं सैन्यें एकमेकांस भिडलीं; व एका क्षणांत सर्व रणभूमीवर भीष्म व अर्जुन, सात्यकी व कृतवर्मा, भीम व दुर्योधन, युधिष्ठिर व शल्य याप्रमाणें महान् योद्ध्यांचे रथ एकमेकांस येऊन थडकले; व सर्व कुरुक्षेत्रावर भयंकर रणकंदन माजून राहिलें! याप्रमाणें युद्ध चाललें असतां भीष्मांपुढें कोणाचाच टिकाव लागेना. प्रथमतः शल्यानें शक्ति फेकून विराटाचा पुत्र उत्तर याचा वध करून त्याची या महारणयज्ञकुंडांत पाहिली आहुति दिली! आपल्या भावाचा वध झालेला पाहून श्वेत शल्यावर चाल करून गेला. त्या दोघांचें बराच वेळ युद्ध होऊन शल्य रथामध्यें मुर्च्छित पडला. नंतर भीष्म श्वेतावर चालून आले व या दोघांचेंहि पुष्कळ वेळ निकराचें युद्ध होऊन शेवटीं त्यांत भीष्मांच्या ब्रह्मास्त्रयुक्त बाणानें रणामध्यें श्वेत मरून पडला! हें पाहून कौरवांच्या सैन्यांत आनंदाचा प्रचंड जयघोष झाला. इतक्यांत संध्याकाळ झाल्यामुळें दोन्ही सैन्यें युद्ध बंद करून आपापल्या शिबिरांत परत आलीं. ( भीष्मपर्व अ० ४४–४८ )

दुसरे दिवशीं सकाळीं पुन्हा युद्धास प्रारंभ झाला. आरंभींच भीष्मांनीं पांडवांकडले सर्व सैन्य आपल्या बाणांनीं अगदीं जर्जर करून सोडल्यामुळें तें पराभूत होऊन पळूं लागलें. हें पाहून श्रीकृष्णांनीं अर्जुनाचा रथ भीष्मांचे रथास नेऊन भिडविला; व या दोघां वृद्ध–तरुण वीरांचें घनघोर युद्ध सुरूं झालें.

भोंवतालीं दोहोंपक्षांकडील योद्धयांचा संग्राम चाललाच होता. भीमानें कलिंग सैन्यावर चाल करून कलिंगाचा वध केला. भीमसेन आपल्या गदेनें सर्व कलिंग सैन्याचा संहार करीत असलेला पाहून, भीष्मांनीं अर्जुनास इकडेच सोडून आपला रथ तिकडे नेला. सात्यकीहि भीमाचे साह्यास आला. भीमानें आपल्या गदेनें भीष्माचा सारथि ठार केल्याबरोबर त्यांच्या रथाचे घोडे अनावर होऊन त्यास रथासह रणांतून घेऊन गेले. इकडे दुर्योधनादि वीरांनीं एकट्या अभिमन्यूस गांठून त्याजबरोबर युद्ध चालविलें होतें. त्याच साह्यास जाऊन अर्जुनानें सर्व कौरव सैन्याचा संहार चालविला. त्याच्या बाणामुळें जर्जर झालेलें तें सैन्य दशादिशा पळत सुटलें. तों सूर्य अस्तास गेल्यामुळें युद्ध बंद होऊन दोहोंपक्षांकडील सर्व योद्धे शिबिरास परत आले. ( भीष्मपर्व अ० ४९–५५ )

तिसरे दिवशीं सकाळीं कौरवांनीं सैन्याचा गरुडव्यूह व पांडवांनीं अर्धचंद्रव्यूह रचून युद्ध सुरू केलें. भीष्मांच्या बाणवृष्टीपुढें पांडवांकडील सैन्याचा कांहींच उपाय चालेना. तेव्हां अर्जुनानें पुन्हां सरसावून कौरवसैन्यावर आपला रथ घातला व त्यांचा फडशा उडविला. याप्रमाणें एकदां कौरव सैन्य व एकदां पांडव सैन्य विजयीं आणि पराभूत होऊं लागलें. तेव्हां अशा संकुल युद्धानें लढाईचा शेवट लागत नाहीं, असें पाहून श्रीकृष्णांनीं अर्जुनाचा रथ भीष्माचे रथास भिड-विला व दोघांचें द्वंद्वयुद्ध सुरू झालें. भीष्मांकडून जरी अर्जुनावर अत्यंत तीक्ष्ण बाणांचा सारखा वर्षाव होत होता, तरी तो क्षत्रियाचें कर्तव्य विसरून भीष्मांशीं किंचित सौम्यपणानें युद्ध करीत होता. हें पाहून अर्जुनाच्या मनास चेव आणण्या साठीं श्रीकृष्ण स्वतःच हातांत चक्र घेऊन व रथावरून खालीं उतरून भीष्मावर चाल करून गिघाले ! आपला वध करण्यासाठीं स्वतः श्रीकृष्णच आपणावर चालून येत आहेत, यांत श्रीकृष्णानीं आपणांस मोठाच मान दिला, असें वाटून भीष्म म्हणाले:–' श्रीकृष्णा ये व मला आपल्या हातानें ठार कर. तुझ्या हातून माझा वध झाल्यास त्यापासून माझें इह-परलोकीं कल्याणच होणार आहे. ' आपली प्रतिज्ञा खोटी करून आपणास लाजविण्यासाठीं श्रीकृष्ण भीष्मांचे रथाकडे जात आहेत हे पाहून, अर्जुनानें रथांतून खालीं उडी टाकून श्रीकृष्णास धरिलें. ' मी आतां मनापासून निकरानें युद्ध करतों. माझे पुत्र व बंधु यांची शपथ घेऊन मी सांगतों कीं, मी आतां तुंबळ युद्ध करून कौरवांचा नाश करतों. ' याप्रमाणें

अर्जुनानें सांगितल्यावर श्रीकृष्ण रथांत येऊन बसले; व पुन्हां युद्धास सुरवात झाली. तें युद्ध तसेंच संध्याकाळपर्यंत चालून सूर्य अस्तास गेल्यावर सर्व सैन्य आपापल्या छावण्यांत परत आले. ( भीष्मपर्व अ० ५६–५९. )

चवथे दिवशींहि भीष्म व अर्जुन, सात्यकि व भूरिश्रवा, भीम व दुर्योधन याप्रमाणें निकरांची द्वंद्वयुद्धें सुरू झालीं. धृष्टद्युम्न व सांयमनि राजाचा पुत्र यांचें युद्ध होऊन धृष्टद्युम्नानें राजपुत्रास गदेनें ठार करून रणभूमीवर पाडिलें. संध्याकाळपर्यंतच्या पुढील युद्धामध्यें भीमानें अतिशय पराक्रम करून शत्रूंचा पुष्कळ नाश केला. सूर्यास्तानंतर युद्ध बंद होऊन दोनहि सैन्यें शिबिरांत परत आलीं. पांचव्या दिवशीं महारथ्यांचीं सारखीं द्वंद्वयुद्धें न होतां प्रसंग पडेल त्याप्रमाणें उभयपक्षांचे वीर लढत होते, व जरूर पडेल तेव्हां आपल्या बाजूच्या रथ्यांस साहाय्य करण्यास जात होते. याप्रमाणे रणभूमीवर सायंकाळपर्यंत संकुल युद्ध चालल्यावर सात्यकीचे दहा पुत्र व भूरिश्रवा यांचें घनघोर युद्ध झालें. त्यांत अखेर भूरिश्रव्यानें सात्यकीच्या दहाहि पुत्रांचीं शिरकमळें बाणांनीं उडविलीं! सहाव्या दिवशींहि असेंच तुंबळ युद्ध चालू असतां दुर्योधन व भीम यांचे रथ एकमेकांस भिडले; तेव्हां भीमानें एका बाणानें त्याचें छत्र व दुसऱ्या बाणानें त्याचा ध्वज मोडून धुळींत लोळविला, व तिसऱ्या बाणानें त्यास मूर्च्छित करून रथांत पाडलें! सातवे दिवशीं संकुल युद्ध न होतां उभय पक्षांतील बरोबरच्या वीरांनीं आपलें रथ शत्रूच्या रथांस भिडवून सायंकाळपर्यंत द्वंद्वयुद्धें केलीं, त्यांत कोणत्याहि पक्षास विशेष जय आला नाहीं, व दोहों पक्षांकडील कोणी मोठा वीरहि पडला नाहीं. सायंकाळचे सुमारास पांडवांकडील सर्व मुख्य महारथ्यांनीं भीष्मांवर एकदमच रथ घातले; तरी भीष्मांचें शौर्य व पराक्रम त्या सर्वांस पुरून उरला. अखेर पांडवांनीं शिखंडीस पुढें करून भीष्मांस दुसरीकडे जावयास लावलें. ( भीष्मपर्व अ० ६०—८६ )

आठवे दिवशींहि मोठें निकराचें युद्ध होऊन एकट्या भीमानें धृतराष्ट्राचे पुत्र सुनाभ, अपराजित, कुंडधार, पंडित, विशालाक्ष, महोदर, आदित्यकेतु, बव्हाशी इत्यादिकांस ठार केलें. कौरवांकडील आर्षशृंगी नांवाचा राक्षस व अर्जुनाचा इरावान् नांवाचा एक पुत्र यांचें युद्ध होऊन शेवटीं राक्षसानें आपल्या शत्रूचें शीर तरवारीनें उडविलें. यानंतर पांडवांकडील राक्षसवीर घटोत्कच व कौरवांकडील राक्षससैन्य यांचें युद्ध होऊन त्यांत घटोत्कचानें शत्रुसैन्यास पराभूत

केलें. त्यादिवशीं कौरवांकडील योद्धा भगदत्त यानेंहि पराक्रम करून पांडवांकडील बरेंच सैन्य ठार केलें. ( भीष्मपर्व अ० ८७--९६ )

भीष्म--द्रोणांसारखे योद्धे अकरा अक्षौहिणी सैन्यांसह आठ दिवस लढत असूनसुद्धां पांडवांकडील एकहि महारथी पडला नाहीं, हें पाहून दुर्योधनास चिंता उत्पन्न झाली. त्यानें कर्णाची गांठ घेऊन याबद्दल मसलत केली. भीष्म, द्रोण, कृप, शल्य, व सोमदत्त यांचा ओढा वास्तविक पांडवांकडे असल्यामुळें ते मनापासून युद्ध करीत नसावेत किंवा पांडवांस जिंकण्याचें त्यांचें अंगीं सामर्थ्य तरी नसावें; यांवांचून युद्धांतील त्यांच्या धरसोडीचें तिसरें कारण संभवत नाहीं, असें या दोघांचें मत झालें. कसेंहि करून तूं भीष्मांस युद्ध सोडून देण्यास लावून मग पांडवांचा वध करण्याचें काम मजकडे सोंपीव; म्हणजे माझा पराक्रम तुला कळून येईल ' अशी कर्णानें त्यास भर दिली. तेव्हां दुर्योधन भीष्मांकडे जाऊन म्हणालाः—' तुमच्या भरंवशावर आम्हीं पांडवांशीं युद्ध सुरू केलें असूनहि अजून आपण कांहींच पराक्रम केला नाहीं. पांडवांचा वध करण्याच्या कामीं तुमचा दयाळू स्वभाव किंवा माझें दुर्दैव आड येत असेल, तर कर्णाला परवानगी द्या; तो पांडवांचा समाचार घेईल. ' हें बोलणें ऐकून भीष्मांस आपल्या परवशतेबद्दल व दुर्योधनाच्या कृतघ्नतेबद्दल दुःख व संताप आला. अर्जुनाच्या पराक्रमाची आणि गोग्रहण वगैरे प्रसंगीं दिसून आलेल्या घमेंडखोर कर्णाच्या पराक्रमाची आठवण देऊन प्राण जाईपर्यंत निकरानें युद्ध करण्याचें वचन देऊन भीष्मांनीं दुर्योधनास वाटेस लावलें.

नववे दिवशीं युद्धाचा प्रकार पूर्वीच्या दिवसांहूनहि निकराचा झाला. दोनप्रहरपर्यंतच्या युद्धांत भीष्म, अभिमन्यु, कौरवांकडील अलंबुष राक्षस यांनीं पुष्कळ [पराक्र]म केला. दोन प्रहरानंतर युद्ध अधिक निकरानें होऊं लागलें. कौरवांकडील द्रोण, सुशर्मा वगैरे योद्धयांनीं व पांडवांकडील अर्जुन वगैरे महावीरांनीं [...]ना सैन्याचा सारखा संहार चालविला. संध्याकाळचे सुमारास श्रीकृष्णांनीं निकरानें लढण्याविषयीं अर्जुनास इशारत करून, त्याचा रथ [...] घातला. या युद्धांतहि भीष्मावर बाणांची वृष्टि करण्यास अर्जुन [ला]गतांच, स्वतः श्रीकृष्ण हातांत फक्त चाबूक घेऊन भीष्मांचे [...] तेव्हां भीष्मांनीं

[ए]हि पुंडरीकाक्ष देवदेव नमोस्तु ते ।
हरस्व यथेष्टं वैदासोऽस्मि तव चानघ ॥

याप्रमाणें मोठ्या आनंदानें व उत्सुकतेनें म्हटलें. इतक्यांत अर्जुनानें मागून येऊन श्रीकृष्णास परत रथाकडे नेलें. 'श्रीकृष्णा, तूं जी प्रतिज्ञा केली आहेस ती मोडूं नको. प्रतिज्ञा मोडून तूं युद्ध करशील तर लोक तुला असत्यवादी म्हणतील; व त्याचा सर्व दोष मजकडे येईल. श्रीकृष्णा, मी आपल्या शस्त्रांची, सत्याची व माझ्या सत्कृत्यांची शपथ घेऊन सांगतों कीं, मी आतां शत्रूंशीं निकरानें लढून ( हनिष्यामि पितामहं ) आमचे आजोबा जे भीष्म त्यांचा वध करीन.' हें ऐकून श्रीकृष्ण रथाकडे परत आले; आणि पुनः अर्जुन व भीष्म यांचें सूर्यास्तापर्यंत भयंकर युद्ध झालें. दिवस मावळल्यानंतर दोनहि सैन्यें पूर्ववत् शिबिरास परत आलीं. ( भीष्मपर्व अ० ९७-१०६ )

आपल्या शिबिरांत परत आल्यानंतर त्या रात्रीं पांडवांचें बोलणें झालें. नऊ दिवस सारखें युद्ध चाललें आहे तरी अर्जुन भीष्मांचा एकदांसुद्धां पराभव किंवा वध करीत नाहीं, उलट तेच आपल्या सर्व सैन्यांचा सारखा संहार करीत आहेत; आपणांस राज्य मिळवून देण्यासाठीं आपल्या बांधवांना मात्र उगीच कष्ट होत आहेत; असें वाटून धर्मास अतिशय दुःख झालें. तेव्हां भीष्मांस व इतर सर्व कौरवांस मी एकटाच ठार करतों, तूं फक्त आज्ञा कर म्हणजे झालें, असें श्रीकृष्ण म्हणाले. परंतु युद्ध न करतां सहाय्य करण्याची त्यांची प्रतिज्ञा आपणच खोटी करावी हें धर्माला बरें वाटेना. पहिल्या दिवशीं युद्धास आरंभ होण्यापूर्वी युधिष्ठिर भीष्मांस नमस्कार करण्यास गेला असतां त्यांनीं त्यास पुन्हां भेटावयास ये, असें सांगितलें होतें; त्याप्रमाणें त्यांचेकडे जाऊन त्यांच्या वधाचा व जय मिळविण्याचा उपाय त्यांसच विचारावा, असें धर्मानें सुचविलें.ही मसलत श्रीकृष्ण वगैरेस पसंत पडून त्या रात्रीं पांच पांडव व श्रीकृष्ण चिलखतें न घालतां व शस्त्रें न घेतां गुप्तपणें भीष्मांचे शिबिरांत गेले. भीष्मांनीं त्या सर्वांचें स्वागत करून त्यांस येण्याचें कारण विचारलें. तेव्हां धर्म म्हणालाः—'आम्हांस जय कसा मिळेल याचा उपाय आम्हांस सांगा.' भीष्म म्हणालेः—'मी जोंपर्यंत युद्ध करीत आहे तोंपर्यंत तुम्हांस कधींहि जय मिळणार नाहीं; यासाठीं माझा वध करण्याचा आधीं प्रयत्न करा!' धर्मः—'तुमच्या वधाचा तरी उपाय आम्हांस सांगा' भीष्म—'मी युद्ध करीत असतां कोणीहि मला जिंकण्यास किंवा माझा वध करण्यास समर्थ नाहीं. क्षत्रियधर्माप्रमाणें मी स्त्रियांशीं कधींहि युद्ध करीत नाहीं. तुमचें सैन्यातील शिखंडी हा पूर्वीं स्त्री असून आतां पुरुष झालेला आहे. म्हणून मी त्याजवर शस्त्र उचलणार नाहीं. यासाठीं त्याला पुढें करून जर अर्जुन मजवर सारखे

बाण टाकील तर माझा वध होण्याचा संभव आहे. ' भीष्मांचें हें भाषण ऐकून अर्जुनाचें अंतःकरण दुःख आणि लज्जा यांनीं भरून आलें. आपल्या बापाचे पश्चात् भीष्मांनींच आपलें संगोपन केलें व भीष्म हेच सर्व कुरुकुलांचे पितामह आहेत; ज्यांनीं आपल्या पित्यांचेंहि पुत्राप्रमाणें पालनपोषण केलें, त्यास अशा रीतीनें ठार मारणें अत्यंत निंद्य आहे; असें वाटून अर्जुन म्हणाला:—' आमचें सर्व सैन्य मरो किंवा न मरो, आमचा जय होवो कीं पराजय होवो, माझा वध होवो, कीं न होवो, धर्मास राज्य मिळो वा न मिळो; मी अशा रीतीनें भीष्मांस मारणार नाहीं. अर्जुनाचें हें भाषण ऐकून श्रीकृष्णांनीं त्याच्या प्रतिज्ञेची त्यास आठवण करून दिली. एकदां केलेली प्रतिज्ञा मोडणें हें क्षत्रियाचें ब्रीद नव्हे. भीष्मांचा पराजय झाल्यावांचून जय मिळणार नाहीं, व भीष्मांनीं सांगितलेल्या युक्तीचें अवलंबन केल्यावांचून त्यांचा पराजय होणार नाहीं. यासाठीं त्यांनीं सांगितल्याप्रमाणेंच वागणें अवश्य आहे. याप्रमाणें श्रीकृष्णाचा उपदेश ऐकून त्याचें समाधान झालें; व सर्वजण भीष्मांचा निरोप घेऊन आपल्या शिबिरास परत आले. ( भीष्मपर्व अ० १०७)

नंतर दहावे दिवशीं सकाळीं शिखंडाचा रथ व त्याचें सैन्य यांना पुढें करून पांडव शिबिरांतून बाहेर पडले. दोन्हीं सैन्यें समोरासमोर येऊन भिडल्यानंतर सर्व रणभूमीवर चोहों बाजूंस युद्ध सुरू झालें. कौरव पक्षाकडील भीष्म, द्रोण; कृप, भगदत्त, शल्य, दुर्योधन व दुःशासन आणि पांडवांकडील अर्जुन, अभिमन्यु, सात्यकि इत्यादि रथी व महारथी यांनीं आपल्या पराक्रमाची शिकस्त केली. या शेवटच्या दिवशीं भीष्मांच्या शौर्यास व पराक्रमास भरती आली होती! शीखंडी व त्याचे मागें चाललेला अर्जुन यावांचून त्यांच्यापुढें तिसऱ्याचा मुळींच टिकाव लागेना. भीष्मांस पुढें करून व त्यांचें रक्षण करीत दुर्योधनादिकांनीं युद्ध चालविलें होतें व शीखंडीस पुढें करून पांडवांकडील योद्ध्यांनीं लढाई चालविली होती. दोहोंकडील विशेषतः पांडवांकडील- अतिशय सैन्य त्या दिवशीं रणांगणांगन पडलें. भीष्मांनीं विराटाचा भाऊ शतानिक याचा याच दिवशीं वध केला. संध्याकाळचे सुमारास पांडवांकडील सर्व मोठमोठ्या योद्ध्यांनीं भीष्मांचे रथावर चोहोंकडून एकदम लगट केली; भीष्मांच्या भोंवतालचे सर्व वीरांना जर्जर केल्यानंतर अर्जुनानें मोठ्या शिताफीनें भीष्मांचीं अनेक धनुष्यें लागोपाठ तोडून टाकिलीं.

शिखंडी वगैरे इतर योद्धे यांनीं भीष्मावर सारखी बाणांची वृष्टि चालविलीच होती. त्यांचें कवच भेदून त्यांचें अंगांत इतके बाण घुसले होते कीं, शरीरावर दोन बोटेंहि जागा जखमावांचून धड राहिली नव्हती ! आपलें कर्तव्य होतें तें होऊन आपल्या जन्माचें साफल्य झालें. आतां आपल्या मृत्यूस हाच काल उचित आहे; असें मनांत आणून भीष्मांनीं आपलें अंतःकरण युद्धापासून थोडथोडें पराङ्मुख केलें. अर्जुनानें लागोपाठ भीष्माचा ध्वज मोडून पाडला, धनुष्यें तोडली व सारथी ठार केला. याप्रमाणें सर्व शस्त्रें व धनुष्यें नाहींशीं झाल्यावर हातांत ढाल तरवार घेऊन भीष्म रथाचे खालीं उतरूं लागले. इतक्यांत अर्जुनानें आपल्या बाणांनीं ढालेचे व तरवारीचे तुकडे उडविले ! हें पाहून पांडवाकडील सैन्यानें प्रचंड जयघोष करून अर्जुनादि वीरांनीं अधिक निकरानें शस्त्रास्त्रांचा वर्षाव केला. शेवटीं शरीरास हजारों बाण लागल्यामुळें व्याकूळ होऊन भीष्म रथावरून खालीं पडले ! त्यांचे शरीरास इतके बाण लागले होते कीं, त्यांचें शरीर जमीनीस न लागतां बाणांच्या टोंकावरच तोलून राहिलें ! भीष्म भुमीवर पडले, तेव्हां त्यांचें डोकें पूर्वेकडे असून अस्तास जात असलेला सूर्य दाक्षिणायनांत आहे, असें त्यांस दिसून आलें. दक्षिणायनामध्यें मरण येणें चांगलें नाहीं, हें जाणून सूर्य उत्तरायणांत येईपर्यंत—आपल्या इच्छामरणाच्या वराचे प्रभावानें व योगबलानें आपलें प्राण तसेंच धारण करण्याचा त्यांनीं निश्चय केला. भीष्म पडल्याचें वर्तमान दुःशासनानें जाऊन द्रोणास कळविलें; तेव्हां कौरवसैन्यामध्यें एकच हाहाकार उडाला ! युद्ध लागलीच बंद होऊन दोहोंपक्षांकडील योद्धे आपापली चिलखतें काढून व शस्त्रें न घेता त्या बलाढ्य वृद्ध वीराचें शेवटचें दर्शन घेण्यास आले. वीरास योग्य अशा शरशय्येवर पडले असता भीष्माचें शिर खालीं लोंबूं लागलें, तेव्हां त्यांनीं उशी मागितली. दुर्योधनादिकांनीं तात्काळ मऊमऊ उशा, गिर्द्या आणविल्या ! परंतु रणभूमीवरील बाणांच्या बिछान्यास शोभतील अशा त्या नसल्यामुळें, भीष्मांनीं अर्जुनास त्या मागितल्या. त्यानें आपला शोक आवरून धरला; आणि तीन बाण काढून व ते अभिमंत्रित करून त्याचे मानेखालीं उशीप्रमाणें दिले ! हें पाहून भीष्मास संतोष झाला व ‘ क्षत्रियानें रणभूमिवर प्राण सोडावयासाठीं अशाच प्रकारच्या शय्येवर निजावें असें ’ त्यांनीं सर्वांकडे पाहून त्यांस सांगितलें. त्यांचें अंगांतील बाण काढून जखमांना औषधोपचार करण्यासाठीं कुशल शस्त्रवैद्य तेथें आले; परंतु त्याजकडून उपचार करून न घेता त्यांस सन्मानपूर्वक भीष्मांनीं परत पाठविलें.

दुसरे दिवशीं सकाळीं, युद्धास प्रारंभ होण्यापूर्वी सर्व योद्धे पुनः भीष्माकडे आले. त्यांचे प्राण जखमांच्या वेदनेनें व्याकूळ होऊन त्यांस तहान लागली. तेव्हां त्यांनीं पाणी मागितलें असतां दुर्योधनानें कांहीं लोकांकडून गार पाणी व खाण्याचे पदार्थ आणविले. ' मला आतां हे ऐहिक भोग नको आहेत; मी मनुष्यांतून निघून बाणांच्या शय्येवर पडलों आहे. या स्थितीस योग्य असें पाणी कोणीतरी द्या ' असें म्हणून त्यांनीं अर्जुनाकडे पाहिलें. त्यानें जवळ येऊन व त्यास नमस्कार करून एक बाण काढला; व तो पर्जन्यास्त्रानें अभिमंत्रित करून भीष्मांच्या उजव्या बाजूस भूमीमध्यें सोडला, तों तेथून स्वच्छ पाण्याची एक धार वर उडूं लागली ! अर्जुनाचें हें कौशल्य व ही अस्त्रविद्या पाहून सर्वांना आश्चर्य व कौतुक वाटलें. त्या धारेचें पाणी पिऊन हुशार झाल्यावर अर्जुनाच्या पराक्रमाची व अस्त्रविद्याकौशल्याची भीष्मांनीं स्तुति केली. ' अर्जुन योद्धा व श्रीकृष्ण त्याचा सारथ्यकर्ता हे जोंपर्यंत आहेत तोंपर्यंत कौरवांस जय येणार नाहीं. युद्धामध्यें माझा शेवट झाला, येवढीच हानि पत्करून व पांडवांशीं सख्य करून त्यांचें अर्धें राज्य त्यांस परत द्या ' वगैरे उपदेश भीष्मांनीं या प्रसंगींहि केला; परंतु तो पूर्वीप्रमाणेंच निष्फळ झाला. कांहीं वेळानें कर्णहि त्यांचे दर्शनास आला आणि त्यांस नमस्कार करून व डोळ्यांत अश्रू आणून म्हणालाः—' ज्याचा तुम्ही नेहमीं द्वेष करीत होता, तो हा राधेय तुम्हास नमस्कार करीत आहे. ' हें ऐकून भीष्मांनीं त्याजकडे पाहिलें; व प्रेमानें त्याचे पाठीवर हात फिरवून ते म्हणाले:– कर्णा, मी तुझी नेहमीं निंदा करीत असें याचें कारण, आपसांत कलह न व्हावा हेंच होय. तूं पांडवांचा विनाकारण द्वेष करीत होतास; व तुझ्यामुळेंच हें युद्ध करण्याचें धाडस दुर्योधनानें केलें आहे. तुझा पराक्रम व शौर्य कमी आहे असें नाहीं. तुझी व अर्जुनाची योग्यता सारखीच आहे. परंतु या भारतकुलाचा नाश होऊं नये, या हेतूनें मी तुझ्या पराक्रमाची अवहेलना करीत असें. तुजविषयीं माझ्या मनांत मुळींच द्वेषभाव नाहीं. कर्णा, तूं राधेय नसून कौंतेय आहेस; तूं तरी पांडवांशीं सख्य करण्याचा प्रयत्न कर' परंतु सत्यप्रिय व कर्तव्यदक्ष कर्णानें हें म्हणणें मान्य केलें नाहीं. ' दुर्योधनासाठीं तन, मन, धन, घरदार व राज्यसुद्धां अर्पण करणें माझें कर्तव्य आहे. शिवाय लहानपणापासून माझ्या मनांत अर्जुनाविषयीं एकदां जें वैर बाणलें आहे तें अशा सख्यानें नाहींसें व्हावयाचें नाहीं. पांडवांबरोबर मला युद्धच केलें पाहिजे. या कृत्याला आपली अनुज्ञा असावी यावर भीष्मांनीं उत्तर केलें:–' जा. तूं यथाशक्ति व यथोत्साह युद्ध कर. परंतु

भूमींतून स्वच्छ पाण्याची धार वर उडूं लागली  - [ पृ १५०

**ते करतांना मनामध्यें द्वेष किंवा सूड उगविण्याची बुद्धि यांस थारा देऊं नको.** ' एकमेकांविषयींचें मनांतील वैमनस्य याप्रमाणें नाहींसें झाल्यावर भीष्मांचा निरोप घेऊन कर्ण रथांत बसून युद्धास निघाला ( भीष्मपर्व अ० १०८–१२२ )

---

# प्रकरण आठवें.

## युद्धाचा ऐन भर.



भारतकुलांतलें सर्वांहून वडील व सर्वांत पराक्रमी असें वीर भीष्म उत्तरायणाची वाट पहात शरपंजरी पडले होते; त्यांस तसेंच तेथें ठेवून कौरव-पांडवांचीं सैन्यें पुनरपि युद्धास सिद्ध झालीं. भीष्मांचे मागून कौरवसैन्याचें आधिपत्य कोणास द्यावें, याचा दुर्योधन वगैरे मंडळीस विचार पडला. भीष्मानंतर त्यांचे तोडीचा एकटा कर्णच त्या कामास योग्य आहे; असें सर्वांचें अंतःकरणास वाटलें. परंतु त्या काळच्या सर्व मुख्य मुख्य वीरास धनुर्विद्येचें शिक्षण देणारे गुरु द्रोणाचार्य यांसच भीष्मांचे मागून सेनापति करावें. असें कर्णानें सांगितलें; व ही मसलत सर्वांस मान्य होऊन द्रोणास सेनापतीचा अभिषेक झाला. द्रोणांनीं दुर्योधनास वर देऊं केला; तेव्हां ' युधिष्ठिरास जिवंत धरून माझे स्वाधीन करावें ' असा त्यानें वर मागितला. धर्माचा वध करण्याचें दुर्योधनाचें मनांत नाहीं, हें पाहून द्रोणगुरूस फार संतोष झाला. ' धर्माचें अजातशत्रु हें नांव अगदीं योग्य आहे. त्याचा वध होऊं नये असें तुलाहि वाटत आहे, ही फारच चांगली गोष्ट आहे. पांडवांना युद्धांत जिंकून व अशा रीतीनें त्यांना आपला पराक्रम दाखवून मग त्यांचें राज्य त्यांना परत द्यावें व सख्य करावें, असें तुझ्या मनांत असल्यामुळें तूं युधिष्ठिराच्या वधाची इच्छा करीत नाहींस असेंच ना ? ' द्रोणांच्या या प्रश्नावर कुटिल दुर्योधनानें उत्तर केलें ' युद्धामध्यें धर्माचा वध करून आमचा खरा जय होणार नाहीं. त्यास लढाईंत ठार मारिलें असतां पांडव त्याबद्दल सूड उगवितील. परंतु त्यास

जिवंत धरून कैद केलें व पुन्हां द्यूत खेळावयास लावून पांडवांस पुनः वनांत पाठविलें असतां जो आमचा जय होईल तोच दीर्घकाल टिकणारा व खरा जय होय ! ' यावर द्रोण म्हणाले:–' अर्जुन जोंपर्यंत त्यांचे जवळ आहे तोंपर्यंत धर्मास कैद करणें अशक्य आहे; अर्जुन त्याजपासून कांहीं वेळ लांब गेला कीं, मी धर्मास कैद केलेंच समज. ' कौरवांच्या शिबिरांत झालेली ही मसलत हेरां-कडून पांडवांस समजली. ' कांहीं झालें तरी द्रोणाचार्यांचा जरी मी वध करणार नाहीं, तरी मी जोंपर्यंत जिवंत आहे तोंपर्यंत युधिष्ठिरास शत्रूचे हातीं लागूं देणार नाहीं ' अशी प्रतिज्ञा करून अर्जुनानें सर्वांचें भय दूर केलें.

नंतर दोहों पक्षांतील सेनापतींनीं व्यूहरचना करून युद्धास प्रारंभ केला. लौक-रच कुरुक्षेत्राचे मैदानावर उभय पक्षांतील मुख्य वीरांचे रथ एकमेकांस भिडून द्वंद्वयुद्धें सुरू झालीं. अर्जुनाचा पुत्र अभिमन्यु यानें त्या दिवशीं फारच पराक्रम करून पौरव, जयद्रथ, शल्य इ० योद्ध्यांचा पराभव केला. भीम व शल्य यांचेहि भयंकर गदायुद्ध होऊन शेवटीं शल्य बेशुद्ध होऊन पडला असतां, कृतवर्म्यानें त्यास आपल्या रथांत घालून रणांगणांतून दूर नेलें. कौरवसैन्य पराभूत झालेलें पाहून द्रोणाचार्यांनीं आपला रथ धर्माचे सैन्यावर घातला. त्याचें संरक्षण करणाऱ्या शिखंडी, नकुलादि योद्ध्यांचा पराभव करून आणि सिंहसेन व व्याघ्रदत्त या पांचाल वीरांचा वध करून द्रोणांनीं आपला रथ धर्माचे रथास भिडविला. हें पाहून कौरवसैन्यांत एकदम आनंदाचा जयघोष झाला. द्रोणगुरु आतां धर्मराजास कैद करून आणणार, असें दुर्योधनास वाटूं लागलें! धर्मराजा आतां शत्रूचे हातीं सापडतो असें वाटून पांडवसैन्य अधिक निकरानें लढूं लागलें. इतक्यांत पांढऱ्या शुभ्र घोड्यांचा व कपिध्वजानें शोभणारा अर्जुनाचा रथ विद्युल्लतेचे वेगानें कौरवसैन्याचा विध्वंस करीत तेथें येऊन थडकला. अर्जुनानें असंख्य बाणांचा केवळ पाऊस पाडून व आपला अतुल अस्त्रप्रभाव दाखवून कौरवसैन्याची दाणादाण करून टाकली. इतक्यांत सूर्य अस्तास जाण्याचा समय झाल्यामुळें सेनापतींच्या आज्ञेनें युद्ध बंद होऊन दोन्हीं दळें आपापल्या शिबिरास परत आलीं. [ द्रोणपर्व अ० १—१६ ]

दुसरे दिवशीं अर्जुनाला दुसरीकडे युद्धांत कसें व कोणीं गुंतवावें याविषयीं कौरवांमध्यें त्या रात्रीं विचार झाला त्या वेळीं त्रिगर्तांचा राजा सुशर्मा व त्याचे दुसरे पांच भाऊ यांनीं, अर्जुनास ठार केल्यावांचून परत फिरावयाचें नाहीं, अशी घोर प्रतिज्ञा केली ! दुसरे दिवशीं या संशप्तक योद्ध्यांनीं

अर्जुनालाच युद्धास हटकलें; क्षत्रियांच्या ब्रीदाप्रमाणें तें त्यास नाकारतां येईना. धर्मराजाचें संरक्षण करण्याचें काम सात्यकीस सांगून, संशप्तकांचा समाचार घेण्यास अर्जुन निघून गेला. अर्धचंद्राकार व्यूह रचून उभ्या राहिलेल्या संशप्तक सैन्यावर हल्ला करून अर्जुनानें युद्ध चालविलें व लवकरच सुधन्वा वीरास त्यानें ठार केलें. इकडे अर्जुन संशप्तकांशीं युद्ध करण्यांत गुंतला असतां, द्रोण व युधिष्ठिर यांचीं सैन्यें एकमेकांस भिडलीं. धर्मराजास जिवंत धरण्यासाठीं द्रोण वगैरे कौरववीर निकरानें युद्ध करूं लागले; व पांडवांकडील योद्धे धर्माचें संरक्षण मोठ्या हिंमतीनें करूं लागले. द्रोणाचार्यांनीं त्या दिवशीं अतुल पराक्रम करून पांचाल वीर सत्याजित्, विराटपुत्र शतानिक, व वसुदान वगैरे अनेक रथींचा वध केला. याप्रमाणें मत्स्य व पांचाल सैन्यांची दाणादाण करीत करीत द्रोणांचा रथ जसजसा युधिष्ठिराचे रथाचे जवळ येऊं लागला, तसतसें युद्ध अधिक हातघाईवर येऊन सर्व रणभर घनघोर संग्राम माजून राहिला. भीमसेनावर भगदत्तानें आपल्या गजसैन्यासह हल्ला केला. त्यांचे बराच वेळ युद्ध झाल्यावर भीमसेनानें रथावरून खालीं उतरून गदेनेंच भगदत्तांच्या गजसैन्याचा विध्वंस चालविला. धर्मराजाच्या रथाचे भोंवताली जमलेल्या हत्तींच्या गर्जना ऐकून व उडालेले धुळीचे लोट पाहून धर्माचे सुरक्षितपणाविषयीं अर्जुनाचे मनांत चिंता उत्पन्न झाली. संशप्तकांबरोबर तसाच संग्राम चालवावा कीं धर्माच्या रक्षणास जावें. हें त्यास कांहींच कळेना. परंतु शेवटीं संशप्तकांचाच पूर्ण पराभव करण्याचा निश्चय करून अर्जुनानें अधिक निकरानें युद्ध चालविलें; व लवकरच त्रिगर्तांचा राजा सुशर्मा व त्याचे पांच भाऊ या सर्वांस यमसदनीं पाठविलें. लागलीच अर्जुनाचा रथ वाऱ्याप्रमाणें युधिष्ठिराचे सैन्याकडे दौडत येऊं लागला हें पाहून भगदत्तानें आपलें गजसैन्य भीमासमोरून काढून अर्जुनावर घातलें. भगदत्ताच्या मदोन्मत्त हत्तींचे हल्ले चुकवून श्रीकृष्णांनीं मोठ्या चातुर्यानें रथ हाकला; व अर्जुनानें बाणांच्या वृष्टीनें हत्तींच्या सैन्यांचा संहार केला. शेवटीं निर्वाणीचे प्रसंगीं भगदत्तानें हातांतील अंकुश, वैष्णवास्त्रानें, अभिमंत्रित करून अर्जुनावर टाकिला; तो श्रीकृष्णांनीं अर्जुनावर न पडूं देतां आपल्याच छातीवर घेतला. तो त्याचे पूर्वीचें अंकुशाचें स्वरूप जाऊन त्याचे ऐवजीं कमलांची वैजयंती माला त्याचे गळ्यांत लटकूं लागली! या अस्त्राचें निवारण करण्यास आपण असमर्थ नसतां श्रीकृष्ण मध्यें आले, याबद्दल अर्जुनानें त्यास दोष दिला. तेव्हां, हें अस्त्र

प्रथमतः श्रीविष्णूकडून पृथ्वीस, नंतर तिचा पुत्र नर यास व त्यापासून भगदत्ताकडे कसें आलें, तें सांगून त्याचें निवारण करण्याचें सामर्थ्य मजवांचून कोणासहि नाहीं, असें त्यांनीं सांगितलें. हें अस्त्र जोंपर्यंत त्याजजवळ होतें तोंपर्यंत भगदत्ताचा वध होणें शक्य नव्हतें; परंतु तें नाहींसें होतांच अर्जुनानें भगदत्त व त्याचा हत्ती या दोघांसहि अर्धचंद्र बाणानें तेव्हांच ठार केलें! यानंतर गांधारसैन्यानें अर्जुनावर चाल केली असतां दुर्योधनाचे मामे वृशक व अचल यांस त्यानें ठार करून, शकुनास रणांतून पळावयास लाविलें. यावेळीं सूर्यास्ताचा समय जवळ येत चालला होता; तरी दुर्योधन, भीम, सात्यकि, धृष्टद्युम्न, कर्ण, अर्जुन इत्यादिकांनीं युद्ध सारखें तसेंच चालविलें. त्यांत पांडवांकडील नील नांवाच्या योद्ध्याचा अश्वत्थाम्यानें वध केला. याप्रमाणें हें भयानक युद्ध चाललें असतां सूर्य अस्तास जाऊन रणभूमीवर हळू हळू अंधकार पसरू लागला; तेव्हां युद्ध बंद होऊन दोन्हीं सैन्यें आपापल्या छावणींत परत आलीं. ( द्रोणपर्व अ० १७–३२ )

द्रोणाचार्य सेनापति झाल्यानंतर तिसरे दिवशींचें युद्ध तर फारच घनघोर झालें. त्या दिवशीं तरुण अभिमन्युनें अतुल पराक्रम करून कौरवांकडील अनेक योद्धे ठार केले. आरंभीं सैन्याची चक्रव्यूहरचना करून द्रोणाचार्यांनीं कर्ण, दुःशासन, कृप वगैरेंसह दुर्योधनास व्यूहाचे मध्यभागीं ठेविलें; व आपण व्यूहाचे तोंडाशीं उभे राहिले, त्यांचे भोंवतीं तांबड्या पोषाखाचे व तांबड्या निशाणांचे सूर्यवंशी योद्धे लक्ष्मणासह उभे होते. पूर्व दिवसाप्रमाणें अर्जुनास संशप्तकांनीं युद्धास हटकून दूर नेलें. इकडे चक्रव्यूहाची फळी कोणी फोडावी, याविषयीं धर्मराजास चिंता पडली. अर्जुन, श्रीकृष्ण, प्रद्युम्न व अभिमन्यू यांवांचून कोणासहि हा व्यूह फोडण्याची कला अवगत नव्हती म्हणून चक्रव्यूहामध्यें प्रवेश करण्याची धर्मराजानें अभिमन्यूस आज्ञा केली. तेव्हां अभिमन्यु म्हणाला:–' मी व्यूहाचा भेद करून वाडिलांचे आशीर्वादानें आंत शिरतों; परंतु त्यांतून मला परत येतां येणार नाहीं.' पण त्याचे पाठोपाठ व्यूहामध्यें शिरण्याचें भीमादि योद्ध्यांनीं त्यास वचन दिलें. तेव्हां धर्माची ही आज्ञा त्या बालवीरानें मोठ्या आनंदानें मान्य करून आपला रथ द्रोणाचे सैन्यावर नेऊन घालण्यास सुमित्र सारथ्यास हुकूम केला. पहिल्या प्रथमच त्यानें द्रोण वगैरे वीरांचा पराभव करून, व्यूह फोडून सर्व सैन्यावर बाणांची

सारखी वृष्टि चालविली; व शल्यास मूर्च्छित करून त्याच्या भावाचें शिर उडविलें! पुढें दुःशासन त्याजवर चालून आला. तेव्हां त्यांस सभेंतील छळाची व मर्मभेदी भाषणांची आठवण देऊन त्याजवर एकच अमोघ बाण टाकून अभिमन्यूनें त्यास मूर्च्छित केलें. नंतर कर्ण त्याजवर चालून आला, त्याचाहि त्यानें पराभव करून त्याच्या धाकट्या भावाचा वध केला! अभिमन्यु पुढें व इतर पांडववीर पाठीमागें याप्रमाणें कौरवसैन्यांत शिरून त्यांनीं सारखी दाणादाण केली; व कौरवसैन्य पळवून लाविलें. इतक्यांत सिंधुराजा जयद्रथ यानें त्वेषानें हल्ला चढवून पूर्वी मिळविलेल्या वराचे जोरावर अभिमन्यु खेरीज पांडवांकडील इतर सर्व वीरांस आडवून धरिलें. इकडे अभिमन्यु कौरवसैन्यामध्यें एकटाच सांपडून त्याला भीम, सात्यकि वगैरेंचा आधार नाहींसा झाला; तरी त्यानें मोठ्या शौर्यानें युद्ध केलें. दुर्योधनास पळावयास लावून त्याचा पुत्र लक्ष्मण याचा त्यानें वध केला. शल्याचा पुत्र रुक्मरथ याचेंहि शिर त्यानें उडविलें! अभिमन्यूपुढें कोणत्याहि एकट्या वीराचा टिकाव लागत नाहीं असें पाहून द्रोण, अश्वत्थामा, कर्ण, कृप, कृतवर्मा व बृहद्बल या सहा महारथींनीं त्या बालवीरावर एकदम हल्ला करून युद्ध आरंभिलें. जयद्रथानें इकडे सर्व पांडवसैन्य आडवून टाकिलें असल्यामुळें एकट्या अभिमन्यूचें कांहीं चालेनासें झालें तथापि त्यानें पराक्रमाची शिकस्त करून त्या सहांपैकीं बृहद्बलास ठार केलें! इतक्यांत द्रोणाचार्यांचे इशारती-वरून कर्णानें अभिमन्यूचें धनुष्य तोडलें, कृतवर्म्यानें रथाचे घोडे ठार केले व कृपाचार्यांनीं त्याचा सारथि मारला! याप्रमाणें निरुपाय झाल्या नंतर फक्त ढाल तलवार हातांत घेऊन रथावरून खालीं उतरून तो कौरवसैन्यांत घुसला. इतक्यांत द्रोणगुरूंनीं बाणानें त्याची तरवार मुठी-जवळ मोडून टाकली व कर्णानें ढालेचे तुकडे तुकडे केले! यानंतर नुसते चक्रच हातामध्यें घेऊन अभिमन्यूनें युद्ध चालविलें. तें चक्रहि निरुपयोगी झाल्यावर गदा घेऊन अभिमन्यू लढूं लागला. अश्वत्थाम्यास मागें हटवून त्यानें गदेनें दुःशासनांचा पुत्र दौःशासनी याचे घोडे ठार केले. दुःशासनपुत्रानेंहि गदा घेऊन रथाखालीं उडी टाकली. दोघांनींहि एकमेकावर जोरानें गदेचे प्रहार केले असतां दोघेहि मूर्च्छा येऊन पडले; परंतु दौःशासनीनें आधीं सावध होऊन, अभिमन्यु भूमीवरच पडलेला; असतां त्याजवर त्वरेनें गदेचा प्रहार केला, त्यामुळें तो बालवीर व्याकुळ होऊन तात्काळ मरण पावला! (द्रोणपर्व अ० ३३ —५० )

अभिमन्युसारखा शूर योद्धा रणांत पडल्यावर कौरवांचे आनंदास व पांडवांचे दुःखास पारावार राहिला नाहीं; इकडे सूर्यहि अस्तास गेल्यामुळें सैन्यें शिबिरास परत आलीं. धर्माच्या दुःखास तर सीमाच राहिली नाहीं. वास्तविक पाहिलें असतां युद्धाचा सर्व भार भीमासारख्या कसलेल्या योद्धयावर टाकावयाचा; पण तसें न करितां युद्धाचें पुढारीपण सौभद्रासारख्या लहान व अननुभवी मुलाकडे देऊन, त्याचें संरक्षण करण्यासहि आपण असमर्थ झालों; आतां अर्जुनास व सुभद्रेस तोंड कसें दाखवावें ? अभिमन्यु कोठें आहे, म्हणून अर्जुनानें विचारलें असतां त्यास काय उत्तर देऊं ? अशा प्रकारच्या विचारांनीं धर्मराजाचें अंतःकरणामध्यें दुःखाचें काहूर उठविलें. व्यासांनीं अनेक प्रकारच्या प्राचीन कथा सांगून त्यांचें सांतवन करण्याचा प्रयत्न केला; परंतु अभिमन्यूचा वधाचें दुःख लवमात्रही कमी होईना. ( द्रोणपर्व अ० ५१--७१)

इकडे संशप्तकांबरोबरचें युद्ध आटोपून परत येत असतां अर्जुनास पुष्कळ अपशकून झाले; व आपल्या आवडत्या पुत्राचा कांहीं तरी घात झाला असावा, असें त्याचे मनास वाटूं लागलें. शिबिरांत आल्यावर आपले भाऊ व दुसरे योद्धे दुःखी कष्टी होऊन खालीं माना घालून बसल्याचें त्यानें पाहिलें, ‘ आज तुम्ही माझें अभिनंदन कां करीत नाहीं ? अभिमन्यु कोठें आहे ? तो येथें दिसत नाहीं ! द्रोणाचार्यांनीं चक्रव्यूह रचिला होता; त्याचा भेद करणें त्याजवांचून इतर कोणास माहीत नव्हतें. त्यास तुम्हीं शत्रूंचे सैन्य मध्यें पाठविलें कीं काय ? ’ इ० प्रश्न तो विचारूं लागला. तरी कोणाकडून उत्तर येईना ! तेव्हां वस्तुस्थिति काय आहे तें त्यास कळून आलें; आणि तो त्वेषानें म्हणाला—‘ तुम्ही येवढे मोठमोठे वीर व महारथी असून माझा अभिमन्यु बाळ कसा मेला ? त्याची तुम्हीं उपेक्षा कशी केली ? तुम्ही इतके दुर्बल आहां हें मला ठाऊक असतें. तर मी त्याला तुमचे स्वाधीन करून दुसरीकडे युद्धास गेलों नसतों. अहो, तुमच्या डोळ्यांदेखत ज्याअर्थी शत्रूंनीं त्यास ठार केलें त्याअर्थी तुमचे अंगीं पौरुष किंवा पराक्रम बिलकूल नाहीं. अरे, तुम्ही हीं कवचें, शस्त्रें, आयुधें शोभेकरितां व सभेमध्यें शौर्याच्या पोकळ वल्गना करण्याकरितांच कां धारण करीत आहां ? ’ य प्रमाणें दुःख, शोक व संताप यांनीं विव्हळ झालेल्या अर्जुनाचा विलाप चालला असतां, त्यास उत्तर देण्याची कोणाचीही छाती होईना, अशा समयीं त्यास उत्तर देण्यास धर्म व श्रीकृष्ण यांवांचून कोणीहि समर्थ नव्हता. धर्मानें त्या दिवसाच्या युद्धाची सर्व हकीकत त्यास सांगून अभिमन्यूचे पाठोपाठ आपण सर्वजण कसें गेलों. जय-

द्रथानें मध्यंतरीं सर्वांची फुटाफूट कशी केली व शेवटीं द्रोणादि सहा रथींनीं मिळून एकट्या अभिमन्यूवर हल्ला करून दौःशासनीनें त्याचा शेवटीं कसा वध केला, हें सर्व वृत्त त्यास निवेदन केलें. ' उद्यां जर मी जयद्रथाचा वध करणार नाहीं, तर ब्रह्महत्यादि पातकें लागून मी रौरव नरकांत पडेन; उद्यां जयद्रथाचा वध होण्याचे आधींच जर सूर्य अस्तास गेला तर मी चितेमध्यें खास प्रवेश करीन ' याप्रमाणें अर्जुनानें घोर प्रतिज्ञा करून आपला देवदत्त शंख फुंकिला व इतर पांडव वीरांनींहि प्रचंड जयघोष केला ! ही बातमी हेरांनीं कौरवांचे शिबिरांत जाऊन कळविली असतां जयद्रथ भयभीत झाला व मी कोठें तरी प्राण वांचविण्यासाठीं निघून जातों, असें तो म्हणूं लागला ! परंतु दुर्योधनादिकांनीं त्यास धीर दिला व स्वतः द्रोणांनींहि ' मी तुझें संरक्षण करितों, तूं भिऊं नको ' असें अश्वासन दिलें; त्यामुळें तो तसाच धैर्य धरून छावणींतील सैन्यामध्यें राहिला. इकडे पांडवांना किंवा आपणांस न विचारतां असली घोर प्रतिज्ञा केल्याबद्दल श्रीकृष्णांनीं अर्जुनास फारच दोष दिला. परंतु अर्जुनानें आपल्या शौर्यादि पराक्रमाचें वर्णन करून दुसरे दिवशीं युद्धासाठीं विशेष कसोसीनें रथ सिद्ध करण्यास श्रीकृष्णास सांगितलें. श्रीकृष्णांनीं तेथून निघून सुभद्रेकडे येऊन तिचे होईल तितकें समाधान केलें, नंतर दुसरे दिवशींचे युद्धासाठीं आपलाच रथ सिद्ध करण्यास दारुकास सांगून ते आपल्या तंबूंत निजावयास गेले. परंतु अर्जुनाची प्रतिज्ञा शेवटास कशी न्यावी, याविषयींच्या विचारामुळें त्यांना मुळींच झोंप आली नाहीं. (द्रोणपर्व अ० ७२--८२)

चवथे दिवशीं सुर्योदय होतांच दोहों बाजूंचीं सैन्यें रणांगणावर उभीं राहून युद्ध सुरू झालें. अर्जुनानें सात्यकिला धर्माचे रक्षणासाठीं ठेवून कौरवसैन्यावर चाल केली. प्रथमतः त्याजवर दुःशासनाचें हत्तींचें सैन्य चालून आलें; त्याची धुळधाणी उडवून व दुःशासनाचा पराभव करून अर्जुनानें आपला रथ द्रोणाचे रथाकडे वळविला. शिष्यानें गुरूंस प्रथमतः प्रणाम करून मग युद्धास प्रारंभ केला ! गुरुशिष्याचें बराच वेळ युद्ध झालें. त्यांत द्रोणगुरु हार खात नाहींत, असें पाहून त्यास तेथेंच सोडून श्रीकृष्णांनीं अर्जुनाचा रथ जयद्रथाच्या रथाचे बाजूस सैन्यांत घातला. वाटेंतील घनघोर युद्धामध्यें एकदां अर्जुन बेशुद्धहि झाला होता; परंतु सावध होऊन श्रुतायुध व सुदाक्षिण याचा त्यानें वध केला. नंतर अर्जुनाचा रथ जयद्रथाच्या अधिकाधिक जवळ जात असतां मार्गांत तुंबळ युद्ध माजून राहिलें. त्यांत अंबष्टाचा वध होऊन दुर्योधनाचा पूर्ण पराभव झाला. तसेंच अवंतिदेशाचे राजपुत्र विंद व अनुविंद हे ठार झालें. अर्जुनाचें घोडे जख-

मांनीं व श्रमांनें अगदीं थकल्यामुळें श्रीकृष्णांनीं भरसैन्यामध्येंच रथ उभा करून घोडे सोडले ! अर्जुनानें एक बाण अस्त्रानें मंत्रून भूमीमध्यें सोडला; व तत्काळ तेथें एक सरोवर निर्माण केलें ! अर्जुन एकटाच पायीं शत्रूंशीं झगडत असतां, इकडे श्रीकृष्णांनीं घोड्यांस पाणी वगैरे पाजून हुशार केलें; आणि त्यास रथास जोडले व पुन्हां युद्ध सुरू झालें. इकडे द्रोणांनीं धर्मराजावर चाल करून त्याचा पराभव केला. धर्म विरथ होऊन द्रोणांचे हातीं लागण्याचें बेतात आला; परंतु इतक्यांत सात्यकि आल्यामुळें तो प्रसंग टळला. अर्जुनाचा रथ प्रचंड कौरवसेनेमध्यें घुसून दूर गेल्यामुळें दिसेनासा झाला. तेव्हां धर्माचे आज्ञेवरून सात्यकि अर्जुनाचे मागें निघाला. कौरवसैन्यामध्यें घुसून सात्यकीनें द्रोण, दुर्योधन, दुःशासन यांस पराभूत करून निकरानें युद्ध चालविलें. त्यांत अलंबुष, जलसंध इत्यादि राक्षसवीर पडले. कौरवसैन्यामध्यें अर्जुन व सात्यकि दिसेनासें झाल्यामुळें धर्मास त्या दोघांचे संबंधानें चिंता उत्पन्न झाली व त्यानें पुन्हा भीमास अर्जुन व सात्यकि यांचे मागोमाग पाठविलें. भीमानेंहि अतुल पराक्रम करून द्रोणांस विरथ केलें; व कर्णास मूर्छित पाडलें, परंतु कर्ण सावध होऊन त्याचें व भीमाचें पुन्हां युद्ध झालें. त्यांत कर्ण अगदीं निःशस्त्र होऊन भीमाचे हातीं लागला असतांहि अर्जुनाची प्रतिज्ञा ध्यानांत आणून त्यानें त्यास सोडून दिलें. पुढें एकदां भीमहि जेव्हां विरथ व निःशस्त्र होऊन कर्णाच हातांत सांपडला, तेव्हां त्यानेंहि कुंतीस दिलेलें वचन स्मरून त्यांस जीवदान दिलें. सात्यकि जसा जसा अर्जुनाचे रथाजवळ येत चालला तसतसे कौरव अधिक निकरानें लढूं लागले. त्या युद्धांत अर्जुनानें आधीं भूरिश्रव्याचे हात तोडले; व शेवटीं सात्यकीनें त्याचा वध केला, इतक्यांत सूर्य अस्तास जाण्यास थोडा अवकाश राहिला. जयद्रथ तर कौरवसैन्य व त्यांचेकडील दुर्योधनादि सहा महारथी यांच्या रथांचे मध्यभागीं लपून बसला होता. तेव्हां श्रीकृष्णांनीं आपल्या योगमायेनें सूर्य पूर्णपणें आच्छादित केल्यामुळें तो अस्तास गेलासा वाटून जयद्रथ बेसावधपणें सैन्यांत वावरूं लागला ! हें पाहतांच श्रीकृष्णाचें इशारतीवरून अर्जुनानें त्याचे सैन्यावर निकरानें व वेगानें हल्ला चढवून त्याचें संरक्षण करणाऱ्या सहारथींस जर्जर केलें; व त्वरेनें वज्रास्त्रानें एक बाण अभिमंत्रित करून जयद्रथावर सोडला. जो जयद्रथाचें शीर जमिनीवर पाडील त्याच्या मस्तकाचे एकदम शेंकडों तुकडे होतील, असा त्याच्या पित्याचा त्यास वर आहे, अशी सूचना श्रीकृष्णांनीं अर्जुनास आधींच दिली होती. तीप्रमाणें वज्रास्त्रानें अभिमंत्रित केलेल्या बाणानें जयद्रथाचें मस्तक तुटून तें तसेंच

आकाशमार्गानें जाऊन जयद्रथाच्याच पित्याचें मांडीवर पडलें. पण हें त्यांस माहीत नसल्यामुळें, संध्यावंदनाचे वेळीं सूर्यास अर्घ्य देण्यास तो उठला असतां त्याचेच हातून तें शिर भूमीवर पडलें ! यामुळें त्याच्याच मस्तकाचे शतशः तुकडे होऊन तो गतप्राण होऊन पडला ! **असत्पक्षानें योजलेला उपाय ऐनवेळीं त्यास अपायकारकच व्हावयाचा !** जयद्रथाचा वध झाल्यावर दुर्योधन द्रोणाकडे जाऊन त्यास फार टाकून बोलला. ' तुम्ही एवढे पराक्रमी व अस्त्रवेत्ते वीर असतांना अझून पांडव जेरीस येत नाहींत; यावरून तुमचे मनांत पांडवांबद्दल पक्षपात असल्यामुळें तुम्ही मनापासून युद्ध करीत नाहीं, असें स्पष्ट होतें ' असें तो म्हणाला ! हें मर्मभेदक बोलणें एकून द्रोणांस फार वाईट वाटलें. ' मी आतां वृद्ध झालों असून यथाशक्ति लढून आपले प्राण तुजसाठीं धोक्यांत घालीत असतांहि तूं मला कृतघ्नपणानें नांवें ठेवीत आहेस. असो; धर्मयुद्ध बाजूस ठेवून सर्वांचाच मी अस्त्रानें वध करीन किंवा मी तरी प्राणास मुकेन ' अशी द्रोणांनीं प्रतिज्ञा केली. इकडे श्रीकृष्णांनीं सूर्यावरील योगमायेचें आवरण काढून घेतल्यामुळें पुन्हां सूर्य दिसू लागला ! खरा सूर्यास्त होईपर्यंत अर्जुनानें कृप, अश्वत्थामा इत्यादि वीरांचा पराभव केला; व सात्यकीनें कर्णास विरथ केलें. नेहमींच्या पद्धतीप्रमाणें सूर्यास्त होतांच युद्ध बंद होऊन सैन्यें शिबिरांत परत यावयाचीं; परंतु त्या दिवशीं दोहों बाजूंच्या सेनापतींनीं युद्ध बंद ठेवण्याचा नगारा न वाजविल्यामुळें रात्रीहि युद्ध चाललेंच होतें ! रात्र काळोखाची असल्यामुळें तें युद्ध फारच भयंकर झालें. भीष्म, द्रोण, अश्वत्थामा, दुर्योधन, यांनीं मोठ्या पराक्रमानें युद्ध चालविलें होतें. परंतु त्यांत भीमाचा पुत्र घटोत्कच यानें अचाट पराक्रम करून कौरवांकडील लक्षावधी सैन्य रणांगणीं पाडलें ! तसेंच अलंबुष व अलायुध या कौरव पक्षाकडील दान राक्षसांना त्यानें ठार केलें. घटोत्कच व कर्ण यांचे तर अद्वितीय युद्ध झालें. कर्णाची अस्त्रविद्या व घटोत्कचाचें मायायुद्ध यांची त्या वेळीं पुरती परीक्षा झाली. घटोत्कच आपल्या मायाविद्येचा उपयोग करीत असल्यामुळें कौरवसैन्याचा अतिशय संहार होऊं लागला. घटोत्कचानें त्या रात्रीचे युद्धांत १ अक्षौहिणी कौरवसैन्य ठार केलें! पांडवांचा पराभव करून कीर्ति व राज्यवैभव संपादण्याची दुर्योधनाची मनांतील आशा अशा रीतीनें विरघळून जाऊन घटोत्कचाचेच हातून आपला वध होणार असें, सर्व कौरवांस वाटू लागलें. तेव्हां त्यांनीं इंद्रानें दिलेली अमोघ शक्ती घटोत्कचावर टाकण्याचा कर्णास अतिशय आग्रह केला. ही अमोघ शक्ति अर्जुनावर टाकून त्याचा प्राण घेण्यासाठीं

म्हणून कर्णानें फार जपून ठेविली होती. परंतु जेव्हां जेव्हां त्याची व अर्जुनाची गांठ पडे तेव्हां तेव्हां श्रीकृष्णांनीं आपल्या मायेनें त्यास मोहित केल्यामुळें, ती आपल्या कट्या शत्रूवर सोडण्याचा त्यास भानच राहत नसे! परंतु घटोत्कचानें चालविलेला कौरवसैन्याचा संहार व दुर्योधनादिकांची आज्ञा हीं लक्षांत आणून शेवटीं त्यानें ती अमोघ शक्ति मोठ्या निरुपायानें घटोत्कचावर सोडिली. शक्ति ज्यावर टाकावयाची त्याचा वध खात्रीनें व्हावयाचाच, असा तिचा प्रभाव असल्यामुळें तिनें घटोत्कचाचे प्राण तात्काळ हरण केले! आज आपली या काळच्या जबड्यांतून मुक्तता झाली असें वाटून कौरवांस अत्यंत हर्ष झाला, परंतु कर्णास मात्र फार वाईट वाटूं लागलें. अर्जुनासाठीं राखून ठेविलेलें अमोघ अस्त्र आपण सोडलें; आतां त्याचा वध करण्याची किंवा त्यास जिंकण्याची आशाच करावयास नको. आपण मात्र आतां त्याचे हातून खास प्राणांस मुकणार; असे विचार कर्णाचे मनांत घोळूं लागले! इकडे कर्णाच शक्तीनें घटोत्कचासारखा पराक्रमी राक्षस योद्धा रणांत पडल्यामुळें पांडवसैन्यांत एकच हाहाकार उडाला. परंतु ही बातमी श्रीकृष्णांस समजतांच त्यांनीं अत्यानंदानें अर्जुनास अलिंगन दिलें, सर्व सैन्य घटोत्कचासाठीं हळहळत असतां श्रीकृष्णास मात्र इतका का आनंद झाला याचा कोणासच उमज पडेना. तेव्हां कर्णाजवळच्या शक्तीचा प्रभाव केवढा होता! ती जोंपर्यंत होती तोंपर्यंत अर्जुनाचे जिवाबद्दल आपणास किती चिंता वाटत असे, ती शक्ती आतां नाहींशी झाल्यामुळें अर्जुनाचे जिवास कसलीहि भीति नाहीं, एवढेंच नव्हे तर आतां त्यास कर्णाशीं होणाऱ्या युद्धांत जय खात्रीनें मिळणार इ० सांगून श्रीकृष्णांनीं सर्वांची समजूत घातली. दोहोंपक्षांकडील सैन्य सूर्योदयापासून चालविलेल्या युद्धाचे श्रमानें थकून गेली होतीं. त्यावेळीं मध्यरात्रीचा सुमार होता; तेव्हां सेनापतींनीं युद्ध बंद केलें. सैन्यानें एक प्रहरभर विश्रांति घेतल्यानंतर चंद्रोदय झाला. ( द्रोणपर्व अ० ८३—१८५ )

चंद्रोदयापासून युद्धास पुनः प्रारंभ होऊन तें सूर्योदयापर्यंत निकरानें चाललें. सूर्यमंडळ क्षितिजावर येतांच योद्ध्यांनीं आपापलीं शस्त्रें खालीं ठेविलीं; व घटकाभर युद्ध बंद करून रणामध्येंच संध्यावन्दन केलें व पुन्हां युद्ध चालविलें. द्रोणांनीं रणभूमीचे उत्तरेकडे हजारों पांचाल वीर मारून द्रुपद, त्यांचे नातू व विराट यांचा वध केला. पुनः रणभूमीवर सात्यकि, भीम, अर्जुन, नकुल, दुर्योधन, दुःशासन, द्रोण, कर्ण इत्यादिकांचे रथ एकमेकांस भिडून बाणांचे वर्षाव सुरू झाले. अर्जुनानें आपल्या पराक्रमाची कितीहि पराकाष्ठा केली तरी

**द्रोणां**चा पराभव होईना; व **द्रोण** तर **पां**डवांच्या सर्व सैन्याची धुळधाण उडवूं लागले. तेव्हां 'द्रोणांस अश्वत्थाम्याचा वध झाल्याचें कोणी कळवील तरच तें युद्ध करणें सोडून देतील व **पां**डवसैन्य वांचेल' असें **श्रीकृष्णांनीं** सुचविलें. असलें निंद्य कृत्य करण्यास **द्रोणां**चा पट्ट शिष्य अर्जुन मुळींच तयार होईना; दुसरेंहि कोणी हें कृत्य करण्यास धजेना. तेव्हां **भीमानें**, **मा**लवराजा, **इंद्रवर्मा** याचा '**अश्वत्थामा**' नांवाचा एक हत्ती होता त्यास गदेनें ठार केलें; व **द्रो**णाचार्यांजवळ जाऊन, ' अश्वत्थामा ठार मारला, ' असें त्यानें ओरडून सांगितलें ! हें वर्तमान ऐकून **द्रोणांचें** धैर्य थोडेसें खचलें. पण आपल्या पुत्राचा पराक्रम लक्षांत येऊन त्यांनीं पुनः हिमतीनें युद्ध चालविलें. इतक्यांत आपल पिता व पुत्र यांचे वधाचा सूड उगविण्यासाठीं उत्सुक झालेला **धृष्टद्युम्न** आपल्या सैन्यासह आपणावर चालून येत आहे, असें पाहून मात्र त्यांचें चित्त उद्विग्न झालें पृथ्वीच्या काय, पण त्रैलोक्याच्या राज्यासाठीं सुद्धां **धर्म** कधींहि खोटें बोलणार नाहीं. असें जाणून त्यांनीं अश्वत्थाम्यासंबंधाची खरी हकीकत त्यास विचारिली तेव्हां, 'या वेळीं खोटें न सांगशील तर **द्रोण** अर्धा दिवसांतच आपल्या सर्व सैन्यांचा नाश करितील; प्राण वांचविण्यासाठीं खोटें बोललें तर त्यांत पाप नाहीं, असें **श्रीकृष्णांनीं** सांगित्यामुळें **धर्म** खोटें बोलण्यास तयार झाला! **श्रीकृष्णांनीं** खोटें बोलण्याचा त्यास कसा उपदेश केला? अशी येथें कोणासहि शंका येईल. परंतु **धर्मा**ची सत्यनिष्ठा किती बळकट आहे याची कसोटी पाहाण्यासाठीं त्यांनीं त्यास ही मसलत दिली, **धर्म** स्वतः सत्यनिष्ठ, शांत, पापभीरु व शुद्ध आचरणाचा होता. तरी त्याचे अंगीं जो एक मोठा दोष त्याचें अंतःकरणांत–गूढ रूपानें होता, तो या वेळेस बाहेर पडला. कोणतीहि महत्त्वाची गोष्ट स्वतःच्या हिमतीवर व जबाबदारीवर करण्याइतका त्याचें अंतःकरणांत जोम नव्हता. असल्या महत्त्वाच्या कामांत दुसऱ्याच्या उपदेशावर, मसलतीवर व पराक्रमावर अवलंबून राहण्याची त्यास संवय लागली होती. या संवयीनें या वेळीं त्याचें सत्त्व हरण केलें. '**अश्वत्थामा**' मारला असें मोठ्यानें म्हणून 'कुंजर' असें तो हळूच म्हणाला! **धर्मा**च्या तोंडचे हे शब्द ऐकून **द्रोणाचार्यांस** अतिशय दुःख झालें. **धर्म** पूर्णपणें सत्यनिष्ठ असल्यामुळें त्याचा रथ भूमीपासून चार अंगुलें वर, असा नेहमीं चालत असे! परंतु त्याचे तोंडून वरील खोटे शब्द निघतांच तो खालीं जमिनीस येऊन थडकला! येवढ्यावरून एका **लहानशा असत्य भाषणानेंहि अधोगति होते,** हे चांगलेंच दिसून येतें. इकडे ही अनिष्ट बातमी

ऐकलेली व तिकडे धृष्टद्युम्नाचा रथ हळूंहळूं द्रोणांचे रथाचे जवळ जवळ येऊं लागला; इतक्यांत भीमानें तेथें जाऊन ब्राह्मणधर्म सोडून क्षात्रियांचे कर्म अंगिकारल्याबद्दल द्रोणांची निर्भर्त्सना केली! त्यामुळें तर त्यांस अतिशय दुःख होऊन त्यांनीं शस्त्रें खालीं ठेविलीं व ते रथावरच समाधि लावून बसले. ही संधि साधून धृष्टद्युम्न हातांत तरवार घेऊन द्रोणांचे रथावर चढला, व त्या वृद्ध ब्राह्मण विराचे पांढरे शुभ्र झालेले केश डाव्या हातानें धरून त्यानें तरवार उगारली. तेव्हां अर्जुन व पांडवांकडील इतर योद्धे यांनीं 'हां, हां, गुरूनां जिवंत धरा; त्यांचा वध करूं नका' असा ओरडा केला. परंतु धृष्टद्युम्नानें त्यांचें बोलणें न ऐकतां त्यांचें शिर तरवारीच्या एका घावानें तात्काळ उडविलें; व तें हातांत घेऊन कौरवांचे सैन्यापुढें फेकून दिलें! ८५ वर्षांच्या वृद्ध वीराची व गुरूची ही दशा पाहून कौरवसैन्य चोहोंकडे पळूं लागलें. इकडे द्रोणाचार्यांस–विशेषतः तशा स्थितींत–धृष्टद्युम्नानें ठार केलें, हें कृत्य योग्य कीं अयोग्य याविषयीं पांडवपक्षांकडील योद्ध्यांत वाद सुरू झाला. धृष्टद्युम्न व भीम यांचे मतानें झालें तें योग्यच झालें. परंतु अर्जुन व सात्यकि यांस हें कृत्य अधमपणाचें वाटलें. आपण जिवंत असतां द्रोणगुरूंचा आपल्या देखत असा वध व्हावा, हें आपणांस मोठेंच लांछन व पाप घडलें, असें अर्जुनास वाटत होतें. हा वाद पुढें विकोपास जाऊन सात्यकि व धृष्टद्युम्न एकमेकावर शस्त्रें घेऊन धांवले! इकडे धर्माचें असत्य भाषण व धृष्टद्युम्नाचें अधमपणाचें कृत्य अश्वत्थाम्यास कळल्यामुळें, त्याचा सूड उगविण्यासाठीं तो पळून जाणारें सर्व कौरवसैन्य गोळा करून पांडवांवर आवेशानें चाल करून आला. आणि त्यानें अत्यंत भयंकर असें 'नारायणास्त्र' सोडलें! पांडवांकडील योद्धे त्या अस्त्राचा जसजसा प्रतीकार करूं लागले, तसतसें तें अस्त्र त्यांचा अधिक झपाट्यानें संहार करूं लागलें ! हें पाहून 'शस्त्र' खालीं ठेवा व रथावरून खालीं उतरून अस्त्रास नमस्कार करा, अशी श्रीकृष्णांची आज्ञा होतांच सर्वांनीं तसें केलें. परंतु शस्त्र खालीं ठेवण्यास एकटा भीमसेन मात्र तयार होईना! त्यामुळें त्याचे रथाभोंवतीं त्या अस्त्रापासून उत्पन्न झालेला अग्नि पसरूं लागला. इतक्यांत श्रीकृष्ण व अर्जुन यांनीं येऊन त्याचे हातांतून शस्त्रें हिसकून घेऊन त्यास रथाखालीं ओढलें. तेव्हां तें अस्त्र शांत होऊन सैन्याचा नाश थांबला! पुनः एकदां हेंच अस्त्र सोडण्यास दुर्योधनानें अश्वत्थाम्यास सांगितलें; परंतु हें अस्त्र एकदां सोडल्यावर त्यास परत घेतां येत नव्हतें व दुसऱ्यांदाहि सोडतां येत नव्हतें, यामुळें त्याचा निरुपाय झाला. तथापि त्यानें तसेंच युद्ध चालवून

पांडवांकडील वृद्ध पौरव राजा, मालव राजा व सुदर्शन यांस ठार करून सात्यकि, धृष्टद्युम्न, व भीम यांचा पराभव केला. नंतर अर्जुनानें आपला रथ अश्वत्थाम्यावर घातला. तेव्हां अर्जुनास व विशेषतः श्रीकृष्णांस एखदम ठार करण्याचे हेतूनें अश्वत्थाम्यानें ‘ आग्नेयास्त्र ’ सोडलें; परंतु अर्जुनानें उलट ब्रह्मास्त्र सोडून तें शांत केलें. याप्रमाणें सर्व प्रयत्न व्यर्थ झालेले पाहून अश्वत्थामा फारच खजिल होऊन रणांगणांतून पळून गेला ! सूर्यास्ताचा समयहि जवळ आल्यामुळें उभयपक्षांच्या सेनापतींनीं युद्ध बंद करण्याचा नगारा वाजविण्यास आज्ञा केली; आणि दोन दिवस व एक रात्र एकसारखें युद्ध चालल्यामुळें थकलेलीं दोनहिं दळें आपापल्या छावण्यांत परत आलीं. ( द्रोणपर्व अ० १८६–२०४ )

---

# प्रकरण नववें.

—•*•—

## युद्धाचा शेवट,




रुक्षेत्राचे मैदानावर पंधरा दिवस सारखें घनघोर युद्ध झालें, आणि उभय पक्षांकडील अनेक रथी व हजारों सामान्य योद्धे पडले, खरे. परंतु कौरव–पक्षांकडील भीष्म, द्रोण, यांसारखे कसलेले वृद्ध वीर व अतिरथी रणांत पडले, त्या मानानें पांडवपक्षांपैकीं एकहि नांव घेण्यांसारखा योद्धा पडला नाहीं. यावरून पंधरा दिवसांच्या रणकंदनाचें बहुतेक यश पांडवांकडेच जात आहे, असें पाहून दुर्योधनास फार दुःख झालें. तथापि अझूनहि त्याचा विश्वास कर्णावर होता; आणि पांडवपक्षाची धुळधाण उडविण्याचें सामर्थ्य जर कोणामध्यें असेल तर तें कर्णांतच आहे, असें त्यास वाटत होतें. भीष्म–द्रोणांचे मागून शिल्लक राहिलेल्या कौरवसैन्यांचा सेनापति होण्यास कर्ण हाच योग्य आहे, असें दुर्योधनानें ठरविलें व ही मसलत इतर कौरव योद्धयांसहि–विशेषतः अश्वत्थाम्यास--पसंत पडलेली पाहून दुर्योधनास संतोष झाला. युद्धाचा सोळावा दिवस उजाडल्यावर ठरल्याप्रमाणें कर्णास कौरवसैन्याच्या सेनापतीचा अभिषेक करण्यांत आला. कर्ण

आपला शंख एकदां मोठ्या उत्साहानें वाजवून रथांत बसला व त्यानें विजय नांवाचें दिव्य धनुष्य हातीं घेतलें. तों कौरवशिबिरांत भेरी, नगारे, शंख यांचे ध्वनि निघून सर्व सेना तयार झाली. कौरवदळाचा मकरव्यूह रचून व आपण पुढें होऊन कर्ण रणांगणांकडे निघाला. इकडे अर्जुनानेंहि पांडवसेनेचा अर्धचंद्रव्यूह रचून कूच केलें. याप्रमाणें दोनहि दळें व्यवस्थेनें चाल करून रणभूमीवर येऊन भिडलीं; व दोघांसहि फार दिवस अत्यंत उत्कंठा लागलेलें कर्णार्जुनाचे अद्वितीय युद्ध सुरू झालें. प्रथमतः कांहीं वेळ पायदळाशीं पायदळ, स्वारांशीं स्वार, रथाशीं रथ, व हत्तीशीं हत्ती, याप्रमाणें भिडून व्यवस्थेनें युद्ध चाललें होतें; पण लवकरच हें समान युद्ध मोडून संकुल युद्ध सुरू झालें;व सर्व लढाईची गर्दी माजून राहिली अर्धचंद्रव्यूहाचे डाव्या टोकांस भीम होता, तो एका हत्तीवर बसून कौरवसेनेंत घुसला. त्याचे हत्तीवर क्षेमधूर्तीनें आपला हत्ती घातला; व या दोघां प्रबल वीरांचें भयंकर युद्ध झालें, आरंभीं बाण व नंतर भाले यांनीं युद्ध होऊन शेवटीं दोघे वीर हातघाईवर आले. अखेर भीमानें गदेच्या एका प्रचंड प्रहारानें क्षेमधूर्ती व त्याचा हत्ती या दोघांसहि यमसदनीं पाठविलें. !

रणभूमीच्या दुसऱ्या बाजूस अशीच निकराची लढाई चालून कौरव--पांडव वीराचीं द्वंद्वयुद्धें चाललीं होतीं. सात्यकीनें केकेय भाऊ भाऊ राजे विंदानुविंद, श्रुतकर्म्यानें चित्रसेन, प्रतिविंध्यानें धृतराष्ट्राचा नातु चित्र, अर्जुनानें मगध राजपुत्र दंडधार, अश्वत्थाम्यानें पांड्यराजा, नकुलानें म्लेंच्छराजा यांस गांठून व निकरानें द्वंद्वयुद्धें करून त्यांस ठार केलें ! यांशिवाय विशेष चुरशीचीं व रोमहर्षण युद्धें दुसरीकडे होतच होतीं. अश्वत्थामा व भीम यांचें त्या दिवशीं अपूर्व युद्ध होऊन दोघांनींहि पराक्रमाची शिकस्त केली. अखेर एकमेकांच्या बाणांनीं दोघेहि एकदम घायाळ होऊन रथांत बेशुद्ध होऊन पडले; तेव्हां सारथ्यानीं त्यांचे रथ बाजूस नेले. अर्जुन व अश्वत्थामा यांचेंहि रथ कांहीं वेळानें भिडून निकराचें युद्ध झालें. अखेर अर्जुनानें त्वरेनें लागोपाठ अमोघ बाण सोडून अश्वत्थाम्याचे बाहू, मांड्या, छाती व कपाळ यांवर एकदम जखमा केल्या; व घोड्यांच्या दोऱ्या तोडून त्याचा रथ उधळून लावला ! सहदेव व दुःशासन यांचेंहि रथ भिडून असेंच रणकंदन माजून राहिलें. या झटापटींत दुःशासन अखेर बेशुद्ध झाल्यामुळें सारथ्यानें त्याचा रथ दूर काढून नेला. कृतवर्म्यानें शिखंडीस असेंच एका युद्धांत मूर्छीत केलें. मध्यंतरीं सत्यसेन व अर्जुन यांची झटापट होऊन सत्यसेनानें एक तोमर श्रीकृष्णांचे भुजांवर टाकला. त्यामुळें त्यांचे हातां-

तून चाबूक व घोड्याच्या दोऱ्या सुटल्या. हें पाहतांच अर्जुनानें विशेष लगट करून त्याचें सपाट्यासरशीं एकाच अमोघ बाणानें शिर उडविलें ! **कर्ण** व **नकुल** आणि **धर्म** व **दुर्योधन** यांचीं युद्धें त्या दिवशीं सर्वांत अधिक भयंकर झालीं. **नकुल** व **कर्ण** यांचे रथ समोरासमोर येतांच **नकुल** आवेशानें म्हणाला:—‘ या सगळ्या अधर्माचें, वैराचें व कलहाचें आणि **कुरुकुलनाशाचें** मूळ तूं आहेस; तूं आज मज समोर आलास हें सुदैव म्हटलें पाहिजे. आज तुला युद्धांत ठार करून मी एकदांचा कृतकृत्य होतों, ’ **नकुल** कितीहि शूर असला तरी त्यानें **कर्णा**सारख्या कसलेल्या व पराक्रमी धनुर्धराशीं असलें भाषण करणें अनुचित होतें. **नकुलाचें** हें भाषण ऐकून **कर्ण** म्हणाला:— ठीक आहे; काय पराक्रम अंगीं असेल तो दाखीव.’ **खरे शूर पुरुष असतात ते पराक्रमाच्या वल्गना न करतां यथाशक्ति युद्ध करतात; व मग आपल्या शौर्याची व बळाची फुशारकी मारतात.** हं, ओढ धनुष्य; लवकरच मी तुझ्या डोळ्यांवरील धूर उतरतों. ’ अशी भाषणें होऊन उभयतांचें तुंबळ युद्ध सुरू झालें. बराच वेळपर्यंत दोघांची पराक्रमांत व शौर्यांत बरोबरी होत होती. पण शेवटीं **कर्णा**नें **नकुलास** निःशस्त्र व विरथ करतांच **नकुल** पळून जाऊ लागला. परंतु **कर्णा**नें पाठलाग करून त्यास गांठलें व त्याचे गळ्यांत धनुष्य अडकवून त्यास थांबवून **कर्ण** म्हणाला:—‘ **नकुला**, तुझी ती पोकळ बडबड आतां कोठें गेली ? यापुढें प्रबळ **कौरव**वीरांच्या वाटेस न जातां आपल्या तोडीच्या योद्ध्यांशीं लढत जा; किंवा मुकाट्यानें घरीं जा. अथवा **कृष्णार्जुनाच्या** आश्रयानें तरी असत जा. ’ असें म्हणून **कुंती**स दिलेल्या वचनाप्रमाणें **कर्णा**नें त्यास गळ्यांत अडकवलेल्या धनुष्यासकट सोडून दिलें ! **नकुल**हि अत्यंत खजिल व लाज्जित होऊन **युधिष्ठिराचे** रथांत गेला. कांहीं वेळानें **धर्म** व **दुर्योधन** या **पांडव–कौरव** राजांचे छत्रयुक्त रथ एकमेकांस भिडले. **धर्मा**नें पहिल्या सपाट्यासरसीं **दुर्योधनाचे** घोडे व सारथी ठार केला, ध्वज पाडला, धनुष्य व तरवार मोडली आणि **दुर्योधनास**हि घायाळ केलें ! **धर्म–दुर्योधनांचें** असें युद्ध चालू असलेलें पाहून **कर्ण, अश्वत्थामा, कृप** वगैरे **कौरव**धनुर्धर आणि **पांडव-पांचाल**वीर आपापल्या राजांचे कुमकेस येऊन अत्यंत निकरानें लढूं लागले; व दोन घटका तेथें तुमुल रणकंदन माजलें. अखेर **धर्म**राजानें **दुर्योधनावर** एक महाशक्ति सोडून त्यास रथांतच घायाळ व मूर्छित केलें. पण **भीमाची** प्रतिज्ञा लक्षांत आणून **धर्मा**नें हात आंखडून त्यास जिवंत जाऊं दिलें. नंतर कांहीं वेळ रणभूमीवर संकुल युद्ध होऊन सूर्यास्ताचा समय जवळ आल्यामुळें दोन्हीं सैन्यें आपापल्या छावण्यांत परत आलीं. ( कर्णपर्व अ० १—३० )

युद्ध आटोपून कौरवपक्षाचे सर्व योद्धे आपल्या शिबिरांत आल्यानंतर अर्जुनाचा वध करण्याची आपली प्रतिज्ञा आज सफळ झाली नाहीं, याबद्दल कर्णास वाईट वाटलें व त्वेषहि आला.

'अर्जुन आधींच दृढ, शूर व दक्ष असल्यामुळें व त्यांतले त्यांत श्रीकृष्ण त्यास प्रत्येक वेळीं सल्लामसलत देण्यास जवळ असल्यामुळें, आज त्यानें अस्त्रांचा मारा करून व आम्हां सर्वांस फसवून मजशीं भिडण्याचा प्रसंग युक्तीनें टाळला. परंतु आतां मी त्यास असला लपंडाव करूं देणार नाहीं. उद्यां मी अर्जुनाचा वध करीन किंवा तो तरी माझा करील, अशा निकरानें मी लढणार।' अशी सर्व राजांसमक्ष कर्णानें प्रतिज्ञा केली.

दुसरे दिवशीं सकाळीं कर्ण प्रथमतः दुर्योधनाचें शिबिरांत आला; आणि आपल्या पराक्रमाची फुशारकी मारून म्हणाला:—'शस्त्रास्त्रकौशल्य, शौर्य, धैर्य, पराक्रम इत्यादि गुणांत मी अर्जुनाहून मुळींच कमी नाहीं. त्याच्या गांडीव धनुष्याहूनहि अधिक योग्यतेचें असें विजय धनुष्य मजपाशीं आहे. इंद्रानें याच धनुष्यानें दैत्यांचा संहार केला व परशुरामानींहि याच धनुष्यानें एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली! या माझ्या गुरूनीं मजवर प्रसन्न होऊन हें धनुष्य मला दिलें आहे. अर्जुनाच्या धनुष्याची दोरी व त्याचे भाते आणि रथ हीं दिव्य असून त्यांना नाश व्हावयाचा नाहीं; व श्रीकृष्णासारखा अश्वविद्याकुशल वीरहि त्याचा सारथी आहे, या बाबतींत मात्र अर्जुन मजपेक्षां वरचढ आहे. यासाठीं आज उत्तम जातिवंत घोडे जोडलेले शेंकडों रथ माझे पाठोपाठ ठेवून उत्कृष्ट व पाणीदार बाणांनीं भरलेले अनेक गाडे माझे मागें ठेवण्याची व्यवस्था करा; विशेषतः सारथ्यकर्मांत श्रीकृष्णांची बरोबरी करणारा मद्राधिपति शल्य यास आज माझें सारथ्य करावयास सांगा; म्हणजे आजच मी अर्जुनाचा समाचार घेऊन युद्धाचा सोक्षमोक्ष करतों.' कर्णाचे या म्हणण्याप्रमाणें दुर्योधनानें शल्याकडे जाऊन व कर्णाच्या पराक्रमाची स्तुति केली; आणि माझ्यासाठीं शत्रूचा नाश करण्याकरितां आज कर्णाचें सारथ्य तुम्ही करा, अशी त्यानें शल्यास विनंति केली. ती ऐकून शल्य अतिशय रागावून त्यास म्हणाला:—' माझ्यासारख्या राजकुलांत उत्पन्न झालेल्या व मूर्धाभिषिक्त महारथ्यास या शूद्रतुल्य घमेंडखोर सूतपुत्राचें सारथ्य करण्यांस बिनदिक्कत सांगतोस याची तुला लाज वाटत नाहीं काय? माझ्यापेक्षां कर्ण अधिक शूर किंवा पराक्रमी आहे असें तुला वाटत असेल. पण मला युद्धांतलें जें काय काम सांगावयाचें असेल तें सांग; तेवढें एका क्षणांत करून मी आपल्या देशास परत जातों. असला

अपमान सहन करून तुम्हांस यापुढें साह्य करण्याची माझी इच्छा नाहीं. ' असें बोलून रागानें शल्य सभेंतून उठून जाऊं लागला. तो त्यास दुर्योधनानें आडवून धरलें व मोठ्या नम्रतेनें विनवून म्हटलें—' माझ्यापेक्षां व कर्णापेक्षां शौर्यपराक्रमादि गुणांनीं तुम्ही श्रेष्ठच आहां; तुम्हांमध्यें हे गुण कमी आहेत, म्हणून आम्ही सारथ्य करण्यास तुम्हांस सांगतों, असें नव्हें. कर्ण जसा अर्जुनापेक्षां श्रेष्ठ योद्धा आहे, त्याप्रमाणें तुम्ही कृष्णापेक्षां अश्वविद्या व सारथ्यकर्म यांत कुशल आहां. यासाठींच हें काम आम्ही तुम्हांस सांगत आहों.' इ० बोलून दुर्योधनानें शल्याचा राग घालविला. 'मला जें बरें वाईट वाटेल तें मी कर्णाला बोलेन; त्याबद्दल तूं किंवा कर्ण यांनीं विषाद मानतां उपयोगी नाहीं. एवढी अट मान्य असेल तर मी सारथ्य करण्यास तयार आहें ' असें शेवटीं शल्यानें सांगितलें व तें कर्णदुर्योधनांनींहि मान्य केलें.

याप्रमाणें सर्व सिद्धता झाल्यावर कर्ण व शल्य रथांत बसले; तेव्हां दुर्योधन कर्णास म्हणाला—'भीष्म व द्रोण हे भीमार्जुनांचा रणांत वध करून आम्हांस यश देतील, असा मला मोठा भरंवसा होता. परंतु त्यांसहि दुष्कर झालेलें हें कृत्य करून तूं सर्व पांडव ठार कर; किंवा अर्जुनाचा वध कर; निदान धर्मराजास जिवंत पकडून माझे स्वाधीन कर. जा, पांडवसैन्यांत घुसून त्यांची राखरांगोळी कर; तुझा विजय असो. '' असें म्हणून दुर्योधनानें त्यास निरोप दिला; आणि हजारों वाद्यांचें गजरांत व लाखों वीरांचे जयघोषांत कर्णाचा रथ चालूं लागला. कर्णानें पुनः आपल्या पराक्रमाची फुशारकी मारून, रथ पांडवसैन्यास नेऊन भिडीव म्हणजे आज माझें सामर्थ्य दाखवून पांडवांस यमसदनीं पाठवितों, असें शल्यास म्हटलें. तेव्हां त्यानें उत्तर केलें:--'अरे सूतपुत्रा, तूं पांडवांचा असा वारंवार अपमान कां करतोस ? अर्जुनाच्या गांडीवाचा टणत्कार जेव्हां तुझ्या कानीं येईल त्यावेळीं ही तुझी बडबड व आत्मस्तुति खास बंद पडेल. ' याप्रमाणें बोलाचालीस सुरवात होऊन कर्णाचा रथ पांडवांचे सैन्यास भिडेपर्यंत रथी व सारथी यांचेमध्यें भांडण होऊन तें विकोपास गेलें व कर्णास हा एक प्रकारचा अपशकुनच झाला ! आपल्या शौर्याची फुशारकी मारून, आज मी कृष्णार्जुनांस ठार करीन किंवा मी तरी भीष्म--द्रोणांचे मागून यमसदनीं जाईन, असें कर्ण म्हणाला ! तेव्हां शल्यानें उत्तर केलें, ' वनांत गंधर्वसैन्यानें तुम्हांस जर्जर केलें असतां प्रथमतः रणांतून तूंच पळून गेलास. आणि दुर्योधनास गंधर्व घेऊन जात असतां भीमार्जुनांनींच त्याची सुटका केली. त्यावेळीं किंवा उत्तरगोग्रहणाचे वेळीं तुम्हां सर्वांस

अर्जुनानें फजित केलें तेव्हां हें तुझें शौर्य व धैर्य कोठें गेलें होतें ? त्या प्रसंगीं जो तूं पराक्रम केलास तोच ना आज गाजविणार!' कर्णः--'अर्जुन व कृष्ण यांचा पराक्रम, बळ व शौर्य हीं जशीं मी ओळखतों, तसे माझेहि गुण मी जाणतों. पतंगानें अग्नींत पडावें तसें साहस मी करीत नसून स्वपरबळाबळ जाणूनच मी अर्जुनाशीं आज भिडणार आहें. जो स्वतः भ्याड आहे त्यास दुसऱ्याच्या शौर्याची पारख व्हावयाची नाहीं; व झाली तरी त्याचें त्यास भय वाटावयाचें! पण **जो खरा शूर आहे त्यासच शत्रूच्या शौर्य-पराक्रमाची परीक्षा होणार** व परीक्षा केल्यावर न भितां तोच त्याशीं लढणार ! तुझ्यासारख्या बाहेरून मित्रत्व दाखवून शत्रुची स्तुति व माझी निंदा मात्र करून भेवडावणाऱ्या आणि अत्यंत नीच जो मद्रदेश त्याजवर राज्य करणाऱ्या भ्याडास कृष्णार्जुनांच्या किंवा माझ्या पराक्रमाची खरी किंमत कोठून समजणार? तूं आपली माझ्यासारख्यांची निंदा करावी एवढेंच! पण हा कर्ण शत्रूला भिण्याला उत्पन्न झाला नसून पराक्रम करून यश व वैभव संपादावे यासाठींच माझा जन्म आहे, हें तूं पक्कें लक्षांत ठेव. असलीं भाषणें बोलण्याऱ्या तुझा मी क्षणांत वध केला असता; परंतु दुर्योधनाकडे पाहून व दिलेलें वचन लक्षांत आणून मी तुला जिवंत ठेवलें आहे. असें बोलून मद्रदेशांतील स्त्रीपुरुषांच्या घाणेरड्या व अनीतिमूलक चालीरीतींचें कर्ण निंदाप्रचुर वर्णन करूं लागला. तेव्हां शल्यानें उत्तर केलें:—" दुसऱ्यांनी टाकलेलें उष्टें खाऊन पुष्ट झालेल्या कावळ्याप्रमाणें धृतराष्ट्राच्या मुलांचीं उष्टीं राज्यें उपभोगल्यामुळें तूं मत्त व गर्विष्ठ होऊन मला टाकून बोलत आहेस. 'कर्ण हा पराक्रमी व शूर आहे खरा, परंतु तो रागीट व घमेंडखोर आहे; यामुळें त्याच्या शौर्याचा ऐनवेळीं उपयोग होणार नाहीं, असें भीष्म युद्धारंभीं म्हणाले तें लक्षांत ठेव. माझ्या मद्र देशाची तूं निंदा करतोस, तर तुझ्या देशांत तरी काय आहे ? आजाऱ्यांचा त्याग करणें आणि आपल्या बायकापोरांचा दासाप्रमाणें क्रयविक्रय करणें, हीं पातकें तुझे लोक करीत नाहींत काय ? प्रत्येक देशांत जसे चांगले तसे वाईट पुरुष व स्त्रिया या असावयाच्याच; त्यांवरून कोणतेहि समान्य सिद्धांत काढूं नये. **अनीति व पाप एकाच देशांत भरलें आहे व इतर देश सोज्ज्वल व पुण्यमय आहेत हा भ्रम टाकून दे.** " याप्रमाणें बाचाबाची होत असतां कर्णाचा रथ पांडवसैन्यानजीक असल्यामुळें व दुर्योधनानें मध्यस्ती केल्यामुळें हें भांडण मिटलें व युद्धास प्रारंभ झाला. (कर्णपर्व अ० ३१-४५ )

दोनहि सैन्यें एकमेकांस भिडून व एकमेकांवर तुटून पडून शस्त्रास्त्रांचा खणखणाट सुरू होण्यापूर्वीं कर्णानें कौरवसेनेचा दुर्भेद्य व्यूह रचला. व्यूहाचे उजवे बाजूस कृप, कृतवर्मा वगैरें वीरांस ठेवून त्यांचे पिछाडीस शल्याच्या स्वारांचें सैन्य उभें केलें. डाव्या बाजूस ३४ हजार संशप्तकांचे रथ ठेवून त्यांचे मागें कांबोज, शक, यवन इ० योद्धयांची योजना केली; व मध्यभागीं कर्णानें स्वतः ठाण मांडून आपल्या पिछाडीस दुःशासन, दुर्योधन, अश्वत्थामा वगैरे धनुर्धराचे रथ उभे केले. इकडे अर्जुनानेंहि आपल्या सैन्याचा व्यूह रचल्यानंतर दोहोंकडे वाद्यांचा तुमुल ध्वनि होऊन दोनहि सेना गंगायमुनेप्रमाणें एकमेकांत मिसळल्या व भयंकर कंदन सुरू झालें ! मागील वहिवाटीप्रमाणें संशप्तक योद्धयांनीं अर्जुनास वेढून टाकिलें; व लढत लढत त्यास इतर सैन्यापासून दूर नेलें. इकडे पांचाल, चेदी, संजय यांची कौरवांशीं लढाई सुरू झाली. कर्णानें पहिल्या सपाट्यासच भानुदेव, चित्रसेन वगैरे पांच पांचाल राजपुत्र ठार केले; भीमानेंहि कर्णाच्या एका पुत्राचें शिर उडवून त्याचें उसनें फेडलें! कांहीं वेळानें कर्ण व धर्मराजा याचे रथ एकमेकांस भिडले. 'कौरवांच्या आश्रयानें राहून तूं सूतपूत्र, आजपर्यंत आमचा द्वेष व अर्जुनाची स्पर्धा करीत आहेस. तुझ्या अंगीं जें कांहीं बळ, पराक्रम, शौर्य व आम्हांविषयींचा असेल तो सर्व आतां दाखीव. पराक्रमाची जी तुला घमेंड आहे ती मी आज नाहींशीं करितों., असें कर्णास म्हणून धर्मानें त्याजवर लागोपाठ दहा बाण सोडले. उभयतांचे मोठ्या, निकराचें युद्ध होऊन धर्मराजाचा बाण उजव्या बरगडींत लागून कर्ण रथात मूर्च्छित झाला; पण कांहीं वेळानें सावध होऊन त्यानें बाणांचा वर्षाव करून अखेरीस धर्मराजाचें कवच फोडून टाकिलें. तेव्हा धर्म आपला रथ कर्णापुढून काढून दुसरीकडे नेऊं लागला, पण कर्णानें त्यास लवकरच गांठलें. व त्याच्या खांद्यावर हात ठेवून हंसत हंसत म्हटलें:- 'अरे' तूं चांगल्या कुलांत उत्पन्न झालेला क्षत्रिय असून भ्याडासारखा जीव वांचविण्यासाठीं रणांतून पळून कसा जातोस ? मला वाटतें क्षात्रधर्मामध्यें तूं फारसा कुशल नसून वेदाध्ययन, यज्ञयाग वगैरेंचें ब्राह्मणी बळ मात्र तुझे अंगांत आहे. यासाठीं महायुद्धांत येऊं नको व अस्सल वीरास टोंचूनहि बोलत जाऊं नको. असें मर्मभेदक भाषण करून कर्णानें इतर पांडवांवर आपला रथ घातला. तेव्हां भीमानें त्यास बाणांनीं जर्जर करून अखेर त्यास घायाळ केलें व रथांत मूर्छीत पाडले; आणि कौरव सेनेंत घुसून विवित्सु, विकट, सह व क्राथ हे कौरवराजपुत्र ठार केलें. पुनः कर्ण सावध झाल्यावर त्याचा रथ भीमा-

च्या रथाशीं भिडला. या झटापटींत अखेर कर्णानें भीमास विरथ केलें, तेव्हां भीम हातांत गदा घेऊन कौरवांचे दळांत शिरला, आणि आपल्या गदेनें शकुनीचे घोडेस्वार व हत्ती यांस ठार मारण्याचा त्यानें सपाटा चालविला. याप्रमाणें हातघाईवर आलेलें हें युद्ध दोनप्रहरपर्यंत चाललें. इकडे अर्जुन व संशप्तक योद्धे यांचें घनघोर युद्ध चाललें होतें. संशप्तकांनीं–विशेषतः कोशल व गोपाळ योद्धे यांनीं–अर्जुनाचे रथाभोंवतीं फार लगट करून निकराचा मारा चालविला. तेव्हां अर्जुनानें नागास्त्र सोडिलें व नागांनीं सर्वांचे पाय बांधून टाकून त्यास कुंठित केलें. पण सुशर्म्यानें सुपर्णास्त्र सोडून सर्वांस नागबंधनापासून मुक्त केलें; व एक बाण सोडून अर्जुनाचें हृदयावर जखम करून त्यास मूर्छित पाडलें. परंतु सावध होतांच अर्जुनानें ऐंद्रास्त्र सोडून संशप्तक सैन्याचा फडशा उडविला. इकडे कृपाचार्यांवर पांडववीरांचा हल्ला झाला असतां त्यांनीं चित्रकेतूचा मुलगा सुकेतु यास ठार केलें; धृष्टद्युम्न व कृतवर्मा यांची झटापट होऊन तींत कृतवर्मा पराभूत झाला. अश्वत्थाम्यावर धर्मराजा, सात्यकि व पांच पांडव–राजपुत्र यांनीं एकदम हल्ला चढविला. यांत धर्म व अश्वत्थामा हे मोठ्या शर्तीनें लढले. परंतु अखेर एकमेकांच्या बाणांनीं घायाळ होऊन बेशुद्ध पडल्यामुळें सारथ्यांनीं त्यांचे रथ दूर नेले. धृष्टद्युम्न, कृतवर्म्याचा पराभव करून दुर्योधनावर चालून आला; व त्यानें लवकरच त्यास निःशस्त्र व विरथ केलें. रणभूमीचे दुसरे बाजूस कर्ण--भीमांचें घोर द्वंद्वयुद्ध चाललेंच होतें. इतक्यांत संशप्तकांचा पराभव करून अर्जुन कौरवांचे सैन्याकडे आला. कांबोज राजपुत्राला ठार मारून त्यानें अश्वत्थाम्यासहि मूर्छित केलें. सावध झाल्यानंतर त्यानें कर्ण व दुर्योधन यांचे समक्ष अशी प्रतिज्ञा केली कीं, आपल्या बापाचा अमानुषपणें वध करणाऱ्या धृष्टद्युम्नास ठार करीपर्यंत अंगांत घातलेलें चिलखत आपण काढणार नाहीं! कांहीं वेळानें कर्ण आणि सात्यकि व धृष्टद्युम्न यांचें निकराचें युद्ध सुरू झालें; अश्वत्थाम्यानें धृष्टद्युम्नास गांठून त्यांचे रथास आपला रथ भिडविला, व रागानें संतप्त होऊन त्यास म्हटलें:—'माझ्या बापाचा बेसावध असतांना खून करून, नीचा, जें तूं पातक केलेंस त्याचें प्रायश्चित्त मी आतां तुला देतों. तूं जर भ्याडाप्रमाणें लढाईतून पळून गेला नाहींस किंवा भागुबाईसारखा अर्जुनाचे मागें लपला नाहींस, तर आज मी तुला खास यमसदनीं पाठवितों!' यावर धृष्टद्युम्नानेंहि तितक्याच रागानें व आवेशानें उत्तर दिलें— 'तुझ्या बापाला ज्या तरवारीनें मीं मारलें ती तरवारच तुला यांचें उत्तर देईल. ब्राह्मणधर्म सोडून क्षत्रियकर्म करणाऱ्या ब्राह्मणाधम द्रोणास जर मीं ठार केलें, तर

तुझी-त्याच्या पोराची-माझे पुढें प्रतिष्ठा ती काय ? ' याप्रमाणें बोलाचाली होऊन दोघे वीर अतिशय त्वेषानें लढूं लागले; पण कोणाचा पराभव होईना. इतक्यांत धर्मराजाकडे जात असतां वाटेंत हें युद्ध पाहून अर्जुनानें अश्वत्थाम्यास मूर्छित केलें व धृष्टद्युम्नास त्याचे कचाट्यांतून मुक्त केलें. इकडे युद्धांत घायाळ झाल्यामुळें धर्म सैन्यापासून एक कोसावर रथ उभा करून विश्रांति घेत होता; त्याचेवर कर्ण व इतर कौरवयोद्धे यांचा निकराचा हल्ला झाला. त्याजपुढें टिकाव न लागल्यामुळें पांडवसेना सैरावैरा धावूं लागली; पण भीमानें तिला परतवून पुनः एकत्र केली व मोठा पराक्रम करून पांडवसैन्यास हुरूप आणला. तेव्हां कर्ण व शिखंडी, धृष्टद्युम्न व दुःशासन, भीम व दुर्योधन असे महावीर एकमेकांस भिडून आवेशानें पुनः लढूं लागले, अर्जुनाचा रथ वेगानें येत आहे, असें पाहून कौरवांनीं धर्मावर जास्त लगट केली. त्याचे मदतीस भीम व इतर पांडवयोद्धे जात असतां त्यांस कर्णानें आडवून धरले. अखेर कर्णानें तीन मोठे व अमोघ बाण धर्मराजावर सोडले; त्यांनीं छातींत जखमा झाल्यामुळें त्यानें आपला रथ शिबिराकडे वळविला. त्याजबरोबर नकुल--सहदेवहि जाऊं लागले. कर्णानें त्यांचा पाठलाग करून नकुल--सहदेवांस निःशस्त्र व विरथ केलें; आणि धर्माचाहि रथ मोडून त्याचे तें शिरस्त्राण उडविलें ! जेव्हां शल्य कर्णास म्हणाला--'अर्जुनास ठार मारण्याची प्रतिज्ञा केली असतां तूं धर्म, नकुल, सहदेव यांशींच कां लढत बसला आहेस ? अर्जुनास गांठून पराक्रम दाखीव किंवा तिकडे भीमाचे कचाट्यांत सांपडलेल्या दुर्योधनास तरी सोडीव. ' हें ऐकून कर्णानें त्यांस तेथेच सोडून रथ दुर्योधनाकडे नेवविला. धर्मराजा शिबिरांत येऊन बिछान्यावर विव्हळ होऊन पडला. कुशल शस्त्रवैद्यांनीं त्याचे अंगांतील बाण काढल्यावर त्यानें नकुल-सहदेवास भीमाचें कुमकेस पाठविलें. इकडे रणभूमीवर अर्जुनाचे रथास अश्वत्थाम्यानें अटकाव करून युद्ध चालविलें. पण थोड्यांच वेळांत अर्जुनानें त्याचा सारथि ठार करून व घोड्यांच्या दोऱ्या तोडून त्याचा रथ उधळून लाविला. कर्ण भार्गवास्त्र सोडून पांडवांच्या सैन्याचा संहार करीत होता; त्यास गांठून युद्ध करावें, असें अर्जुनाचे मनांत होतें. परंतु धर्मराजा घायाळ, व्याकुळ व लज्जित होऊन शिबिरांत गेला आहे. त्याचेकडे आधीं जावें, असें श्रीकृष्णांनीं सांगितल्यामुळें ते दोघे त्वरनें आपल्या शिबिरांत आले. ( कर्णपर्व अ० ४६--६४ )

रथांतून खालीं उतरून कृष्णार्जुनांनीं धर्माकडे जाऊन त्यास नमस्कार केले. कर्णास मारून विजयी होऊन हे दोघे आनंदाची बातमी सांगण्यास आपणांकडे

येत आहेत, असें वाटून धर्मराजास अतिशय हर्ष झाला. जो अत्यंत शूर, अभिमानी व पराक्रमी असून जो कौरवांचा मुख्य आधार होता; ज्याच्या भीतीमुळें आपणांस वनवासांत दिवसा सुख व रात्रीं निद्रा मिळाली नाहीं; द्रौपदीस भरसभेंत ओढून आणण्याची ज्यानें प्रथमतः कल्पना काढली; आणि ज्यानें सर्व राजे व आप्त जन यांचे समक्ष पांडवांस ' षंड-तिळ ' वगैरे मर्मभेदक भाषणांनीं दुःख दिलें; भीष्म, द्रोणादिकांनींहि जें केलें नाहीं तें करून ज्यानें आपणास पराभूत केलें व आपलें शिरस्त्राण उडविलें; आणि विशेषतः धृष्टद्युम्न, नकुल, सहदेव आणि पांडवपुत्र यांचे देखत आपणांस जीवदान देऊन इतकें फजित व लज्जित केलें कीं, आपणाला राज्य व प्राण यांचाहि वीट आला; तो कर्ण अर्जुनानें रणांत मारला असें वाटतांच धर्मास अत्यानंद झाला; व 'त्यास कसें मारलें तें मला त्वरित सांग ' असें तो अर्जुनास मोठ्या हर्षानें पुसूं लागला. तेव्हां अर्जुनानें उत्तर केलें-" आधीं संशप्तक वीर व नंतर अश्वत्थामा यांशीं युद्ध करण्यांत माझा वेळ गेला; पुढें कर्ण मजवर चालून आला, परंतु अश्वत्थामा व कर्ण यांच्या बाणांनीं घायाळ होऊन तुम्ही शिबिरांत परत आल्याचें ऐकून तुमचें दर्शन घेण्यासाठीं कर्णास तेथेंच सोडून मी इकडे आलों आहे. तुम्ही मला आशीर्वाद देऊन युद्धचमत्कार पाहाण्यास या. मी आजच-भीमसेनास कौरवांनीं घेरलें नाहीं; तोंच--त्याचा वध करतों, " हें एकून धर्मराजास अत्यंत दुःख झालें; व विशेष आश्चर्य हें कीं त्यास कधीं न येणारा रागहि अतोनात आला. तो म्हणालाः—" मी एकट्या कर्णाचा युद्धांत वध करीन " असें द्वैतवनांत आम्हांस वचन देऊन तूं आतां एकट्या भीमास कौरवसैन्यांत सोडून कर्णाशीं न लढतां भ्याडसारखा परत आलास काय ? तुझा पराक्रम, शौर्य व उत्साह यांचा आम्हांस कांहींच उपयोग झाला नाहीं ! कुंतीच्या पोटीं येऊन तूं तिला व्यर्थ शिणविलेंस. तुजवर आम्हां सर्वांचा भार असतांहि तूं आम्हांस निराश केलेंस. धिक्कार असो तुझ्या गांडीव धनुष्यास, त्या अक्षय्य भात्यांस व तुझ्या पराक्रमास तुझ्याहून जास्त शस्त्रास्त्र कुशल व शूर अशा दुसऱ्या एकाद्या वीरास तें गांडीव धनुष्य देऊन तरी टाक !" धर्मराजाचें हें भाषण ऐकून अर्जुनास अतिशय संताप येऊन तो म्यानांतून तरवार उपसून धर्माकडे जाऊं लागला. पण अर्जुनाच्या संतापाचा रोख ओळखून श्रीकृष्ण त्यास म्हणाले—" अर्जुना, म्यानांतून तरवार उपसण्याचें कारण काय ? धर्मराजा घायाळ झाला आहे, त्यास पाहाण्यास म्हणून तूं येथें आलास. युधिष्ठिरास पाहिलेंस; त्यास फारशा जखमा झाल्या नाहींत हेंहि तुला कळलें. तर अशा

आनंदाच्या वेळीं तूं कोणाचा वध करण्यासाठीं खड्ग हातीं घेतलेंस ! येथें तर तुझा कोणी शत्रु दिसत नाहीं. तुला भ्रम तर झाला नाहीं ? " हें ऐकून **अर्जुनानें** उत्तर केलें;--" **गांडीव** धनुष्य दुसऱ्यास दे ' असें जो मला **म्हणेल** त्याचें शिर उडवावयाचें, अशी माझी प्रतिज्ञा आहे. **श्रीकृष्णा**, तुझ्यासमक्ष **धर्म**राजा असें मला म्हणाला असल्यामुळें मी त्याचा वध करणार; या अपराधाची क्षमा मला करिता येत नाहीं." **अर्जुनाचें** हें भाषण ऐकून **श्रीकृष्णांनीं** त्यास बोध केला; व धर्म–अधर्म, सत्य — असत्य इत्यादि नीतितत्त्वांचें मार्मिक विवेचन करून **अर्जुनाचा भ्रम दूर** केला. अहिंसा हा **धर्म** सर्वांत श्रेष्ठ असून त्यासाठीं प्रसंगीं थोडासा प्रतिज्ञाभंग किंवा असत्य भाषण झालें. तरी तें पाप नसून **पुण्यच** आहे. **धर्म**राजा हा तुझा वडील भाऊ आणि धर्मनिष्ठ राजा असून प्रतिज्ञा पाळण्यासाठीं त्याचा वध करणें अनुचित होय, असें **श्रीकृष्णांनीं अर्जुनास** सांगितलें व तें त्यासहि पटलें. परंतु भ्रातृवधाचें पातक लागूं नये व प्रतिज्ञाभंगहि होऊं नये अशी एकादी युक्ति सुचविण्याची त्यानें **श्रीकृष्णास** विनंति केली. **वडील माणसांस ' अरे तुरे ' म्हणून त्यांचा अपमान करणें म्हणजे त्यांचा वध करण्यासारखेंच आहे;** यासाठीं **धर्मास** तसें म्हणून व त्याशीं कठोर भाषण करून तूं त्याचा उपमर्द केलास म्हणजे भ्रातृवध व प्रतिज्ञाभंग हीं दोन्हीं टळतील, अशी **श्रीकृष्णांनीं** त्यास मसलत सांगितली. त्याप्रमाणें **अर्जुन धर्म**राजाजवळ जाऊन त्यास म्हणाला:— 'रणभूमीपासून कोसभर दूर रहाणारा तूं भ्याड, तुला माझ्या गांडीव धनुष्याचा व शौर्याचा धिःकार करण्याचा काय अधिकार आहे ? निःशस्त्र व विरथ झाला, तरी हातीं गदा घेऊन शत्रूंचे सैन्यांत घुसून त्याचा संहार करणाऱ्या वीरश्रेष्ठ **भीमास** मात्र मला कठोर बोलण्याचा अधिकार आहे. **भीमाचा** हा पराक्रम तुझे हातून कोठून होणार ! तुझ्या हितासाठीं आम्हीं आपलीं बायका मुलें किंबहुना स्वतःचे प्राणहि खर्ची घालण्यास तयार असूनहि, **द्रौपदीच्या** अंथरुणावर स्वस्थ लोळत तूं माझी निर्भर्त्सना करीत आहेस; असल्या निष्ठुर भावापासून आम्हांस सुख कोठून मिळणार ? **द्यूतासारखें आर्यांस काळिमा आणणारें दुसरें कांहीं दुष्ट व्यसन नाहीं,** हें माहीत असूनहि हें पापकर्म तूं केलेंस. आणि आतां तें विसरून शत्रूंस जिंकण्याचा भार मात्र तूं आमचेवर टाकीत आहेस ? द्यूत खेळणारा तूंच आहेस; व त्यामुळें आम्हांवर आलेलीं संकटें, राज्यनाश प्राणहानि व कुलक्षय या सर्वांचा दोष व पातक तुझेंच माथीं आहे. उगाच निष्ठुर भाषणें करून मला

संताप आणूं नको." प्रतिज्ञा पाळण्यासाठीं आपल्या वडील भावास, याप्रमाणें बोलून अर्जुन अतिशय लज्जित झाला व त्या दुःखाचे आवेशांत धर्मराजास मारण्यासाठीं बाहेर काढलेल्या तरवारीनें आपलाच शिरच्छेद करून घेऊं लागला! 'तेव्हां भ्रातृवधापेक्षांहि आत्महत्येचें पातक अधिक घोर असून त्यामुळें जास्त भयंकर नरक प्राप्त होईल; तुला आत्महत्याच करावयाची असेल तर आपल्याच तोंडानें आपले गुणांची प्रसंसा कर, म्हणजे झालें. **कारण आत्मश्लाघा करणारास आत्महत्येचें पातक लागतें,** असें शास्त्राचें वचन आहे!' अशी श्रीकृष्णांनीं त्याची समजूत केली. तेव्हां अर्जुनानें आपलें धनुष्य हातीं घेऊन, माझ्याइतका पराक्रमी व शूर धनुर्धर जगांत दुसरा कोणी नाहीं; माझी बरोबरी कोणी केलीच तर ती एकटे शंकरच करतील इ० प्रकारें त्यानें आपल्या शौर्याची बढाई मारली. अर्जुनाचीं हीं भाषणें ऐकून कोमल अंःकरणाच्या धर्मराजास अतिशन वाईट वाटलें; व अंथरुणावरून उठून तो म्हणालाः—' अर्जुना तूं म्हणतोस तेंच खरें आहे. माझ्यामुळेंच संकटें आलीं व तुम्हांस हालअपेष्टा सोसाव्या लागल्या. यासाठीं कुलांगार व अधमाधम असा जो मी त्याचा एकदांचा शिरच्छेद कर. माझ्यासारखा पापी, व्यसनी, मूर्ख, आळशी, भ्याड व षंढ पुरुष राजा होण्यास नालायक असून एकटा भीमच सिंहासनावर बसण्यास योग्य आहे. यासाठीं मला आपला पुनः वनवासांत जाऊं द्या.' असें म्हणून धर्मराजा उठून तंबूचे बाहेर जाऊं लागला. पण त्यास थांबवून श्रीकृष्ण म्हणालेः—" जो कोणी आपणास गांडीव धनुष्य दुसऱ्यास देण्यास सांगेल त्याचा वध करावयाचा, ही अर्जुनाची प्रतिज्ञा तुम्हांस माहीतच आहे; ती प्रतिज्ञा खरी करण्यासाठीं व माझे सांगण्यावरून अर्जुनानें तुम्हांस अरे तुरे म्हणून असें निष्ठुर भाषण केलें आहे. कारण,

**गुरूणामवमानो हि वध इत्यभिधीयते।**

**वडिलांचा अपमान करणें म्हणजे त्यांचा वध करण्यासारखें आहे!** प्रतिज्ञा पाळण्यासाठीं केलेल्या अमर्यादेबद्दल आम्हां दोघांस क्षमा करा. कर्णाबद्दल तुम्हांला भीति नको आहे. पापी कर्णाचें रक्त आज रणभूमि खास प्राशन करील, यांत संशय नाहीं." असें म्हणून श्रीकृष्णांनीं व अर्जुनानें धर्माचे पायावर डोकें ठेवलें. एवढ्यानें धर्मराजाचा राग व दुःख नाहींसें होऊन त्यानें श्रीकृष्णास उठविलें व अर्जुनास आलिंगन देऊन त्याचें सांत्वन केलें. शेवटीं 'आज कर्णाचा वध केल्यावांचून रणांतून मी परतच फिरणार नाहीं' असें म्हणून त्यानें धर्मास

नमस्कार केला; व धर्मराजाचा आशीर्वाद घेऊन कृष्णार्जुन रथांत बसून पुनः रणभूमीकडे निघाले. ( कर्णपर्व अ० ६५–७१ )

आपण केलेली ही प्रतिज्ञा कशी शेवटास जाईल याची अर्जुनास चिंता पडून त्याचे तोंडावर घामाचे बिंदु उभे राहिले आहेत, असें श्रीकृष्णांनीं पाहिलें, तेव्हां त्याला उत्साह व त्वेष आणण्यासाठीं श्रीकृष्ण म्हणाले:—" या प्रतिज्ञेसंबंधानें तूं चिंता करूं नकोस; भीष्म, द्रोण, भगदत्त वगैरे वीर ज्यानें मारले त्यानें कर्णाबद्दल काळजी करण्याचें कारण नाहीं. तथापी कर्णाला तूं यःकश्चितहि समजूं नकोस. शौर्य, पराक्रम, बल, अस्त्रविद्या इत्यादिकांत तो तुझी बरोबरी करणारा किंबहुना थोडासा अधिकच आहे; यासाठीं मोठ्या दक्षतेनें युद्ध कर. लाक्षागृहांत तुम्हांला जाळण्याचा झालेला प्रयत्न, कपटद्यूत, सभेंतील छळ व निष्ठुर मर्मभेदक भाषणें या सर्वांचें मूळ कर्ण आहे. तो पांडवास जिंकील असा कौरवांस भरंवसा आहे; व त्या भरंवशावरच दुर्योधनानें युद्धास प्रारंभ केलेला आहे. हें लक्षांत आणून व सहा कौरव महारथींनीं एकट्या अभिमन्यूस गांठून त्याचा वध केला हें लक्षांत घेऊन, आज या सर्व पापांचें कर्णास प्रायश्चित्त दे." या भाषणानें अर्जुनाची चिंता दूर होऊन त्याला हुरूप व आवेश आला ( कर्णपर्व अ० ७२–७४ )

धर्मराजाचे दर्शनास कृष्णार्जुन निघून गेले असतां युद्धाचा सर्व भार एकट्या भीमावरच पडला होता; तरी त्यानें पराक्रमाची शर्थ करून कौरवसैन्याचा सारखा संहार चालविला होता. अर्जुन प्रथम सैन्यांत आला, तों त्यानें भीमाकडे जाऊन त्यास धर्म सुखरूप असल्याचें कळवून शत्रूंकडे रथ वळविला. त्याचे पाठोपाठ भीमहि कौरवसैन्यांत शिरला. भीमानें शकुनीस मूर्छित करून भूमीवर पाडलें असतां, त्यास आपल्या रथांत घालून दुर्योधन पळून जाऊं लागला; तोंच कौरव सेनेनेंहि तोच मार्ग स्वीकारला ! पण कर्णानें ही सेना थोपवून धरून आपला रथ पांचालसैन्यावर घातला आणि पांचहि पांडवपुत्र विरथ करून पांडवसेना पराभूत केली. अशा प्रकारच्या किरकोळ युद्धांतून रथ काढून तो खुद्द कर्णावर घालण्यास अर्जुनानें सांगितलें असतां श्रीकृष्ण कर्णाकडे रथ नेऊं लागले अर्जुनाचा तो कपिध्वजयुक्त रथ वेगानें आपणाकडे येत आहे, असें पाहून कर्ण शल्यास म्हणाला:--"हा पहा, आतां अर्जुनाचा रथ मजकडेच येत आहे. आज मी त्यास ठार मारल्यावांचून परत फिरणार नाहीं. युद्धांत नेहमीं एकाच पक्षाला जय येणें शक्य नाहीं; तथापि,

कृतार्थोऽद्य भविष्यामि हत्वा वाप्यथवा हतः ॥

त्याला मारून किंवा मी तरी मरून आज खास कृतकृत्य होणार!" याप्रमाणें बोलून कर्णानें दुर्योधनाकडे येऊन त्याजकडून अर्जुनास अडथळा करण्यासाठीं त्याजवर चतुरंग सैन्य पाठविलें. परंतु अर्जुनाच्या बाणवृष्टीमुळें त्याचा इलाज चालेनासा होतांच कृप, भोज, अश्वत्थामा व दुर्योधन हे त्याचेवर चालून गेले. परंतु त्यांसहि लवकरच पराभूत करून कौरवसैन्यास डावी घालून अर्जुनाचा रथ कर्णाकडे वेगानें जाऊं लागला; त्याच्या पाठोपाठ भीमसेनहि होताच. अर्जुनानें संशप्तक, म्लेंछ वगैरे योद्ध व भीमानें हत्तींचें सैन्य यांचा भयंकर संहार सुरू केल्यामुळें ही सर्व फौज पळत जाऊन कर्णाचे आश्रयास राहिली.

कर्णाचे रथाकडे जसजसे भीमार्जुन येऊं लागले तसतसें युद्ध अधिक तुंबळ व निकराचें होऊं लागलें. कैकेयपुत्र, कैकेयसेनापति व धृष्टद्युम्नाचा मुलगा यास या झटापटींत कर्णानें यमसदनीं पाठविलें; त्याचाहि एक मुलगा पांडवांकडील वीरांच्या बाणांस बळी पडला. याप्रमाणें अपूर्व रणसंग्राम चालला असतां भीम व दुःशासन यांचे रथ समोरासमोर आले! त्यांस पाहतांच भीमाच्या त्वेषास व आवेशास पारावार राहिला नाहीं. त्यानें पहिल्या सपाट्यांसच त्याचें धनुष्य तोडलें व ध्वज मोडला, सारथ्याचें शिर उडविलें आणि बाण मारून त्याचे कपाळावर मोठी जखम केली पण दुःशासनानें दुसरें धनुष्य घेऊन व रथ स्वतः संभाळून एक अमोघ बाण हातीं घेतला; व तो भीमसेनावर सोडून त्यास इतकें मूर्छित केलें कीं, तो हातपाय पसरून रथांत मृतवत् पडला! परंतु लवकरच सावध होऊन भीमानें भयंकर गर्जना केली व दोघांचें अति त्वेषाचें युद्ध सुरू झालें. दुःशासनासारखा नीच शत्रू समोर भिडला असतां असलें युद्ध करणें अयोग्य असें वाटून द्रौपदीच सभेंतील छळ, दुःशासनानें तिचे ओढलेले केंस व हिसकवलेलें वस्त्र यांची आठवण होऊन, हातांत गदा घेऊन भीमानें रथाखालीं उडी टाकली; व प्रचंड सिंहनाद करून तो म्हणाला:---"दुःशासना, आतां माग माझ्या गदेचा प्रहार सहन कर, कौरवाधमा, आतां तुला भूमीवर लोळवून व तुझें वृक्षःस्थल विदारण करून मी तुझें रक्त प्राशन करतों पहा! कर्णा, दुर्योधना, कृपाचार्य, अश्वत्थामा, मी आतां दुःशासनाचें रक्त पिणार! तुम्ही किंवा जे कोणी वीर असतील त्यांनीं या वेळीं छाती असेल तर त्याचे संरक्षणास यावें." असें बोलून कौरवसैन्याचा संहार करीत तो एका क्षणांत दुःशासनाचे रथाजवळ पोंचला. त्यानें झपाट्यासरशीं त्याला रथाखालीं ओढून जमीनीवर पाडलें; आणि त्याच्या नरडीवर पाय देऊन

दुर्योधनादि कौरवांसमक्ष तो म्हणालाः--' अधमाधमा, मी तुझ्या वृक्षःस्थळांतील रक्त काढून आतां प्राशन करतों; पुन्हां आतां आपल्या तोंडानें 'गौः गौः' असे शब्द उच्चार पाहूं ! ' असें म्हणून तरवारीनें त्याचा कंठ व वृक्षःस्थल कापून काढून भीम तेथील ऊन ऊन रक्त ओंजळ भरून पीत पीत म्हणाला:--" उत्कृष्ट मध, दूध, दहिं किंवा इतर मधुर रस, माझ्या कुंतीमातेचें दूध किंबहुना स्वर्गांतील अमृतरस या सर्वांपेक्षां दुःशासनाचें हें रक्तच मला अधिक मधुर लागत आहे ! काय करूं रे ! तुला मृत्यु आल्यामुळें तूं निर्भय झालास ! " भीमसेनाचें हें भयंकर व अमानुष कृत्य पाहून कौरवसैन्य भयानें पळूं लागलें, कित्येकांनीं डोळें मिटले व कित्येकांचे हातांतील शस्त्रें गळलीं ! भीम--दुःशासनांचें इकडे युद्ध चाललें असतां कर्णाचा भाऊ चित्रसेन यास युधामन्यूनें ठार केलें. ( कर्णपर्व अ० ७५--८३ )

दुःशासनाचा असा वध झालेला पाहून दहा कौरव भीमसेनावर चालून आले; परंतु त्या सर्वांसहि त्यानें दुःशासनाचे मागोमाग पाठविलें ! इकडे नकुल व कर्णाचा मुलगा वृषसेन यांचें निकराचें युद्ध चाललें होतें. वृषसेनानें नकुलाचा सारथि व घोडे ठार करून त्याचा रथहि मोडला; हातांत तरवार घेऊन नकुल लढूं लागतांच तीहि वृषसेनानें तोडून टाकली; व त्याचे हृदयावर एक बाण मारून त्यास जखमी केलें. तेव्हां नकुल भीमाचे रथावर चढला. पांच पांचाळ राजपुत्र व पांच द्रौपदीपुत्र यांनीं वृषसेन, शकुनि, अश्वत्थामा इत्यादि कौरवांशीं लगट करून नेटानें युद्ध चालविलें. नकुलपुत्र शतानिक यानें कुलिंद राजपुत्र ठार केला. इतक्यांत अर्जुनानें एका सपाट्यांस वृषसेनाचें शिर व दोन हात उडवून त्याचा वध केला ! आपला प्रिय व शूर पुत्र मारल्याचें पाहून त्याचा सूड उगाविण्याकरितां कर्णानें आपण होऊनच अर्जुनाकडे आपला रथ हांकविला. कर्णाचा रथ आपणांकडे येत आहे असें पाहून श्रीकृष्णांनीं अर्जुनाच्या शौर्य-धैर्य पराक्रमाची स्तुति करून व महादेवाचे प्रसादामुळें कर्णवध करण्यास तूंच एकटा समर्थ आहेस, असें सांगून त्यास हुरूप आणला. परंतु कर्ण हा महापराक्रमी, शास्त्रवेत्ता व शूर धनुर्धर असून त्यासारखा दुसरा योद्धा तुजवांचून कोणी नाहीं; यासाठीं स्थिर होऊन दक्षतेनें युद्ध कर, अशींहि श्रीकृष्णांनीं त्यास इशारत केली. इतक्यांत कर्णार्जुनांचे रथ एकमेकांस भिडले ! दोघांचेहि पांढरे घोडे, श्रीकृष्ण व शल्य, सारथि, कपिध्वज व हस्तिध्वज आणि अर्जुनकर्ण याप्रमाणें एकमेकांस भिडून एकमेकांकडे नजर रोखून उभे राहिलेले पाहतांच दोहों सैन्यांत वाद्यांचा

एकच तुमुल ध्वनि होऊन सर्वांनीं जयघोष केला! द्रौपदीचा छळ व अभिमन्यूचा वध अर्जुनाच्या डोळ्यापुढें मूर्तिमंत उभा राहून त्यास क्रोध व आवेश चढला. कौरवपक्षांकडील दुर्योधन, भोज, शकुनि, कृप, व अश्वत्थामा या पांच महारथींनीं युद्ध सुरूं करून अर्जुनावर बाणांची वृष्टि केली; पण त्या सर्वांचा त्यानें लवकरच पराभव करून त्यांच्या सैन्याचा फडशा उडविला. तेव्हां अश्वत्थामा दुर्योधनाकडे येऊन त्यास म्हणाला:—'राजा, आतांपर्यंतच्या युद्धांत अर्जुनाचा पराक्रम दिसून आलाच आहे. एवढ्यावरच थांबून पांडवांशीं सख्य कर व त्यांचें राज्य त्यास परत दे. भीष्म-द्रोणांसारखे अतुल धनुर्धर बळी पडले असून लक्ष वधि क्षत्रिय मरण पावले, तेवढे पुरे नाहींत काय? लोकांच्या हितासाठीं तरी आतां हें युद्ध थांबीव; म्हणजे शिल्लक राहिलेले क्षत्रिय स्वदेशीं परत जातील. मीं सांगितलें असतां कर्ण व अर्जुन युद्ध बंद करतील; श्रीकृष्णहि यास आड येणार नाहीं. धर्मराज तर भूतदयेची मूर्ति असून भीम त्याचे आज्ञेंत वागणारा आहे. यासाठीं तूं जर ऐकशील तर सख्य आतांच होईल; नाहीं तर रणांत पडल्यावर मग मात्र पश्चात्तापाची पाळी येईल!" अश्वत्थाम्याची ही मसलत दुर्योधनास अर्थातच पसंत पडली नाहीं. "पांडवांचें आम्हीं इतकें वैर व द्वेष केला आहे कीं, तो ते कधींहि विसरणार नाहींत. तसेंच मोठ्या नव्या नवसानें अर्जुन भिडला असतां कर्ण युद्ध बंद करण्यास कधींहि तयार व्हावयचा नाहीं. शिवाय दुःशासनास ठार मारतांना भीमानें जें मर्मभेदक भाषण केलें, तें माझ्या हृदयांत शल्यासारखें बोचत आहे. तें शल्य सख्य केल्यानें निघणार नाहीं." याप्रमाणें उत्तर देऊन दुर्योधनानें त्यास परत लावलें. याच सुमारास शिबिरांत जखमांस औषधोपचार करवून धर्मराजा रथांत बसून युद्धचमत्कार पाहण्यास आला. कर्णानें पहिल्या नमनालाच अर्जुनास दहा बाण मारून युद्धास सुरवात केली. नंतर या दोघां समसमान योद्ध्यांचे निकरानें अस्त्रयुद्ध होऊं लागलें. अर्जुनानें अस्त्र सोडावें तों कर्णानें दुसरें उलट अस्त्र सोडून तें निष्फळ करावें, असें होऊं लागलें. कर्णानें श्रीकृष्णाचें कवच फोडून टाकलें असतां अर्जुनानें एक अमोघ बाण मारून कर्णास मूर्छित केलें, व त्याच्या रथाभोंवतालचें २००० वीर रणांत पाडले! खांडवनांत अर्जुनाच्या तडाक्यांतून वांचलेला अश्वसेन नाग योगबलानें कर्णाच्या एका बाणांत कर्णास न कळत शिरला होता. कर्णानें सावध होऊन फार दिवस जपून ठेवलेला हा अमोघ बाण हातीं घेतला व 'हतोसि वै फाल्गुन' (अर्जुना, हा ठार झालास पहा) असें म्हणून तो सोडला! हा भयंकर बाण येत

आहे असें पाहून **श्रीकृष्णांनीं** रथ एक वीत खालीं करून घोड्यांसहि गुडघे टेकाव यास लावलें; त्यामुळें या बाणानें **अर्जुनाचें** शिर न उडतां त्याचा देदीप्यमान किरीट मात्र उडाला ! **अर्जुन** डोकीस पांढरा फेटा बांधून **पुनः** लढूं लागला. **अश्व-सेन** नाग पुनः **अर्जुनावर** आपण होऊन चालून आला, पण त्यानें बाणांनीं त्याचे तुकडे उडविले ! आणखी कांहीं वेळ निकरांचें युद्ध होऊन **कर्णाचे** हृदयावर जखम होऊन तो मूर्छित पडला. तो अशा स्थितींत असलेला पाहून **अर्जुनानें** क्षत्रियधर्माप्रमाणें युद्ध थांबविलें; तेव्हां **श्रीकृष्ण** त्याला म्हणालेः—' **कर्णा**सारखा योद्धा अशा रीतीनें मरणार नाहीं. अशा प्रकारचा शत्रु संकटांत सांपडला असतां ती संधि साधूनच त्याचा वध केला पाहिजे. **कृष्णार्जुनाचें** असें भाषण चालू असतांच **कर्ण** सावध झाला ; व पुनः दोघे धनुर्धर त्वेषानें लढूं लागले. इतक्यांत **कर्णाच्या** रथाचे डावें चाक भूमींत जाऊं लागलें ! तें वर काढण्यासाठीं **कर्ण** रथांतून खालीं उतरला; आणि **अर्जुनास** म्हणालाः— " रथाचें चाक मी वर काढतों, तोंपर्यंत एक घटकाभर मजवर बाण टाकूं नको. जो अशस्त्र असेल त्याजवर शस्त्र चालवूं नये, असा क्षात्रधर्म आहे. तूं जितका शूर आहेस तितकाच युद्धधर्म जाणणारा आहेस. तूं रथांत असून मी भूमीवर निःशस्त्र उभा आहे. अशा स्थितींत मजवर तूं बाण टाकणें उचित नाहीं. मी तुला किंवा **श्रीकृष्णाला** भितों असें नव्हें; तर केवळ क्षात्रधर्म जाणून तूं क्षणभर थांब. " **कर्णाचें** हें भाषण ऐकून **श्रीकृष्णांनीं** आवेशानें उत्तर केलें:—" कर्णा, आतां मात्र तुला धर्माची बरी आठवण झाली ? **नीच मनुष्य संकटांत सांपडला असतां आपल्या दुष्कृत्यास दोष न देतां दैवाचे नांवानें खडे फोडीत असतो,** तसें तुझें आतां झालें आहे. **भीमाला** विष घालून त्याचे अंगास तुम्ही साप **डसविले** तेव्हां तुझा धर्म कोठें गेला होता ? **पांडव वार**णावतनगरांत लाक्षागृहांत निजले असतां त्या घराला आग लावली, तेव्हां तुला हा धर्म कसा सुचला नाहीं ? द्यूतां-त विशेष प्रवीण नसलेल्या **धर्मास** द्यूतकुशल **शकुनीनें** कपटानें जिंकलें, तेव्हां **धर्माची** तुला कशी आठवण झाली नाहीं ? **द्रौपदी** एक वस्त्र नेसलेली व रजस्वला असतां तिला भरसभेंत ओढून आणून वडील माणसें, राजे लोक व तिचे पति यांचे समक्ष तिची तुम्हीं विटंबना केलीं; ' **पांडव** मेले, नरकास गेले. **द्रौपदी**, आतां दुसरे नवरे कर' असलीं मर्मभेदक भाषणें तिला तूं बोलालास, त्यावेळीं **कर्णा** तुझा हा धर्म कोठें गेला होता ? वनवास व अज्ञातवास शर्तीप्रमाणें पुरा करून **पांडव** आपलें राज्य परत मागत असतां तुम्ही त्यांस तें देत नाहीं, हें धर्मकृत्यच काय ?

बाल योद्धा जो अभिमन्यु त्या एकट्यास तुम्हीं सहा महारथ्यांनीं वेढून त्याचा वध केलात त्यावेळीं मात्र तुला क्षत्रियधर्माची आठवण कां झाली नाहीं ? आजपर्यं कव्हांहि जर तुम्हीं धर्म पाळला नाहीं, तर आतां धर्माच्या गप्पा मारून आपला घसा कां कोरडा करून घेतोस ? तुम्ही पांडवांचें राज्य कपटानें व लोभानें प्रेरित होऊन हिरावून घेतलें; पण पांडव उघड युद्ध करून तुम्हांस ठार मारून पराक्रमानें आपलें राज्य परत घेणार.'' ''श्रीकृष्णांचें हें भाषण ऐकून कर्णाचें अंत:करण, दुःख, लज्जा व संताप यांनीं भरून येऊन तो तसाच रथावर चढला; आणि पुनः दोघा धनुर्धरांचें युद्ध सुरू झालें. आरंभीं कांहीं वेळ निकराचें युद्ध होऊन शेवटीं कर्णानें एक अमोघ बाण मारला; व अर्जुनाचें हृदयावर जखम करून त्यास मूर्छित केलें. ही संधि साधून कर्ण पुन: रथावरून खालीं उतरून चाक वर काढूं लागला; तों कांहीं वेळानें अर्जुन सावध झाला. कर्ण रथाचें चाक उचलण्यांत गुंतला आहे तोंच त्यास ठार केलें पाहिजे, अशीं इशारत श्रीकृष्णांनीं अर्जुनास केली. तेव्हां त्यानें एक बाण हातीं घेऊन त्यानें कर्णाचा ध्वज मोडून खालीं पाडला. नंतर दुसरा एक बाण हातीं घेऊन अर्जुनानें आपलें तप, गुरुशुश्रुषा व सत्य यांचें सर्व पुण्य त्यांत घालून तो जो सोडला त्याने कर्णाचें शिर तिसरे प्रहरचे सुमारास अचानक उडवून रणभूमीवर पाडलें ! तेव्हां कर्णाचे शरीरांतून दिव्य तेज निघून सूर्यमंडळांत शिरलें ! कर्णासारखा योद्धा ठार झालेला पाहून कृष्णार्जुनांनीं आपले दिव्य शंख आनंदानें फुंकिले; व पांडवपक्षांकडे वाद्यांचा एकच ध्वनि उठून सर्व वीरांनीं प्रचंड जयघोष केला ! कर्णवध झालेला पाहून कौरवसैन्य दशादिशा पळावयास लागलें. मोठ्या मुष्कीलीनें २५ हजार पायदळ जमवून दुर्योधनानें कसेंबसें युद्ध चालूं केलें; पण भीमसेन व अर्जुन यांनीं त्याचा एका क्षणांत संहार केला. इकडे सूर्यहि अस्तास जाऊं लागला; तेव्हां दोहोंपक्षांकडील राजांनीं युद्ध बंद केलें; व सैन्यें आपआपल्या शिबिराकडे वळलीं. शकुनि व त्याचे शिल्लक राहिलेले १० हजार गांधार स्वार, कृप व त्यांचें हत्तींचें सैन्य, सुशर्मा व त्यांचे संशप्तक योद्धे, शल्य व अश्वत्थामा हे सर्व दुर्योधनासह खिन्न, उद्विग्न होऊन शिबिरांत परत आले. कृष्णार्जुनांनीं ही बातमी युद्ध सोडून शिबिरांत परत आलेल्या धर्मराजास कळवितांच, त्यानें अत्यंत आनंदानें त्या दोघांस प्रेमालिंगन दिलें. ( कर्णपर्व अ० ७६–९६ )

त्या रात्रीं वृद्ध व दयाळु कृपाचार्यांनीं दुर्योधनाकडे येऊन, ' पांडवांशीं सख्य करून आतां तरी युद्ध बंद कर ' असा त्यास उपदेश केला. ते म्हणाले:— ''भीष्म- द्रोणांसारखे अतुल पराक्रमी अतिरथी, दु:शासनासारखे तुझे भाऊ,

जयद्रथासारखे तुझे नातेवाईक, तुझा पुत्र लक्ष्मण, किंबहुना ज्याच्यावर तुझा सर्व भार तो कर्ण, हे सर्व रणांत पडले आहेत. ज्यांच्याकरितां आपण राज्य मिळवावयाचें किंवा राखावयाचें ते मरण पावल्यावर राज्य घेऊन तरी आपणांस काय करावयाचें आहे? युद्धांत पांडवांचा पराक्रम जास्त ठरला असून आपण आतां दुर्बल झालों आहों. यासाठीं मूर्खपणानें अपयश घेण्यापेक्षां युधिष्ठिराला शरण जाऊन राज्याचा आपला हिस्सा घेऊन सख्य करावें, हेंच श्रेयस्कर आहे- धृतराष्ट्र व श्रीकृष्ण यांनीं सांगितलें असतां दयाळु धर्मराजा तुला राज्य दिल्यावांचून राहणार नाहीं. माझे वांचविण्यासाठीं किंवा भ्याडपणामुळें मी तुला हा सल्ला देत नसून केवळ तुझें कल्याण व्हावें या हेतूनेंच मी हें बोलत आहे; तें न ऐकशील तर मरणसमयीं पश्चात्ताप करण्याचा प्रसंग येईल.'' कृपाचार्यांचें हें भाषण ऐकून दुर्योधन एक मोठा सुस्कारा टाकून स्वस्थ बसला. कांहीं वेळ विचार करून त्यानें उत्तर केलें:—'माझ्या हिताचें तुम्हीं जे आतां भाषण केलेंत, त्यामुळें माझे मनांत तुमचेबद्दल बिलकुल विषाद उत्पन्न झालेला नाहीं. परंतु कपटद्यूतानें राज्य हरण करून आम्हीं वनवासांत पाठविलेला धर्मराजा, व भरदरबारांत ज्यास कैद करण्याचा आम्हीं प्रयत्न केला आणि द्रौपदीचा छळ करून व अभिमन्यूचा वध करून ज्याचें आम्हीं वैर संपादन केलें तो श्रीकृष्ण, हे तरी आम्हांवर यापुढें कसा विश्वास ठेवणार? ही सर्व पृथ्वी सार्वभौम या नात्यानें उपभोगून पांडवांच्या मेहेरबानीनें मिळालेल्या राज्याचा उपभोग मी कसा घेऊं? अनेक राजांस सूर्याप्रमाणें आपल्या तेजानें पूर्वीं दिपवून आतां मी दासाप्रमाणें धर्मराजाचा अनुयायी कसा होऊं? **जगांत राज्य व यश हीं क्षणभंगुर असून क्षत्रियांनीं शाश्वत कीर्तीच संपादन केली पाहिजे**; व ती तर युद्धावांचून मिळणें शक्य नाहीं. क्षत्रियानें घरच्याघरीं बिछान्यावर मरणें अत्यंत निंद्य असून **रणशय्येवर प्राण सोडणें हाच क्षत्रियाचा मोक्ष होय. भीष्म, द्रोण,** दु:शासन, कर्ण, जयद्रथ इ० वीरांनीं माझेसाठीं प्राण अर्पण करून मजवर उपकार केले आहेत, तें ऋण मला फेडलें पाहिजे मला आतां राज्य घेऊन काय करावयाचें आहे? आपले स्नेही भाऊ, गुरू पुत्र, पितामह या सर्वांच्या संहारास कारणीभूत झालेला जो मी त्यानें जिवंत राहून राज्यसुख कसें भोगावें? मी तसें करीन तर सर्व जग माझी छी: थु: करील. यासाठीं मला आतां प्राणांची किंवा राज्याचीहि परवा नाहीं; रणांत लढत लढत मृत्यु येऊन स्वर्ग संपादावा, एवढीच आतां मला इच्छा राहिली आहे.'' मानी दुर्योधनाचें हें स्फुरण आणणारें भाषण तेथें जमलेल्या सर्व क्षत्रियांस पसंत

पडलें. त्यांनीं आपापले जिवंत राहिलेले सर्व अनुयायी जमवून दुसरे दिवशीं पुनः लढण्याचा निश्चय केला. दुर्योधनानें अश्वत्थामा वगैरे वरिष्ठ योद्ध्यांच्या संमतीनें मद्रदेशाचा राजा शल्य यास शिल्लक राहिलेल्या सैन्याचा मुख्य सेनापति नेमून त्यास अभिषेक केला. ( शल्यपर्व अ० १--७ )

पाहाटेच्या सुमारास दोहों पक्षांकडील सैन्यें सशस्त्र होऊन आपआपल्या शिबिरांतून बाहेर पडलीं. कौरव योद्ध्यांनीं आपसांत असें ठरविलें कीं, यापुढें पांडवांशीं एकेकट्यानें युद्ध न करितां सर्वांनीं मिळून व एकमेकांस मदत करीत लढाई करावी. नंतर शल्यानें कौरवसैन्यांची व्यूह--रचना केली. कृतवर्मा व त्रिगर्त योद्धे डावे बाजूस, कृपाचार्य व शक–यवन योद्धे उजवे बाजूस, अश्वत्थामा व कांबोज योद्धे पिछाडीस व मध्यभागीं दुर्योधन आणि घोडेस्वारांचे सैन्यासह शकुनी याप्रमाणें सैन्य–रचना करून कौरवयोद्धे उभे राहिले असतां सूर्योदयाचे पूर्वीच पांडवांनीं आपले सैन्याचे तीन विभाग करून तीन बाजूंनीं कौरवांवर हल्ला केला; आणि पुनः कौरव–पांडवांचें निकराचें युद्ध सुरू झालें. पहिल्या सपाट्यासच नकुलानें चित्रसेन, सत्यसेन वगैरे कर्णाचे राजपुत्र मोठ्या पराक्रमानें ठार केले. शल्यानें आपल्या सैन्यासह धर्मराजावर हल्ला करून युद्ध चालविलें होतें; तेथें त्यांचेभोंवतीं कौरव--पांडव यांचे योद्ध्यांचीं द्वंद्वयुद्धें सुरू झालीं. भीमसेनानें तोमराच्या प्रहारानें शल्याचा सारथि ठार केला, तेव्हां त्यांचें गदायुद्ध झालें. त्यांत दोघेंहि एकमेकांच्या प्रहारानें एकदम मूर्छित होऊन भूमीवर पडले असतां, कृपाचार्यांनीं शल्यास आपल्या रथांत घालून दूर नेलें. कांहीं वेळानें सावध झाल्यावर धर्म व शल्य यांचे रथ पुनः एकमेकांस भिडले. धर्मानें शल्याच्या आजूबाजूचे अनेक योद्धे व रथी ठार करून त्याचा ध्वज मोडून खालीं पाडला. पण शल्यानें बाणांची सारखी वृष्टि करून धर्मराजाला जर्जर करून सोडलें. तेव्हां सात्यकि, नकुल, सहदेव व भीमसेन या सर्वांनीं शल्यावर एकदम सर्व बाजूंनीं शस्त्रांचा भडिमार केला. पण त्या सर्वांस शल्य पुरून उरला; व त्यानें त्या सर्वांस आपल्या पराक्रमानें थक्क केलें. हा शल्य सर्व पांडवांस मारून अखेर आपणांस यश देईल अशी थोडीशी आशा दुर्योधनाचे मनांत उत्पन्न झाली. इकडे दुसरीकडे त्रिगर्त योद्धे व अश्वत्थामा यांशीं अर्जुनाचें युद्ध चाललें असतां दोघांनींहि पराक्रमाची शर्थ केली. अश्वत्थाम्यानें पांचालयोद्धा सुरथ ठार मारला. अर्जुनानेंहि अश्वत्थाम्याच्या भोंवतालचे दोन हजार रथी यमसदनीं पाठविले. तिसऱ्या बाजूस दुर्योधन असून तो व धृष्टद्युम्न यांचें युद्ध चाललें होतें. इकडे

शल्य एकटा एका बाजूस असून तो अर्जुन खेरीजकरून बांकीचे चार पांडव व सात्यकि यांशीं घनघोर युद्ध करीत होता. बराच वेळ शल्य जेरीस न येतां पांडवांशीं निकरानें व पराक्रमानें लढला. पांच वीरांनीं एकदम हल्ला केला तरी शल्य आटपत नाहीं, असें पाहून धर्मानें आपले योद्धे पुनः व्यवस्थेनें व एकमेकांस भिडून उभे केले. आपल्या रथाचे पुढचे बाजूस भीमसेन आणि मागें अर्जुन आणि दोहों बाजूस नकुल-सहदेव आणि सात्यकि-धृष्टद्युम्न यांचे रथ उभे करून धर्मानें पुनः शल्यावर अधिक लगट करून मोठ्या निकरानें हल्ला केला. भीमानें दुर्योधनाचा सारथि ठार मारून त्यासहि मूर्छित केलें. तेव्हां त्याचा रथ उधळून दशादिशा पळूं लागला; व त्यामुळें कौरवसैन्यांत गडबड झाली. पण शल्यानें लवकरच स्थिरस्थावर करून पुनः तुंबळ युद्ध चालविलें. त्यांत धर्मानें शल्याचा सारथि व घोडे ठार मारून त्याचा रथाचा ध्वज मोडून पाडला ! तेव्हां अश्वत्थाम्यानें त्यास आपल्या रथांत घालून दूर नेलें. कांहीं वेळानें दुसऱ्या रथांत बसून येऊन शल्य पुनः धर्माचे रथाशीं भिडला. त्या वेळीं झालेल्या भयंकर युद्धांत शल्यानें युधिष्ठिराचा सारथि व घोडे ठार मारून त्याचा रथ कुंठित केला; पण भीमानें उलट शल्याचें चिलखत फोडून त्यास विरथ केलें. तेव्हां शल्य हातांत ढाल तरवार घेऊन धर्मराजाचे रथाकडे चाल करून येऊं लागला. धर्मानें एक अमोघ शक्ति हातीं घेऊन ती शल्याच्या अंगावर जोरानें फेकली; त्यामुळें त्याच्या हृदयास जबर दुखापत होऊन तो ठार झाला ! याप्रमाणें कौरवांचा शेवटचा आशातंतु तुटून त्यांचें सैन्यांत एकच हाहाकार उडाला. याचें उसनें फेडण्यासाठीं शल्याचा भाऊ पुढें झाला. पण त्याचेंहि धर्मानें तात्काळ शिर उडविलें ! ( शल्यपर्व अ० ८--१७ )

कौरवपक्षांकडील शेवटचा प्रबळ योद्धा जो शल्य तो ठार झाल्यानंतर युद्धांत फारसा रंग किंवा हुरूप राहिला नाहीं. शल्य मरण पावतांच त्याच्या देशचे ७०० योद्धे युद्ध सोडून निघून जाऊं लागले; पण दुर्योधनानें त्यास कसाबसा हुरूप आणून त्यांजकडून पांडवांवर हल्ला करविला. पण विजयोत्सहाचें स्फुरण चढलेल्या पांडवांनीं त्यांचा तेव्हांच नायनाट केला. शिल्लक राहिलेलें २१ हजार पायदळहि दुर्योधनानें भीमसेनावर पाठवून पाहिलें; पण त्यासहि भीमानें थोड्याच वेळांत पळावयास लाविलें ! म्लेच्छराजा शाल्व हा हत्तीवर बसून धृष्टद्युम्नावर चालून आला असतां त्यानें गदेच्या प्रहारांनीं हत्ती ठार मारून भल्लानें शाल्वाचें शिर उडविलें ! कृतवर्मा व सात्यकि हे दोघे

यादव वीर एकमेकास भिडले असतां सात्यकीनें आपल्या प्रतिपक्ष्यास निःशस्त्र व विरथ केलें; तेव्हां त्यास कृपाचार्यांनीं आपल्या रथांत घालून दूर नेलें. यानंतर कौरवपक्षीय योद्धे निराशेच्या निकरानें व पांडवपक्षीय वीर विजयोत्साहानें लढूं लागून, सर्वत्र मुख्य मुख्य महारथींचीं द्वंद्वयुद्धें माजून राहिलीं. त्यांचा कांहींच निकाल लागत नाहीं असें पाहून, शकुनीनें दहा हजार गांधार स्वारानिशीं जाऊन पांडवसैन्याचे पिछाडीवर हल्ला केला. त्याजवर धर्मानें ७०० हत्ती, ५००० स्वार व ३०० पायदळ यांसह सहदेवास पाठविलें. पांडवसैन्याचे पिछाडीस या दोन फौजांचें भयंकर युद्ध होऊन शकुनि शिल्लक राहिलेल्या सहा हजार स्वारांसह आपल्या सैन्यांत निघून गेला. सहदेवहि जिवंत राहिलेल्या लोकांसह धर्मराजाकडे परत आला. तेव्हां शकुनीनें पुनः संधि साधून धृष्टद्युम्नाचे पिछाडीवर आपले घोडेस्वार घातले. तेव्हां उभयपक्षांचें पुनः तुंबळ युद्ध होऊं लागलें. या झटापटींतहि हजारों गांधार घोडेस्वार ठार होऊन शकुनीजवळ फक्त ७०० मात्र शिल्लक राहिले. त्यांसह दुर्योधनाकडे येऊन तो त्यास म्हणालाः—“ दुर्योधना, धीर खचूं देऊं नको; मीं पांडवांचें सर्व अश्वदल ठार केलें आहे, तूं रथी तेवढे ठार मार; मग बाकी राहिलेल्यांचा समाचार घेणें फारसें कठिण नाहीं. दुर्योधन हें ऐकून अधिक निकरानें व त्वेशानें लढूं लागला. धर्मराजाचे भोंवतीं माजलेल्या या तुंबळ युद्धाची वर उडालेली धूळ दुरून पाहून अर्जुनानें आपला रथ कौरवसैन्यांत वेगानें घुसवून बाणांच्या वर्षावानें त्यास तेव्हांच जर्जर केलें. या गर्दींत धृष्टद्युम्नानें दुर्योधनाचा सारथि व घोडे ठार मारले; तेव्हां तो एका घोड्यावर बसून जो सैन्यांत घुसला तो दिसेनासा झाला! राजा दुर्योधन दिसेनासा होतांच कौरवसैन्याचा धीर खचला, अश्वत्थामा, कृतवर्मा व कृपाचार्य यांनीं त्याचा पुष्कळ शोध केला. कोणी म्हणत तो ठार झाला व कोणी सांगत कीं, तो शकुनीच्या सैन्याकडे गेला! दुर्योधनाचा त्यास थांग लागत नाहीं असें पाहून दुर्मर्षणादि त्याचे ११ भाऊ आवेशानें भीमावर चालून गेले. पण भीमानें त्यांचीं शिरें एकामागून एक सपासप उडवून त्यांचें सैन्यहि ठार केलें. इकडे दुर्योधन व त्याचा भाऊ सुदर्शन हे घोड्यावर बसून शकुनीचे शिल्लक राहिलेले स्वार व इतर सैन्य जवळ जवळ उभें करून त्यांचे आश्रयानें राहिलें होतें, त्यांजवर पांडव जाऊन पडले. दुर्योधनानें मध्यंतरीं लगट करून भाला फेंकून सहदेवाचे डोक्यास जखम केली; पण त्याचा त्यास फायदा घेतां आला नाहीं. भीमानें दुर्योधनाचा जिवंत राहिलेला भाऊ सुदर्शन व अर्जुनानें त्रिगर्तांचा राजा सुशर्मा

यांस ठार मारलें. यानंतर भीम व सहदेव आणि शकुनि व त्याचा पुत्र उलूक यांचीं सैन्यें भिडली. कांहीं वेळ निकराचें युद्ध होऊन सहदेवानें उलुकाचें शिर उडविलें ! थोड्या वेळानें सहदेवाचा रथ शकुनीचे रथास भिडला; तेव्हां सहदेव त्यास म्हणालाः—सभेमध्यें द्यूतानें धर्मराजाचें सर्वस्व हरण करतांना जो तुला आनंद झाला होता, त्याचें प्रायश्चित्त भोगण्याची आतां वेळ आली आहे. कुलांगार दुर्योधन व आमच्या सर्व छळांचें व संकटांचें मूळ असा त्याचा मामा तूं हे दोघे अद्याप जिवंत आहां. आतां मर्दाप्रमाणें पुढें उभा राहून युद्ध कर. " असें म्हणून सहदेव आवेशानें लढूं लागला. लवकरच त्यानें शकुनीचा सारथि व घोडे ठार मारून त्याचा ध्वज पाडला व त्याचें धनुष्य तोडलें. तेव्हां तो गदा, शक्ति, तोमर इ० शस्त्रे फेकूं लागला; पण सहदेवानें तीं सर्व तोडून टाकली. शेवटीं शकुनि हातांत भाला घेऊन त्याचे अंगावर धांवून येत असतां सहदेवानें आरंभीं त्याचे दोन हात तोडून नंतर झपाट्यानें त्याचें शिर उडविलें ! शकुनि ठार झाल्यानंतर त्याचें सैन्य थोडेंसें लढलें; पण अर्ध घटकेंत तें व राहिलेली कौरवसेना बहुतेक ठार झाली. जिवंत राहिलेलें थोडें सैन्य दशदिशा पळून गेलें. ( शल्यपर्व अ० १७–२८ )

---

# प्रकरण दहावें.

## भयंकर युद्ध.



कुरुक्षेत्रांत अठरा दिवस अठरा अक्षौहिणी सैन्याचें याप्रमाणें भयंकर युद्ध होऊन तेथें जमलेले बहुतेक क्षत्रिय मरण पावले. पांडवपक्षांकडील सात अक्षौहिणींपैकीं अखेर २ हजार रथी ७ शें हत्ती, ५ हजार घोडेस्वार व १ लक्ष पायदळ इतकें सैन्य जिवंत राहिलें; पण कौरवपक्षांकडील अकराहि अक्षौहिणी ठार झाल्या. कृप, अश्वत्थामा, कृतवर्मा हे तिघे योद्धे व संजय-इतकेच जिवंत राहिले ! संजय पांडवांचे हातीं लागला होता, पण त्यांनीं त्यास जीवदान देऊन सोडून दिले. वरील तिघे योद्धे शेवटच्या युद्धानंतरच्या पळापळींतून

निसटून गेले होतें; व एकटा दुर्योधन मात्र अनाथ व असाह्य असा घोड्यावरून फिरत होता. शेवटच्या गर्दींत त्याचा हा घोडाहि ठार होऊन हा भारतेश्वर दुर्योधन पूर्णपणें दीन बनला ! यावेळीं त्यास विदुराचे पूर्वींचे शब्द पूर्णपणें आठवले. पण विजयोत्सहानें जयघोष करीत पांडवांचें सैन्य हिंडत असतां विचार करीत बसण्यासहि सवड नव्हती. तेव्हां हातांत एक गदा घेऊन दुर्योधन पायींच रणांगणांतून पूर्व दिशेकडे पळत सुटला. रणभूमीपासून एक कोस अंतरावर असलेल्या एका सरोवराचे कांठीं तो विश्रांति घेत बसला असतां त्याची व संजयाची गांठ पडली. दुःखामुळें कोणाचेंहि तोंडून शब्द निघेना. शेवटीं मोठ्या कष्टानें, ‘ आपण अतिशय जखमा होऊन विव्हळ झालों आहों, पण जिवंत असून या सरोवरांत विश्रांति घेत आहों ’ असा निरोप धृतराष्ट्रास कळीव; असें त्यानें संजयास सांगितलें. तो गेल्यावर दुर्योधन त्या सरोवरांत शिरला; व मायेनें पाण्याचें स्तंबन करून आंतच विश्रांति घेत स्वस्थ पडला. दुर्योधन कोठें आहे, हें संजयाचे सांगण्यावरून कृपाचार्यादि तिघां योद्धयांस कळल्यावर आपले थकलेले घोडे पुनः हांकून त्यांनीं आपले रथ त्या सरोवराजवळ आणले. अश्वत्थामा दुर्योधनास हांक मारून म्हणाला—‘राजा, या वेळीं ऊठ; पांडवांचेंहि सैन्य फारच थोडें शिल्लक राहिलें आहे व त्यांपैकीं बरेच क्षत्रिय घायाळ झालें आहेत. ही संधि साधल्यास मी, तूं व कृप आणि कृतवर्मा एवढे मिळून त्यांचा तेव्हांच संहार करून अजूनहि जय मिळवूं. ’ यावर दुर्योधनानें उत्तर केलें----‘ तुम्हीं तिघे तरी या भयंकर युद्धांतून जिवंत राहिलात ही आनंदाची गोष्ट होय. पण युद्ध करण्यास ही वेळ योग्य नाहीं. पांडवांचें सैन्यांत विजयानंदाचें स्फुरण चढलें असून आपण दमलेले व जखमी झालले आहों. यासाठीं आजची रात्र विसावा घेऊन उद्यां आपण युद्धें करूं. तुमच्या मनाचा हा मोठेपणा व मजवरील भक्ति योग्यच आहे; पण पराक्रम करण्याची ही वेळ नव्हे. ’ दुसरे दिवसापर्यंत वाट पहाण्याची ही मसलत अश्वत्थाम्यास पसंत पडली नाहीं. तो म्हणाला---‘ही रात्र उजाडण्यापूर्वींच सर्व पांचाळ--पांडवांचा संहार करण्याची मी प्रतिज्ञा करतों. ही प्रतिज्ञा शेवटास नेईपर्यंत मी अंगांतील चिखलत काढणार नाहीं. ’ याप्रमाणें त्या चार योद्धयांमध्यें पुढील वर्तनाविषयीं भवति न भवति चालली.

इकडे कौरवसैन्याचा अशा तऱ्हेनें संहार झाल्यामुळें कौरवांचे शिबिरांत राहिलेले नोकरचाकर व राजस्त्रिया याच्यांत एकच हाहाकार उडाला ! दुर्योधनाचे जिवंत राहिलेले अमात्य व संजय यांनीं या स्त्रियांस वाहनांत घालून घाईघाईनें

हस्तिनापुराकडे पळ काढला. पांडवांचें पक्षास येऊन मिळालेला युयुत्सुहि धर्मराजाचे परवानगीनें त्यांचेबरोबर नगरांत गेला. राजवाड्यांतसुद्धां सूर्याचेहि दृष्टीस क्वचितच पडणाऱ्या या स्त्रिया रस्त्यांतून सर्वांसमक्ष शोक करीत राजवाड्याकडे जातांना पाहून नागरिकांना फार वाईट वाटलें. युद्धाचा हा भयंकर शेवट युयुत्सु व संजय यांनीं धृतराष्ट्रास कळवितांच त्याचे व गांधारीचे दुःखास पारावर राहिला नाहीं! इकडे सर्व कौरवसैन्य नामशेष झालें तरी दुर्योधन हातचा निसटून गेल्यामुळें पांडवांच्या आनंदास थोडा कमीपणा आला होता. त्यांनीं रणभूमि चोहोंकडे धुंडाळून पाहिली, पण त्याचा कोठेंहि ठिकाण लागेना. तेव्हां हें काम आपल्या हेरांकडे सोंपवून पांडव आपल्या शिबिरास परत आले. इकडे सरोवरावर दुर्योधनाचें अश्वत्थाम्याशीं वरील भाषण चाललें असतां भीमसेनाचे शिकारी लोक तेथें पाणी पिण्यास आले होते; त्यांनीं तें भाषण ऐकून पांडवांचे शिबिरांत जाऊन दुर्योधन कोठें लपून बसला आहे, ती बातमी त्यांस सांगितली. तेव्हां पांडवांस आनंद होऊन अठरा दिवसांच्या युद्धाचा शेवट लावण्यासाठीं त्यांचें सैन्य वाद्यें वाजवीत व जयघोष करीत सरोवराकडे येऊं लागलें. पांडवांच्या सैन्याचा हा गलबला ऐकून दुर्योधनास निरोप देऊन अश्वत्थामा, कृपाचार्य, व कृतवर्मा हे रथांत बसून त्वरेनें दूर निघून गेले; आणि एका मोठ्या वडाचे झाडाखालीं निवाऱ्याची व सुरक्षित जागा पाहून तेथें ती रात्र घालविण्याचा त्यांनीं निश्चय केला. इकडे पांडव सरोवराजवळ येऊन पहातात तों दुर्योधन मायेनें पाण्याचें स्तंभन करून आंत लपून बसला आहे, असें त्यांस आढळून आलें. या मायेच्या आश्रयानें दडून बसलेल्या दुर्योधनास तसाच तेथें मारणें शक्य नसल्यामुळें तो बाहेर येईपर्यंत वाट पाहावी, असा धर्मराजाचा कल दिसला. पण मायावी शत्रूचा मायेनेंच वध केला पाहिजे; वाट पहात बसून उपयोग नाहीं. कांहीं तरी युक्तिप्रयुक्ति करून अशा शत्रूचा नायनाटच केला पाहिजे, असें श्रीकृष्णांनीं सांगितल्यानंतर धर्मराजा व दुर्योधन यांचा पुढीलप्रमाणें संवाद झाला.

**धर्मराजा:**----सर्व क्षत्रिय व आपलें कुल यांचा नाश करून, दुर्योधना, आतां भ्याडाप्रमाणें जीव वाचविण्यासाठीं सरोवरांत कां लपून बसला आहेस? तुझा तो मानीपणा, गर्व, ताठा व फुशारकी कोठें गेली? कौरवांच्या प्रख्यात कुलांत उत्पन्न झालेला असा तूं क्षत्रिय असून युद्धाचा शेवट लागल्यापूर्वींच

पळून गेलास? क्षत्रियधर्माचें उल्लंघन न करितां बाहेर येऊन आम्हाशीं युद्ध कर; व आमचा वध करून पृथ्वीचें राज्य कर किंवा रणांत पडून स्वर्ग संपादन कर.

**दुर्योधनः**---प्राण्याना संकटांत भीति वाटते ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. पण मी जो येथें आलों आहें तो भीतीमुळें, विषादानें किंवा जीव बचावण्यासाठीं आलों नाहीं. मी निःशस्त्र, विरथ, असहाय्य होऊन अतिशय दमल्यामुळें केवळ विश्रांतिसाठीं येथें आलों आहें. धर्मराज, तुम्हांला काळजी नको; मी येथून वर येऊन तुम्हांशीं खास युद्ध करीन.

**धर्मराजाः**----आम्ही काळजी करीत नाहीं; उलट आम्ही तुला केवढा वेळ शोधीत आहों, यासाठीं आतांच वर येऊन युद्ध कर, तूं मेलास तर तुला स्वर्ग मिळेल; आम्हांला मारलेस तर पृथ्वीचें राज्य मिळेल.

**दुर्योधनः**---- पृथ्वीचें राज्य घेऊन मला आतां काय करावयाचें आहे ? अझूनहि तुम्हां सर्वांस ठार मारून विजयी होण्याचें सामर्थ्य व धमक माझे अंगीं आहे; पण ज्यांच्याकरितां राज्य पाहिजे ते भाऊ, पुत्र, स्नेही, वडील माणसें हीं सर्व मरण पावलीं असून पृथ्वीवरील बहुतेक सर्व क्षत्रिय, राजे आणि संपत्ति नाहींशीं होऊन ती विधवेसारखी झाली आहे. तिचा उपभोग तूंच खुशाल घे! मी मृगाजिन धारण करून वनांत निघून जातों.

**धर्मराजाः**---.सरोवरांत लपून बसून असलीं निष्कारण रडगाणीं गाऊं नको. पृथ्वीवरील तुझें स्वामित्त्व नष्ट झालें आहे; तिचें राज्य मला दान करण्याचा तुला आतां काय अधिकार राहिला आहे ? जरी तो तुला अधिकार असतां, तरी तूं दान केलेलें राज्य मी कधींहि घेतलें नसतें. कारण **क्षत्रियानें दानाचा स्वीकार करणें हा अधर्म आहे.** कुलक्षय टळावा म्हणून आम्ही आपलें राज्य पूर्वीं न्यायानें व सामोपचारानें परत मागत असतां, तूं दिलें नाहींस. सुईच्या अग्रावर राहील एवढी मातीहि देणार नाहीं, अशी बडाई मारणारा तूं आतां सगळी पृथ्वी दान करावयास कसा प्रवृत्त होत आहेस ? आम्हाला असलें राज्य नको आहे. तुला उघड युद्धांत जिंकून व तुला वध करूनच आम्ही पराक्रमानें राज्य संपादणार. बाहेर येऊन खऱ्या क्षत्रियाप्रमाणें युद्ध कर. तूं व मी दोघेंहि जोंपर्यंत जिवंत आहों तोंपर्यंत जय कोणास मिळाला याबद्दल सर्व जग संशयांतच राहाणार. पूर्वीं अनेक वेळां आमचे प्राण घेण्याचे प्रयत्न तूं केलेस; पण आतां मात्र तुझा जीव

माझे हातीं आला आहे. पृथ्वीचें राज्य देण्यास जरी तूं तयार झालास तरी आतां तूं जिवंत राहणें शक्य नाहीं,

**दुर्योधन**----ठीक आहे; मी तुम्हां सर्वांशीं युद्ध करून तुम्हांस ठार मारतों व भाझेसाठीं आतांपर्यंत रणांत पडलेला वीरांचे ऋण फेडतों. पण मी एकटा निःशस्त्र, विरथ, दमलेला आणि घायाळ असल्यामुळें तुम्हीं सर्वांनीं मजशीं एकदम न लढतां एकेकट्यानें लढावें; म्हणजे मी आपला पराक्रम अझूनहि तुम्हांस दाखवितों. आजपर्यंत पुष्कळ युद्धें झालीं; पण त्यांत अप्रतिम गदायुद्ध कोणास पहावयास सांपडलें नाहीं. यासाठीं मजशीं गदायुद्ध करण्यास तुम्हांपैकीं जो शूर वीर तयार असेल त्यानें पुढें यावें; म्हणजे गदायुद्धाचा अपूर्व चमत्कार मी तुम्हांस दाखवितों.

**धर्मराजा**---शाबास, तूंहि क्षत्रियधर्म जाणतोस हें उत्तम आहे. त्यांतून तूं युद्धास तयार आहेस हें त्यांहूनहि उत्तम आहे. दुर्योधना, पुरुषाप्रमाणें बाहेर पडून वाटेल तें शस्त्र घेऊन आम्हांपैकीं वाटेल त्या एकाशीं युद्ध कर; किंबहुना आह्मा पैकीं कोणाहि एकाचा वध केलास, तरी तुला आम्हीं आपला राजा कबूल करून सर्व राज्य तुझे स्वाधीन करूं. सरोवरांतून बाहेर पडून मर्दाप्रमाणें युद्ध कर. या वेळीं इंद्र जरी तुझ्या साह्यास आला तरी तूं जिवंत सुटणार नाहींस.

अशा प्रकारच्या मर्मभेदक भाषणांनीं स्फुरण व आवेश चढून दुर्योधन नागाप्रमाणें रागानें फुसफुसत खांद्यांवर गदा घेऊन सरोवरांतून वर आला व पोहत पोहत त्वेषानें तीराकडे येऊं लागला. हें पाहून पांडवांनीं टाळ्या पिटल्या! यामुळें जास्तच चिडून दुर्योधन गदा घेऊन पांडवांचें समोर येऊन म्हणाला---आतां तुम्ही वाटेल तितके हंसा; पण लवकरच यमसदनीं पाठवून, याचें प्रायश्चित, तुम्हांस देतों. माझेपाशीं गदेशिवाय दुसरें शस्त्र नाहीं व अंगावरहि कवच नाहीं; तथापि तुम्हांपैकीं कोणीहि गदा घेऊन मजशीं लढण्यास पुढें यावें. एकाशीं अनेकांनीं एकदम युद्ध करणें न्यायाचें नाहीं व क्षत्रियधर्मासहि विरुद्ध आहे, हें तुम्ही जाणतच आहां.'

**धर्मराजा**----'हें सर्व खरें आहे, पण तुम्हीं सर्वजण शूर व क्षत्रियधर्म जाणणारे असून सर्वांनीं मिळून एकट्या अभिमन्यूस मारलें, तेव्हां तुमची ही न्यायाची कल्पना कोठें गेली होती? **मनुष्यप्राणी वैभवानें मदोन्मत्त झाला. म्हणजे आपल्या दुष्कृत्यांनीं स्वर्गाचें द्वार बंद होत आहे,**

हें त्यास दिसत नाहीं. पण संकटांत सांपडला म्हणजे मात्र तो धर्माधर्माचा विचार करूं लागतो. दुर्योधना, तुम्हीं कसेंहि वागलां तरी आम्ही धर्म सोडणार नाहीं. अंगांत चिखलत घाल, शिरस्त्राण बांध, गदा घे, किंबहुना प्राण खेरीज करून दुसरें वाटेल तें माग, आम्हीं देण्यास तयार आहों. वाटेल तें हत्यार घेऊन आम्हां पांडवांपैकीं कोणासहि ठार मार, म्हणजे तुलाच आम्हीं आपला राजा मान्य करूं.' धर्माचें जें भाषण ऐकून दुर्योधनानें कवच व शिरस्त्राण घातलें; आणि हातांत गदा घेऊन मोठया आढ्यतेनें म्हणालाः—गदायुद्धांत माझी बरोबरी करणारा कोणीहि नाहीं. पांडवांपैकीं वाटेल त्या एकानें माझ्याशीं गदायुद्ध करण्यास पुढें यावें. माझें हें भाषण खरें आहे कीं केवळ गर्वोक्ति आहे, ते आतां एका घटकेंतच समजेल.'

हें सर्व भाषण चाललें असतां श्रीकृष्ण स्वस्थ होते, ते कांहींहि बोललें नाहींत. बारा वर्षें वनवास व एक वर्ष अज्ञातवास यातील सर्व हालअपेष्टा, दुःखें व संकटें आणि अठरा दिवसांच्या घनघोर युद्धांत गाजिवलेला पराक्रम ह्या सर्वांचें फळ मिळण्याचा सुसमय आला असतां तें आपण होऊन शत्रूचे हवालीं करण्यास धर्मराजा तयार झालेला पाहून श्रीकृष्णास फार वाईट वाटलें. ते म्हणाले: –' भीमसेनाखेरीज दुर्योधनापुढें गदायुद्धांत नुसतें उभे राहाण्याचीहि कोणाची छाती नाहीं! भीमसेन असला तरी त्यास जय येईलच असा निश्चय होत नाहीं. कारण भीम जरी शक्तिनें अधिक असला, तरी गदायुद्धाचे कौशल्यांत दुर्योधन जास्त श्रेष्ठ आहे. त्यामुळें भीमसेनहि दुर्योधनास न्यायानें जिंकील असें वाटत नाहीं. अशा स्थितांत, आम्हांपैकीं कोणाहि एकास मारून तूं राजा हो, हें धर्मराजाचें म्हणणें अविचाराचें व साहसाचें झालें. धर्मराजानें हें एक प्रकारचें द्युतच पुनः सुरू केलें आहे· यांत संशय नाहीं. पांडु व कुंती यांच्या संततीचे कपाळीं वनवास व भिक्षा हीं कायमचींच लिहिलीं असून त्यांच्या नशिबीं राज्यसुख मुळींच नाहीं, असें दिसतें.' श्रीकृष्णाचें हें भाषण ऐकून भीमसेनानें त्यांचा हा संशय दूर केला. या गदायुद्धांत दुर्योधनाचा वध करून पांडवपक्षास यश व धर्मराजास राज्य देऊन आजपर्यंतच्या हाडवैरांचा शेवट लावतो, असें त्यानें सर्वांस आश्वासन दिलें; व हातांत गदा घेऊन दुर्योधनाशीं युद्ध करण्यास तयार झाला. कौरवांचीं पूर्वींची सर्व दुष्कृत्यें आठवून भीमसेन आवेशानें दुर्योधनास म्हणाला:----' धृतराष्ट्रानीं व तुम्हीं कौरवांनीं-- तुमचा कोणताहि अपराध केला नाहीं अशा--आम्हां पांडवांचा आजपर्यंत जो छळ केला, वारणावत नगरांत व भरसभेंत जीं जीं अमानुष कृत्यें

केली त्या सर्वांचे दुष्टा, आतां स्मरण कर. या तुझ्या नीच कृत्यामुळेंच आपला आजा भीष्म, गुरु, द्रोण , प्रतापी कर्ण, व शल्य वैराचें मूळ असलेला शकुनि व दुःशासन वगैरे तुझे भाऊ रणांत मरून पडले असून तूं मात्र एक कुलांगार, अधमाधम जिवंत राहिला आहेस. पण आज मी या युद्धांत तुझे प्राण, वैभव व राज्य हीं एकदम पराक्रमानें हरण करणार; संभाळ ! यावर दुर्योधनानेंहि तितक्याच आवेशानें उत्तर केलें:---' भीमा, व्यर्थ बडबड करूं नको; तुझा काय पराक्रम असेल तो प्रत्यक्ष दाखीव गदायुद्धांत माझी- बरोबरी करणारा कोणीच नसून आतांपर्यंत मला कोणीच जिंकलेले नाहीं व पुढेंहि न्यायानें जिंकूं शकणार नाहीं. माझीं आतां जीं कांहीं दुष्कृत्यें म्हणून तूं सांगितलींस तीं मीं निःसंशय केलीं आहेत. मीं आपल्या पराक्रमानें तुम्हांला वनवसांत धाडलें, विराटाचे घरीं दास्य करावयास व वेष पालटण्यास लावलें आणि युद्धांतहि माझे बांधव मेले तरी तुमचे पक्षाची प्राणहानिहि बरोबरीनें झाली आहे. या गदायुद्धांत जर मी पडलों तर तें श्लाघ्यच आहे पण तुम्ही जर मला अन्यायानें माराल तर तुमची मात्र दुष्कीर्ति अक्षय्य राहील शरत्काळच्या मेघाप्रमाणें शुष्क गर्जना न करितां गदा-प्रहाराची वृष्टि करून काय पराक्रम गाजवावयाचा असेल तो गाजीव. याप्रमाणें भाषण होऊन आपापल्या गदा सावरून दोघे गदाधर युद्धास सिद्ध झाले ! इतक्यांत या दोघांसहि गदायुद्धाचें शिक्षण देणारा त्यांचा गुरु बलराम तीर्थयात्रा आटपून हें गदायुद्ध पाहण्यास आला. त्यास सन्मानपूर्वक सर्वांनीं योग्यस्थळीं बसविल्यावर भीमसेन व दुर्योधन हे एकमेकांस भिडले. (शल्यपर्व अ० २९--३४).

एकमेकांवर गदेचे प्रहार सुरू होण्यापूर्वीं भीमसेनानें पुनः दुर्योधनास त्याच्या नीच कृत्यांची आठवण दिली ' आतां पुनः तुला हास्तिनापूर, धृतराष्ट्र, गांधारी किंवा तुझ्या बायका दिसणार नाहींत, तूं माझ्या गदेनं जर्जर होऊन मरणार असें भीमानें त्यास बजावलें. पण दुर्योधनानें त्यास उलट उत्तर दिलें कीं तुझ्या असल्या धमकवण्यांत भिणारा मनुष्य मी नाहीं. काय करावयाचें असेल तें बडबड न करतां प्रत्यक्ष कृतीनें करून दाखीव.याप्रमाणें भाषणें होऊन भीम दुर्योधनांनीं एकमेकांवर प्रहार करण्यास प्रारंभ केला. भीमाचें बळ जास्त होतें तरी दुर्योधनाचा गदायुद्धाचा अभ्यास अधिक असल्यामुळें तो विशेष कुशल होता. यामुळें दुर्यो-धनानें बराच वेळ भीमाचे बहुतेक सर्व प्रहार चुकवून निष्फळ केले. उलट दुर्यो-धनाचे मात्र बरेच तडाके भीमास बसले पण त्याचें सामर्थ्य प्रचंड असल्यामुळें त्यास इजा झाली नाहीं. पुढें हें युद्ध अधिक निकरानें येऊन एकदां दुर्योधन तर

दुसऱ्या खेपेस भीमसेन प्रहारानें बेशुद्ध होऊन पडले. पण कांहीं वेळानें सावध होऊन पुनः लढूं लागले. भीम-दुर्योधन यांचे गदायुद्धांतले गुणावगुण श्रीकृष्णांनीं अर्जुनास सांगितलेंः—न्यायानें युद्ध करून भीमास दुर्योधनाचा वध करतां येणार नाहीं. कपटाशीं कपट, मायेशीं माया असें वर्तन केल्यावांचून गत्यंतरच नाहीं. दुर्योधनानें सभेमध्यें द्रौपदीस डांवी मांडी उघडी करून दाखविली, त्या वेळीं भीमानें केलेली प्रतिज्ञा याप्रसंगीं पुरी केली तरच पांडवांस जय मिळणार आहे. श्रीकृष्णाचें हें भाषण ऐकून अर्जुनानें आपल्या डाव्या मांडीवर थाप मारून भीमास इषारत केली. ती लक्षांत ठेवून भीमसेन योग्य संधीची वाट पाहात दक्षतेनें लढूं लागला. लढतां लढतां भीमानें एका प्रहरानें दुर्योधनास गुडघे टेकावयास लावलें. तेव्हां पांडवपक्षीयांनीं जयघोष केल्यामुळें चिडून दुर्योधन जरा बेसावधपणें लढूं लागला. भीमसेनाच्या गदेचे प्रहारहि जास्त जोरानें व वेगानें होऊं लागले. ते त्यानें वर उड्या मारून व दुसऱ्या हुलकावण्या दाखवून चुकविलें. पण अखेर दुर्योधनानें घाव चुकविण्यासाठीं उडी मारली असतां भीमानें गदेचा प्रचंड प्रहार तसाच त्याच्या मांडीवर केला. त्यासरशीं मांडी मोडून दुर्योधन ओरडतच जमिनीवर पडला! तेरा वर्षें अंतकरणांत दाबून ठेवलेलल्या क्रोधाचा व वैराचा असा शेवट झालेला पाहून सर्व पांडवपक्षीय वीरांस आनंद झाला. भीमसेनाचा आवेश तर अगदीं अनावर होऊन त्यानें दुर्योधनाजवळ जाऊन त्याच्या पूर्वीच्य सर्व पापांची व अपराधाची त्यास पुनः आठवण देऊन डाव्यां पायाच्या पहिल्या लाथेनें त्याचा मुकुट उडाविला; व दुसऱ्या लाथेनें त्याचे मस्तकावर प्रहार केला! ' भरसभेंत द्रौपदीचा छळ होत असतां आम्हांस षंढ म्हणून हंसणारे दुर्योधनादि सर्व कौरव द्रौपदीचे पुण्याईनें गतप्राण होऊन पडलें आहेत आम्हीं कपटद्यूत, लबाड्या किंवा जाळपोळाचा आश्रय न करतां आपल्या बाहुबलानें शत्रु जिंकून यमसदनीं पाठविले आहेत मग याबद्दल आम्हांस स्वर्ग मिळो कीं नरकयातना होवोत; त्याची आम्हांस फिकीर नाहीं. याप्रमाणें भीमसेन आनंदानें गर्जूं लागला, पण इकडे दयाळू व धर्मात्म्या युधिष्ठिराचे मनाची स्थिति निराळीच झाली होती, अकरा अक्षौहिणींचा अधिपति व राजा असूनहि दुर्दैवानें पछाडल्यामुळें अखेर आपले भाऊबंद पुत्र व अमात्य यांसह रणांत हतवीर्य होऊन दुर्योधन धुळींत लोळत पडल्याचें पाहून धर्मराजाचे अंतःकरणास द्रव आला, आणि त्यांतच भीमसेनानें लत्ताप्रहार पाहून तर त्यांचें अंतःकरण फारच कळवळलें. तुझ्या वैरांचा शेवट बऱ्या वाईट उपायांनीं लावून तूं दुर्योधन वध केलास खरा पण दुर्योधन कसाहि असला

तरी तो राजा व आपला भाऊ आहे. तो अशा स्थितींत मूर्छित पडला असतां त्यास लाथ मारणें अनुचित होय. असा भीमसेनास दोष देऊन धर्मराजा दुर्योधनाजवळ येऊन सौम्यपणानें म्हणाला—'दुर्योधना' तूं या अपयशाबद्दल शोक करूं नको. आपल्या कर्माचे फेऱ्यांत सांपडल्यामुळेंच कौरवपांडवांनीं एकमेकांचा नाश केला आहे. तुला मात्र रणांत मरण आल्यामुळें तूं स्वर्गसुख भोगणार; व आम्ही जिवंत राहून धृतराष्ट्राच्या विधवा सुना व नातसुना यांचे शाप ऐकत दु:खांत दिवस कंठणार.

धर्मराजा याप्रमाणें शोक करीत असतां, आपल्या एका शिष्यानें दुसऱ्या शिष्याचा गदायुद्धाचे नियम मोडून वध केला हें पाहून बलरामास फारच क्रोध आला. नाभीचे खालचे भागांवर गदाधरानें प्रहार करूं नये हा गदायुद्धाचा नियम भीमानें दुर्योधनाचे मांडीबरोबरच मोडला; यांचें प्रायश्चित्त त्यास देण्यासाठीं बळराम आपलें 'लांगल' शस्त्र हातीं घेऊन भीमाचे अंगावर धांवून जाऊं लागला. तेव्हां त्यास आवरून धरून श्रीकृष्ण त्यांचें सांत्वन करूं लागले. ते म्हणाले:—पांडव आपले आतभाऊ असून त्यांचा आपला अकृत्रिम स्नेहही आहे. दुर्योधनाची मांडी गदेनें मोडीन, अशी भीमसेनाची प्रतिज्ञा होती. ती पुरी करणें हें क्षत्रिय या नात्यानें त्याचें कर्तव्य होतें. तें केल्याबद्दल त्यास शासन करणें चांगलें नाहीं. इत्यादि बोलून श्रीकृष्ण आपल्या वडील बंधूचा क्रोध शांत करीत होते. पण या बोलण्यानें बळरामाचें समाधान न होतां तो तसाच रथांत बसून रागानें द्वारकेस निघून गेला धर्मराजास दुर्योधनवधामुळें झालेलें दु:ख व त्याचे डोक्यावर लाथा मारल्याबद्दल त्यास भीमाचा आलेला राग दूर करण्याचाहि श्रीकृष्णांनीं प्रयत्न केला. अखेर, कौरवांनीं केलेला अनन्वित छळ, त्यांनीं केलेलीं मर्मभेदक भाषणें व वनवासाचीं दु:खें यांचें स्मरण होऊन भान न राहिल्यामुळें भीमसेनानें हा अधर्म केला, असें म्हणून त्यास क्षमा करून त्याचे या कृत्यास धर्मराजानें अनुमोदन दिलें. पांडवांचा अनन्वित छळ केलेल्या व त्यांच्या राज्योपभोगाचे आड आलेल्या कौरवांचें निर्दलन करून पृथ्वीचें निष्कंटक राज्य आपल्या वडील भावाचे चरणीं अर्पण करून भीमसेनहि कृतकृत्य झाला. दुर्योधनास याप्रमाणें भीमानें रणांत पाडलें, याबद्दल पांडवपक्षीय तरुण वीरांना अत्यंत आनंद झाला. दु:शासनाचा वध करून द्रौपदीच्या छळाचा जसा भयंकर सूड उगविला, त्याप्रमाणेंच दुर्योधनास रणभूमीवर लोळवून त्याचें गर्वानें ताठलेलें डोकें लत्ताप्रहारांनीं ठेचलेंस, हें फार चांगलें झालें; असें ते दुर्योधनास ऐकूं येईल

अशा रीतीनें उघड बोलूं लागलें ! तेव्हां श्रीकृष्ण कांहींसें गंभीरपणानें व कांहींसें उपरोधिक रीतीनें म्हणाले:—" धूळ खात पडलेल्या या शत्रूला पुन: पुनः टोंचून बोलून दुखविण्याचें काय प्रयोजन आहे ? विदुर, भीष्म, द्रोण इत्यादिकांचा उपदेष न ऐकतां हा पापी जेव्हां निर्लज्जपणाचें वर्तन करूं लागला, तेव्हांपासूनच हा मेलेला आहे. आतां तर हा पुरुषाधम लांकडासारखा होऊन पडला आहे. त्यांत कठोर भाषणांनीं टोंचण्यांत काय अर्थ आहे. " श्रीकृष्णाचें हें अधिक्षेपाचें भाषण ऐकून दुर्योधनास फारच संताप आला. आणि शेंपटी तुटलेल्या सापाप्रमाणें त्वेषानें अर्धवट वर उठून तो म्हणाला:–"अरे कंसाच्या दासाच्या पोरा ! माझी मांडी मोडण्याबद्दलची इशारत तूं अर्जुनाकडून भीमसेनास करविलीस ती मीं पाहिली. अधर्मानें मला मारून वर असलीं भाषणें करण्यास तुला शरम वाटत नाहीं ? तुम्हीं शिखंडीला पुढें करून भीष्मांस मारिलें; अश्वत्थाम्याच्या मृत्यूची खोटी कंडी उठवून द्रोणांचा ते नि:शस्त्र असतांना वध केला; कर्ण चक्र उचलण्यांत गुंतला असतां त्याचा तुम्हीं शिरच्छेद केला, व माझ्याहि मांडीवर गदायुद्धाचा नियम मोडून प्रहार केला. सरळ युद्ध करणाऱ्या आम्हां वरिांची कपटानें वध होत असतां तूं निवारण केलें नाहींस ह्यावरून '**न ते लज्जा न ते घृण**' ( तुला लाजलज्जाहि नाहीं व दयाहि नाहीं ) असेंच म्हटलें पाहिजे. " य वर श्रीकृष्णांनीं उत्तर केलें:–" भीष्म, द्रोण व कर्ण हे तुझ्याच दुष्कृत्यामुळें वध पावले असून तूंहि आतां आपल्याच पापाचें फळ भोगीत आहेस.

**याच्यमानो मया मूढ पित्र्यमंशं न दित्ससि ।**
**पांडवेभ्यः स्वराज्यं च लोभात् शकुनिनिश्चयात् ॥**

मूर्खा, मी याचना करण्यास आलों असतांहि तूं शकुनीच्या नादानें पांडवांस त्यांचा पितृपरंपरागत राज्यभाग व स्वराज्य लोभाविष्ट झाल्यामुळें दिलें नाहींस; भीमाला विष घातलेस; पांडवांस कुंतीसह लाक्षागृहांत जाळण्याचा प्रयत्न केलास; भोळ्या व कुशल नसलेल्या धर्मास द्युतास बोलावून तुम्हीं कपटानें त्याचें सर्वस्व हरण केलें; व द्रौपदीचा भर सभेंत अमानुष छळ केलात; त्याच वेळीं नीचा. तूं वधास पात्र झाला होतास. पांडवांनीं जीं जीं कपटें केलीं म्हणून तूं म्हणतोस तीं तीं तुझ्याच कर्मांची फळें आहेत. केवळ राज्यतृष्णा व राज्यलोभ यांचे भरीं भरून जीं जीं पापें तूं केलींस त्यांचें प्रायश्चित्त आतां भोग. " दुर्योधन:—"खऱ्या क्षत्रियाप्रमाणें मीं अध्ययन, दान व यज्ञयाग केले आहेत पृथ्वीचें राज्य करून शत्रूंस पायाखालीं

तुडविलें आहे; इतर राजांना दुर्लभ असें दिव्य ऐश्वर्य व सुख मी भोगलें आहे; व आतांहि अस्सल क्षत्रियास श्रेयस्कर असें रणांत मरण प्राप्त होऊन आम्हीं सर्व स्वर्गसुख भोग्यास जात आहों. तुम्हीं मात्र जिवंत राहून निराश होत्साते रडत बसा " मानी दुर्योधनाचें हें भाषण ऐकून त्याजवर देवांनीं पुष्पवृष्टि केली व त्यास धन्यवाद दिले!

यानंतर पांडव आपल्या सर्व वीरांसह रथांत बसून जयघोष करीत कौरवांच्या शिबिरांत परत आले. श्रीकृष्णांचें सांगण्यावरून रथांत आपलें गांडीव धनुष्य अक्षय भाते ठेवून अर्जुन खालीं उतरला; त्याचे मागोमाग रथांतून श्रीकृष्ण उतरतांच रथाचा कपिध्वज एकदम गुप्त होऊन रथ व घोडे अकस्मात् जळून खाक झाले! भीष्म द्रोणादिकांनीं सोडलेल्या भयंकर व दिव्य अस्त्रांच्या प्रभावानें हा रथ पूर्वीच जळला होता, पण मी त्यावर बसलेला असल्यामुळें तो आतांपर्यंत शाबूत राहिला; असें सांगून श्रीकृष्णांनीं पांडवांचें समाधान केलें. सर्व वीर रथांतून उतरून शिबिरांतील तंबूंत विश्रांति घेण्यास गेले. श्रीकृष्ण, सात्यकि व पांच पांडव कांहीं एक मंगल कृत्य करावयाचें आहे, असें सांगून शिबिरांत न राहतां दूर एका नदीचे तीरावर जाऊन त्या रात्रीं राहिले.

अठरा दिवसांच्या भयंकर रणकंदनांत दुर्योधनादि सर्व कौरव, भीष्म-द्रोणादि महान् वीर, आपले पुत्र, आप्त व इतरसर्व राजे यांसह मरण पावून सर्व कौरवस्त्रिया व नातसुना विधवा झाल्या, हें वर्तमान गांधारीस कोणी कळवावें, याची धर्मराजास मोठी काळजी पडली. दुर्योधनादि आपले पुत्र वध पावल्याच ऐकून तो क्रोधाविष्ट होईल व आपणांस शाप देऊन भस्म करून टाकील; आणि इतक्यात भगीरथ प्रयत्नानें संपादलेला विजय निष्फळ होऊन जाईल, अशी त्यांस भीति पडली. सर्व कालीं साहाय्य व सल्लामसलत देऊन आपणांस विजय देणारा श्रीकृष्ण यासच गांधारीकडे पाठवावें. असें मनांत योजून त्यानें श्रीकृष्णास तशी विनंती केली. श्रीकृष्णहि रथांत बसून त्वरेनें तसेच थेट हास्तिनापुरास गेले. राजवाड्यांत जाऊन वृद्ध व अंध धृतराष्ट्र आणि गांधारी यास पाहून श्रीकृष्णासहि दुःखाचा उमाळा आवरेना. कांहीं वेळानें मन स्थिर झाल्यावर ते धृतराष्ट्र व गांधारी यांस म्हणाले:-" तुम्हां वडिलांची आज्ञा म्हणून पांडव द्यूत खेळले. वनांत जाऊन त्यांनीं १२ वर्षे क्लेश भोगलें व अज्ञातवासाचें एक वर्ष अपमानांत कंठलें. परत आल्यावर कुलक्षय होऊं नये या बुद्धीनें पांडवांसाठीं फक्त पांच गांवें द्या

अशी मीं भर दरबारांत याचना केली. पण दैवाचे फेऱ्यात सांपडल्यामुळें लोभाविष्ट होऊन तुम्हीं तें ऐकलें नाहीं. त्याचा परिणाम असा झाला कीं, कुरुक्षेत्रांत सर्व क्षत्रियांचा नाश झाला आहे. धर्म, न्याय किंवा स्नेह यांपैकीं कोणत्याहि दृष्टीनें पांडवांकडे दोष नसून ते तुम्हांशीं पूर्ववत् पितृभक्तीनें वागण्यास तयार आहेत. धर्मराजाची भक्ति तुमचेवर कितीं आहे हें तुम्हांस माहीत आहेच. युद्धामध्यें आपले हातून कुलक्षय व क्षत्रियनाश झाला, याबद्दल त्यास अतिशय दुःख व लज्जा वाटत असून त्यामुळेंच तो तुम्हांसमोर येण्यास भीत आहे. झालेल्या या युद्धामध्यें पांडवांकडे कांहीं दोष नाहीं हें लक्षांत आणून त्यांशीं प्रेमानें वागा, एवढीच विनंती आहे." श्रीकृष्णाचें हें भाषण ऐकून गांधारीस कांहींसें बरें वाटलें. वृद्ध, अंध व पुत्रहीन आणि अनाथ झालेल्या धृतराष्ट्रमहाराजांस व मला आतां पांडव व श्रीकृष्णा तूं यांवांचून आधार नाहीं, असें बोलून ती मोठमोठ्यानें रडूं लागली. तेव्हां तिचें पुनः समाधान करून श्रीकृष्ण घाईघाईनें तसेंच परत पांडवांकडे आले.

इकडे भीमाच्या गदाप्रहरानें मांडी मोडून दुर्योधन विवळत पडल्याची बातमी कांहीं लोकांनीं कृप, अश्वत्थामा व कृतवर्मा यांस सांगितली. तेव्हां ते तिघेहि रथी रथांत बसून त्वरेनें तेथें आले. सर्व राजांचा सार्वभौम राजा व अकरा अक्षौ-णींचा अधिपति रक्तबंबाळ होऊन धुळींत लोळत पडलेला पाहून त्यांस फार दुःख झालें व ते शोक करूं लागले. 'जिवंत होतों तोंपर्यंत आपल्या शत्रूंचे मस्तकीं पाय देऊन मीं ऐश्वर्य व राज्यसुख भोगलें. खऱ्या क्षत्रियाप्रमाणें मी केव्हांहिं लढाईत मागें पाऊल घेतलें नाहीं; व अखेर सरळपणानें लढत असतां पांडवांनीं कपटानें व युद्धाचे नियम मोडून मला रणांत पाडलें व आतां लवकरच मला स्वर्ग-सुख मिळणार. अशा स्थितींत अश्वत्थामादिकांनीं मजबद्दल दुःख करण्याचें कारण नाहीं. असें बोलून दुर्योधनानें तशा स्थितींतहि त्यांचें समधान करण्याचा प्रयत्न केला. दुर्योधनाची ही स्थिति पाहून अश्वत्थाम्याचे मनांतील दुःख नाहींसें होऊन त्यास संताप व त्वेष आला. आणि पांडवांचा वध करून सूड उगविण्याची त्यानें प्रतिज्ञा केली. ती ऐकून दुर्योधनाच्या अंतकाळच्या वेदना नाहींशा होऊन क्षण-मात्र त्यास हर्ष झाला. त्यानें कृपाचार्याकडून पाणी आणवून 'आपला शेवटचा सेनापति' या नात्यानें अश्वत्थाम्यास अभिषेक केला. (शल्यपर्व अ० ३५–६५)

दुर्योधनास तेथेंच निरुपायानें विवळत सोडून देऊन अश्वत्थामा, कृपाचार्य व कृतवर्मा हे तिघे कौरव वीर पुनः त्या विस्तीर्ण वटवृक्षाखालीं येऊन राहिले.



अश्वत्थाम्यास मुळींच निद्रा आली नाहीं [ पृ. १३७

रात्र झाल्यानंतर जखमांनीं व श्रमांनीं दमून व थकून गेल्यामुळें कृप व कृतवर्मा यांस लवकरच गाढ झोंप लागली, पण अश्वत्थाम्यास पूर्वींच्या सर्व गोष्टी आठव-ल्यामुळें मुळींच निद्रा आली नाहीं. अठरा दिवसांचें युद्ध त्यामध्यें पांडवांनीं कप-टानें केलेला **भीष्म**, **कर्ण**, **दुर्योधन**, विशेषतः आपला पिता **द्रोण** यांचा वध, यांची आठवण होऊन त्याला जितका उद्वेग, संताप व दुःख झालें, तितकीच दुर्योधनासमक्ष नुकतीच केलेली आपली प्रतिज्ञा कशी शेवटास जाणार, याची त्यास चिंता वाटूं लागली. हे तिघे योद्धे ज्या वडाचे झाडाखालीं राहिले होते, त्याचे आश्रयानें रात्रीचा विसावा घेण्यासाठीं हजारों कावळे तेथें जमले होते. थोड्या वेळानें एक मोठें घुबड हळूंच त्या झाडावर चाहूल लागूं न देतां गुप्तपणानें येऊन बसलें; व त्यानें हळूंहळूं त्या वटवृक्षावरील सर्व कावळे मारून टाकले. पांडव व पांचालवीर बेसावध असतां त्यांजवर कसा सूड उगवून घ्यावा, याचा हा एक गुरूपदेशच या घुबडानें आपणांस केला. असें अश्वत्थाम्यास वाटलें. कांहीं वेळानें त्यानें कृप, व कृतवर्मा यांस जागें करून, आतां आपणपुढें काय करावयाचें असा त्यांस प्रश्न केला. तेव्हां यासंबंधानें त्यांचा पुढीलप्रमाणें संवाद झाला.

**कृपः**—" अविचारी, अदूरदृष्टि व मूर्ख दुर्योधन राज्यलोभाचे भरीं भरून आपल्या मित्रांची व वडील माणसांची हिताची सल्ला न ऐकतां या युद्धांस प्रवृत्त झाला. त्या पापी पुरुषास आम्हीहि मदत केली. म्हणून आम्हां सर्वांवर हा दारुण प्रसंग ओढवला आहे. यावेळीं आपण काय करावें हें आपसांत न ठरवितां धृतराष्ट्र, गांधारी व विदुर या **वृद्ध व पूज्य वडील माणसांची सल्ला आपण घ्यावी,** हेंच मला श्रेयस्कर दिसतें.

**अश्वत्थामाः**—" आज पांचाळ व पांडववीर विजय मिळाल्याचे आनंदभरांत आणि अठरा दिवसांच्या युद्ध श्रमानें दमलेले असे सुखानें व बेसावधपणें झोंप घेत पडले असतील त्यांच्या शिबिरावर गुप्तपणें छापा घालून सर्वांचा संहार करण्यास व द्रोणादिकांच्या वधांचा सूड उगविण्यास ही संधि फार उत्तम आहे. ती आपण वायां घालवितां कामा नये. "

**कृप**----" ही तुझी कल्पना फार चांगली आहे, व ती तुझ्यासारख्या वीरास आमच्या साहाय्यानें खचित पार पाडतां येईल पण झोंप घेत असलेल्या व निःशस्त्र झालेल्या शत्रूचा असा वध करणें पाप आहे. यासाठीं आतां कवच व शस्त्रें काढून

ठेव. आजची रात्र येथें झोंप व विसावा घेऊन उद्यां ताजेतवानें व हुषार झाल्यावर आपण तिघे पांडवांशीं पुनः युद्ध करूं."

**अश्वत्थामा**---"तुम्ही म्हणतां तें खरें आहे; पण पांडवांनीं स्वतः युद्धधर्म कोठें पाळला आहे? त्यांनीं तो अठरा दिवसांत शेंकडों वेळां मोडला आहे. भीष्म व माझा पिता द्रोण हे निःशस्त्र असतांनाच अर्जुनानें व धृष्टद्युम्नानें मारले; भीमानेंहि युद्धाचा नियम मोडून दुर्योधनास गदेचा प्रहार करून रणांत पाडलें, अशा प्रकारचे पापी व अधर्मिक पांचाळ-पांडव निजले असतांनाच त्यांचे शिबिरावर गुप्तपणानें छापा घालून मी त्यांचा संहार करणार; मग यामुळें मला किड्यामुंग्यांचा जन्म येवो किंवा नरक प्राप्त होवो!" असें बोलून अश्वत्थाम्यानें आपला रथ सज्ज केला; व तो पांडवांच्या शिबिराकडे निघाला. कृप व कृतवर्मा हेहि समदुःखी या नात्यानें त्यास सहाय्य करण्यासाठीं त्याच रथांतून त्याज- बरोबर गेले.

शिबिरानजीक आल्यानंतर त्यांनीं आपसांत असें ठरविलें कीं, अश्वत्थाम्यानें छावणींत शिरून कत्तल करावी, व कृप आणि कृतवर्मा यांनीं छावणीचे दाराशींच उभें राहून बाहेर पळून जाण्याचा जे प्रयत्न करतील त्यांचा वध करावा! या बेताप्रमाणें कृप व कृतवर्मा आपापल्या जागीं उभे राहिल्यानंतर अश्वत्थामा गुप्तपणानें शिबिरांत शिरला. शिबिराचे रक्षक बेसावध व झोंपीं गेलेले असल्यामुळें त्यास कोणी प्रतिबंध केला नाहीं. आपल्या पित्याचा वध करणारा जो धृष्टद्युम्न त्याचाच प्रथमतः प्राण घ्यावयाचा, असें ठरवून अश्वत्थामा प्रथम त्याच्याच तंबूंत शिरला. आणि सपाट्यासरशीं जोरानें एक लाथ मारून त्यानें त्यांस जागें केलें. तो पलंगावरून उठतो न उठतो तोंच अश्वत्थाम्यानें त्याचे केश धरून त्याला ओढलें व जमीनीवर आपटून त्याचा गळा व छाती यांवर पाय देऊन तो उभा राहिला; आणि त्याच्या मर्मस्थानीं लाथाबुक्या मारावयाचा त्यानें सपाटा चालविला! अश्वत्थाम्याशीं झटापट करीत व त्यास नखांनीं ओरबाडीत धृष्टद्युम्न खोल गेलेल्या आवाजानें म्हणालाः-- गुरुपुत्रा, मला लाथाबुक्यांनीं न मारतां शस्त्रानें माझा वध कर; म्हणजे मला सद्गति प्राप्त होईल. तेव्हां अश्वत्थाम्यानें त्वेषानें त्यास एवढेंच उत्तर दिलें कीं, अरे कुलांगारा,

**आचार्यघातिनां लोका न सन्ति कुलपांसन ॥**

**गुरुहत्या करणाऱ्याला सद्गति प्राप्त होत नसते.** एवढेंच उत्तर करून त्यानें त्यास नुसत्या लाथाबुक्यांनींच ठार मारलें! धृष्टद्युम्नाचे तंबूंतील ही गडबड

ऐकून शिबिराचे रक्षक व इतर योद्धे जागे झाले. पण शिबिरांत शिरून असा धुमाकूळ माजविणारा कोण व कोठें आहे, याचा कोणासच उमज पडेना! कौरवपक्षांकडील एखाद्या राक्षसानें हें अघोर कर्म चालविलें असावें, असा सर्वांचा समज होऊन जो तो वाट फुटेल तिकडे सैरावैरा पळूं लागला. पण शिबिराच्या दाराशीं येतांच त्यांचा कृप व कृतवर्मा हे संहार करीत! इकडे छावणींतील वीर सावध होऊन सशस्त्र होण्यापूर्वींच अश्वत्थाम्यानें युधामन्यु, उत्तमौजा वगैरे योद्धे यज्ञांतील पशूप्रमाणें लाथाबुक्यांनीं ठार केले! धृष्टद्युम्नाचे शिखंडी वगैरे भाऊ व द्रौपदीचे पांच पुत्र हे घाईघाईनें सशस्त्र होऊन इकडे तिकडे बाणांचा वर्षाव करूं लागले .पण अश्वत्थाम्यानें त्या सर्वांस निरनिराळे गांठून परशूनें व तलवारीनें त्यांचा सपासप वध केला! याप्रमाणें अश्वत्थाम्यादि तिघां कौरववीरांनीं पाहाटे-पर्यंत शिबिरांतलि सर्व योद्धे ठार करून तें निर्मनुष्य करून टाकलें! आधींच शिबिर सोडून गेलेले श्रीकृष्ण, सात्यकी व पांच पांडव एवढे मात्र या भयंकर कत्तलींतुन वांचले! पांडवपक्षांच्या या सात वीरांखेरीज बाकी सर्वांची कत्तल अकस्मात् छापा घालून कशी उडविली,त्याबद्दलची आनंददायक बातमी त्या तिघांनीं दुर्योधनास कळविली. त्या वेळीं दुर्योधनाचे प्राण कंठीं आले असून त्यास मरण-काळच्या असह्य वेदना होत होत्या. तरीहि वरील बातमी ऐकून त्यास हर्ष झाला. ‘ भीष्म, द्रोण किंवा कर्ण यांपैकीं कोणांसहि जो पराक्रम गाजवितां आला नाहीं, तो। कृप व कृतवर्मा यांच्या साहाय्यानें प्रत्यक्ष गाजवून तूं मला मरणसमयीं आनंदित केलें आहेस. तुमचें कल्याण असो; यापुढें तुमची आमची पुन. स्वर्गांत भेट! ’ एवढे शब्द कसेबसे उच्चारून दुर्योधनानें प्राण सोडला! ( सौप्तिकपर्व अ० १–९ ).

रात्रीच्या या भयंकर कत्तलींतून धृष्टद्युम्नाचा एक सारथि मात्र सुदैवानें कृतवर्म्याची नजर न गेल्यामुळें, जिवंत सुटून पळून गेला होता. त्यानें दुसरे दिवशीं सकाळीं धर्मराजाकडे जाऊन घडलेली ही सर्व भयंकर हकीकत त्यास कळविली, ती ऐकून पांडवांस इतकें दुःख झालें कीं, ते मूर्च्छित होऊन भूमीवर पडले! कांहीं वेळानें सात्यकि वगैरेंनीं त्यांस सावध केल्यानंतर धर्मराजा अत्यंत शोक करूं लागला. अठरा दिवस भयंकर व अतुल पराक्रम करून आपल्या भावांनीं विजय संपादन केला, त्यानें सर्व श्रेय एका रात्रींत नाहींसें झालें. व **केवळ गैरसावधपणानें व हयगयीनें मिळालेल्या यशाचें अपयश झालें**. याबद्दल तो सारखा विलाप करूं लागला. ही बातमी ऐकून द्रौप-दीची काय अवस्था होईल, ही कल्पनाहि धर्माचे मनास अतिशय भयंकर वाटून

त्याचा शोक दुणावला आपला वृद्ध पिता पराक्रमी भाऊ आणि तरुण व शूर पांच पुत्र मेलेले ऐकून द्रौपदीवर दुःखाचे डोंगरच कोसळतील असें त्यास वाटूं लागलें. युद्ध सुरू होण्यापूर्वीं द्रौपदी वगैरे राजस्त्रिया पांडवांनीं उपप्लव्य नगरांतच ठेविल्या होत्या. तिकडे जाऊन त्या सर्वांस आणण्यासाठीं धर्मराजानें नकुलास पाठविलें. नकुल, द्रौपदी वगैरेस घेऊन दुसरे दिवशीं परत आला. द्रौपदी धर्मराजाकडे येतांच दुःखशोकाचे घरांत मूर्छित होऊन पडूं लागली; इतक्यांत तिला भीमानें सावरून धरलें. कांहीं वेळानें सावध झाल्यावर ती धर्मराजास म्हणाली:—' माझे भाऊ, आपले मुलगे व अभिमन्यु यांस मृत्युमुखीं देऊन, आपण स्वतः जिवंत राहून या सर्व राज्याचे एकदांचे एकटे मालक झालांत ! त्या पापी अश्वत्थाम्यानें माझे पुत्र व भाऊ निजले असतां त्यांचा असा वध केला, हें एकून माझ्या पोटांत आगीचा भडका उडाला आहे ! त्या द्रोणपुत्राशीं युद्ध करून व त्यास ठार मारून या कृत्याचा तुम्ही सूड उगवीपर्यंत मीं तोंडांत पाणीहि घालणार नाहीं'' असें निर्वाणीचें भाषण द्रौपदीनें केलें. तेव्हां धर्मानें उत्तर केलें:—' द्रौपदी; तूं शोक करूं नको; आपले पुत्र धर्मानें मेले आहेत. त्यांस सद्गतिच मिळेल; अश्वत्थामा सांप्रत फार बिकट पहाडांत गेला आहे. त्याचा वध केल्यास तो तुला कसा समजणार?' द्रौपदी म्हणाली:—' त्याचे डोक्यावर जन्मापासून एक देदीप्यमान मणि आहे. तो काढून आणून आपल्या मस्तकावर धारण करा म्हणजे माझी खात्री होईल, माझें दुःख कमी होईल. इतकें बोलून दुष्टाचा संहार करण्यासाठींच जणूं अवतरलेल्या भीमसेनाकडे वळून ती त्यास म्हणाली:—' वारणावत नगरांत व विराटनगरांत आपल्या बाहुबलानें जसें तुम्ही माझें रक्षण केलें त्याप्रमाणें याहि प्रसंगीं त्या दुष्ट अश्वत्थाम्यास मारून आपल्या पुत्रांच्या वधाचा सूड घ्या, हें काम करण्यास योग्य असा दुसरा पराक्रमी पुरुष नाहीं, द्रौपदीचें हें भाषण ऐकून भीमसेनानें रथ सज्ज करविला; व नकुलास सारथि करून तो अश्वत्थाम्याचा पाठलाग करीत निघाला.

द्रोणाचार्यांची प्रीति अर्जुनाचे खालोखाल अश्वत्थाम्यावर असल्यामुळें अर्जुनखेरीज करून इतर सर्वांपेक्षां अश्वत्थामा अस्त्रविद्येंत श्रेष्ठ आहे. त्याशीं एकटाच भीम लढेल तर भलतेंच संकट ओढवेल; यासाठीं त्याचे साह्यास जाणें जरूर आहे; असें श्रीकृष्णांनीं धर्मराजास सांगून आपला रथ सज्ज केला. त्यांत बसून श्रीकृष्ण, अर्जुन व युधिष्ठिर हे भीमाचे पाठोपाठ गेले. थोड्या वेळानें हे रथ भगीरथी नदीचे तीरीं आले. तेथें व्यास व इतर ऋषींचे समाजांत धुळीनें भरलेलीं दर्भाचीं वस्त्रें नेसून बसलेला अश्वत्थामा त्यांनीं पाहिला. भीमसेनानें त्यास आव्हान करून धनुष्या

सज्ज केलें. भीमसेन व त्याचे मागोमाग अर्जुन, धर्मराज व श्रीकृष्ण आलेले पाहून द्रोणपुत्रानें मूठभर ईषिका ( गवताच्या काड्या ) घेऊन त्या ब्रह्मशिरस अस्त्रानें अभिमंत्रित करून ‘ अपांडवाय ’ (पांडवांच्या संहारार्थ) असें म्हणून वर फेंकल्या! अश्वत्थाम्याचे मनांतील बेत अधिक त्यांचे चेहऱ्यावरून श्रीकृष्णांनीं ताडला असल्यामुळें त्यांनीं अर्जुनास इषारत केली. त्याप्रमाणें अर्जुनाणें शंकराचें स्मरण केलें; व अस्त्रानें अस्त्र शमन होवो असें म्हणून अश्वत्थाम्याचे अस्त्रावर ब्रह्मशिर अस्त्र सोडलें. त्या दोघा वीरांनीं हीं दोन अस्त्रें सोडल्यामुळें सगळ्या विश्वांत वणवा पेटवल्याप्रमाणें भडका उडून सर्वत्र हलकल्लोळ उडाला ! तेव्हां व्यास व नारद तेथें आले. असलीं भयंकर अस्त्रें माणसांवर सोडावयाचीं नसतांहि तीं अशा रीतीनें सोडून सर्व पृथ्वीवर हाहाकार उडविल्याबद्दल त्यांनीं दोघांसहि दोष दिला. तेव्हां अर्जुनानें उत्तर केलें:-- ‘ आम्हां सर्वांच्या संहारासाठीं यानें जें अस्त्र सोडलें, त्याचा केवळ प्रतिकार करण्यासाठींच मीं हें अस्त्र सोडलें. अश्वत्थामाचा नाश करण्यासाठीं किंवा जगास पीडा देण्यासाठीं मीं सोडलें नाहीं. असें म्हणून अर्जुनानें आपलें अस्त्र परत घेतलें. पण अश्वत्थामा ब्राह्मण असूनहि त्याचें तपः सामर्थ्य अर्जुनाइतकें नसल्यामुळें त्यास तें अस्त्र परत घेतां येईना ! तो म्हणाला:---“ भीमाच्या भीतीनें व आपणावर आलेलें महत्संकट टाळून आपले प्राण वांचविण्यासाठीं मीं हें अस्त्र सोडलें. तें आतां मला परत घेतां येत नाहीं. फक्त मीं तें पांडवांवरून काढून पांडवांच्या वंशांतलि स्त्रियांच्या पोटीं जे जे गर्भ असतील त्यांजवर सोडतों. ” व्यासांनीं व श्रीकृष्णांनीं ही गोष्ट मान्य केली. श्रीकृष्ण म्हणाले:—“ आजपर्यंत तूं अनेक पापें केली आहेस, त्यांवर बालहत्येचा आज तूं कळस चढवीत आहेस ! या पापाचें प्रायश्चित्त तुला असें मिळेल कीं, तूं सर्व व्याधींनीं जर्जर होऊन पूं व रक्त यांनीं भरलेला असा तीन हजार वर्षेपर्यंत जंगलांत व डोंगरांत मनुष्यवस्तीपासून दूर भटकत राहाशील. ” व्यासानींहि सांगितलें कीं, “ तूं ब्राह्मण असूनहि क्षत्रियकर्माचरण केलें व अखेर असलीं दारुण कर्में केलींस. याचें प्रायश्चित्त तुला श्रीकृष्ण म्हणतात तसेंच निःसंशय मिळणार आहे. आपल्या मस्तकावरचा मणि मुकाट्यानें धर्मराजास देऊन तूं आतां येथून निघून वनांत जा. ” अश्वत्थाम्यानें निरुपाय होऊन मस्तकावरचा मणि काढून दिला व तो वनांत चालतां झाला.

हा मणि घेऊन पांडव त्वरेनें शिबिरांत परत आले. तेथें द्रौपदी अन्नपाणी वर्ज करून बसलीच होती. धर्मराजांचे आज्ञेवरून भीमसेन तिकडे जाऊन म्हणाला—

" द्रौपदी, हा तुझा मणि घे. तुझ्या पुत्रांचा वध करणाऱ्याचा आम्हीं सूड उगविला आहे. आतां शोक करणें सोड. धर्मराजानें शिष्टाई करण्यासाठीं श्रीकृष्णास पाठविण्याचा विचार केला; त्या वेळीं 'तुम्ही कौरवांशीं सेमेट करीत आहां ! त्या अर्थीं मला पति नाहींत, भाऊ नाहींत, पुत्र नाहींत व श्रीकृष्णा, तूंहि माझा कोणी नाहींस ' अशीं जीं मर्मभेदक भाषणें तूं केलीस त्यांची आठवण कर. प्रतिज्ञेप्रमाणें, आम्हांस राज्य न देणाऱ्या दुर्योधनाचा मी वध केला; दुःशासनाचें हृदय विदारण करून त्याचें रक्त प्राशन केलें; अश्वत्थाम्यासहि जिंकून व निःशस्त्र करून त्याजकडून हा मणि हिरावून आणला. मात्र गुरुपुत्र व ब्राह्मण म्हणून त्यास आम्ही जिवंत सोडलें. द्रौपदी, तो जिवंत असला तरी त्याचें सर्व यश आम्ही हिरावून घेतलें असून त्याचें शरीर मात्र शिल्लक राहिलें आहे. " द्रौपदीचें एवढ्यानें समाधान झालें. तिचें सांगण्यावरून व आपल्या गुरूचा प्रसाद म्हणून धर्मराजानें तो मणि आपल्या मस्तकीं धारण केला. ( सौप्तिकपर्व अ० १०-१८ )

श्रीकृष्णांनीं सांगितलेली युद्धाची हकीकत संजयाचे तोंडून पुनः सविस्तर ऐकल्यानंतर धृतराष्ट्र, गांधारी, कुंति, व कौरवस्त्रिया यांस परमावधीचें दुःख झालें. आपले शंभर पुत्र भीमसेनाच्या गदाप्रहारांनीं एकामागून एक यमसदनीं गेल्याचें ऐकून दुःखाच्या व संतापाच्या भरांत वृद्ध धृतराष्ट्र कांहीं वेळ मूर्छित पडला ! विदुरानें त्याचें यथाशक्ति समाधान केलें. कौरव युद्ध करतां करतां अस्सल क्षत्रियाप्रमाणें रणांत पडले असून त्यांनीं स्वर्ग संपादन केला आहे, त्यांचेबद्दल शोक करणें उचित नाहीं, असे त्यांनीं धृतराष्ट्रास सांगितलें. कुरुक्षेत्रांतील भयंकर संहाराची बातमी अंतःपुरांत समजतांच तें कौरवस्त्रियांच्या हृदयभेदक आक्रोशानें दणाणून गेलें. धृतराष्ट्र व विदुर, सर्व कौरवस्त्रिया, कुंति, गांधारी वगैरे शिबिकांमध्यें बसवून त्यांचेसह कुरुक्षेत्राचे रणभूमीकडे निघाले. राजकुलांतील या अलंकारहीन स्त्रिया केश मोकळे सोडून व एक वस्त्र नेसून पालख्यांतून हस्तिनापुराच्या रस्त्यांतून अशा रितीनें जाऊं लागल्या असतां नगरवासी स्त्रीपुरुषांस पराकाष्ठेचें दुःख झालें; व जिकडे तिकडे रडण्याचा आर्तस्वर ऐकूं येऊं लागला. धृतराष्ट्र नगरांतून बाहेर पडल्याची बातमी ऐकून धर्मराजाहि आपले भाऊ, द्रौपदी व पांचाळस्त्रिया यांसह त्यांस सामोरा गेला. गंगातीरानजीक येतांच त्यास कौरवस्त्रियांचा घोळका दिसला. ' धर्मराजाची ती धर्मज्ञता व तो दयाळूपणा कोठें गेला ? त्यानें राज्यासाठीं आपले स्नेही, भाऊबंद, गुरु व वडील माणसें कशीं मारलीं? किंबहुना त्यांना मारण्यासाठीं अभिमन्यु व पांच द्रौपदीपुत्र यांचे बळीं



धर्मराजानें तो मणि आपल्या मस्तकीं धारण केला [ पृ. २०२



धृतराष्ट्र व भीम—प्रतिमा. [ पृ. २०३

तरी कसे दिले ? ' इत्यादि प्रकारचे या स्त्रियांचे शोकाचे व धिक्काराचे उद्गार ऐकत ऐकत धर्मराजानें धृतराष्ट्राकडे जाऊन त्याचे चरणीं मस्तक ठेवलें. धृतराष्ट्रानें त्यास उठवून कसेंबसें अलिंगन दिलें.नंतर तो भीम कोठें आहे, अशी चौकशी मोठ्या उत्सुकतेनें करूं लागला. धृतराष्ट्राचे मनांत कांहीं तरी दुष्ट बुद्धि उत्पन्न झाली आहे, असें श्रीकृष्णांनीं ताडलें. भीम पायां पडून आलिंगनासाठीं धृतराष्ट्रापुढें जात असतां श्रीकृष्णांनीं त्यास बाजूस सारलें; व दुर्योधनानें पूर्वीं केलेली भीमाची लोखंडाची प्रतिमा पुढें केली ! धृतराष्ट्रास दुःख, संताप, द्वेष व सूड उगविण्याची उत्कंठा यांनीं पछाडल्यामुळें त्यानें बेसावधपणें भीम समजूनच ती प्रतिमा अतिशय जोरानें कवटाळली ! धृतराष्ट्र वृद्ध व अंध होता, तरी त्याचें सामर्थ्य फार मोठें असल्यामुळें त्याच्या या जबरदस्त मिठीनें ती प्रतिमा भंगून खालीं पडली ! धृतराष्ट्राच्याहि छातीस इजा होऊन रक्त ओकत तो भूमीवर पडला. कांहीं वेळानें सावध झाल्यानंतर त्यास आपल्या या कृत्याचा पश्चात्ताप होऊन तो भीमाबद्दल शोक करूं लागला! तेव्हां श्रीकृष्णांनीं त्यास खरी हकीकत सांगितली. ते म्हणाले:—' पुत्रस्नेहामुळें निष्ठुरपणें तुझे हातून भीमाचा वध होणार होता तो आम्हीं टाळला. धृतराष्ट्रा, तूं व्यवहारज्ञ आणि राजधर्म व नीति जाणणारा असूनहि भीष्म, द्रोण, विदुर वगैरेंचें सांगणें ऐकलें नाहींस; व आपल्या पुत्रांस न आवरतां त्यांस युद्ध करूं दिलेंस. हा तुझाच अपराध असून त्यामुळेंच आपल्या कुलाचा व क्षत्रियांचा नाश झाला आहे. अशा स्थितींत भीमाला मारण्याची इच्छा तूं कां करावी ? भीमास मारलें म्हणजे तुझे पुत्र जिवंत होतात असें थोडेंच आहे ! ' श्रीकृष्णांचें हें भाषण ऐकून धृतराष्ट्रास पश्चात्ताप झाला व पुत्रप्रेमामुळें आपल्या हातून होणारें पातक श्रीकृष्णांनीं टाळलें, याबद्दल त्यानें त्यांस धन्यवाद दिले. भीम, अर्जुन, नकुळ, सहदेव यांनींहि त्याचे पायीं मस्तक ठेवलें असतां त्यांस अश्रूंनीं न्हाणून धृतराष्ट्रानें पितृवात्सल्यपूर्वक त्यांस आलिंगन दिलें. (स्त्रीपर्व अ० १–१३ )

यानंतर पांडव, श्रीकृष्ण व द्रौपदी हीं गांधारीस भेटावयास आलीं. कुंतीप्रमाणेंच आपण व धृतराष्ट्र यांनीं पांडवांचें पालन व संरक्षण करणें उचित आहे; दुर्योधन, शकुनि, कर्ण व दुःशासन या चांडाळचौकडीमुळेंच युद्ध होऊन हा संहार झाला. त्याचा पांडवांकडे कांहीं एक दोष नाहीं; हें गांधारी जाणत होती. पण भीमानें दुःशासनाचें हृदय विदारण करून अनार्याप्रमाणें त्याचें रक्त प्राशन केलें, दुर्योधनाचे मांडीवर अधर्मानें गदाप्रहार करून त्यास मारलें; व

१०० कौरवांपैकीं एकहि शिल्लक ठेवला नाहीं; वृद्धपणीं आपणां उभयतांस आधार म्हणून एकहि पुत्र जिवंत ठेवला नाहीं; याबद्दल गांधारीस दुःख व क्रोध आला होता; व तसें तिनें स्पष्ट बोलूनहि दाखविलें. भीमानें ह्या सर्व गोष्टी कबूल केल्या, पण द्रौपदीचा भरसभेंत दुःशासन, दुर्योधनांनीं जो छळ केला, त्याची आठवण भीमानें गांधारीस दिली; आणि प्रतिज्ञा पुरी करण्यासाठीं आणि वरील अमानुष कृत्याचा सूड उगविण्यासाठीं आपण हें कृत्य केलें आहे, त्याची क्षमा असावी, अशी तिला विनंति केली. गांधारीनें धर्म कोठें आहे, म्हणून विचारलें तेव्हां धर्मानें तिचे पायांवर डोकें ठेवून म्हटलें:–" मित्रहत्या, भ्रातृहत्या करणारा व सर्व क्षत्रियांच्या नाशास कारणभूत झालेला हा निष्ठुर व निर्दय युधिष्ठिर तुझ्यापुढें उभा आहे; त्यास शाप देऊन भस्म कर. मला पाप्याला आतां धन, राज्य किंवा प्राण यांस घेऊन काय करावयाचें आहे?" धर्माचें हें बोलणें ऐकून गांधारी कांहींच बोलली नाहीं. तिच्या पायां पडण्यासाठीं तो खालीं वांकला त्या वेळीं तिला त्याच्या पयांचीं नखें मात्र दिसलीं. तीं तिच्या दृष्टीच्या तेजामुळें जळून काळीं झालीं! कांहीं वेळानें तिच्या मनांतील क्रोध शांत होऊन तिनें पांडवांस जवळ घेऊन त्यांस मातिप्रमाणें कुरवाळलें! यानंतर पांडव व द्रौपदी ही कुंतीकडे गेली. तेरा वर्षांनीं मातेची गांठ पडल्यामुळें सर्वांस त्रिभुवन आठवून अत्यंत दुःख झालें. द्रौपदीस पुनः आपल्या पुत्रांची आठवण होऊन रडें कोसळलें. तिचें व पांडवांचें समाधान करून त्यांसह कुंती गांधारीकडे आली. सर्वांच्या भेटी होऊन एकमेकांनीं एकमेकांचें कसेंबसें समाधान केलें. (स्त्रीपर्व अ. १४--१५.)

यानंतर ही सर्व मंडळी कुरुक्षेत्राचे मैदानांत आली. रणभूमीवर पसरलेलीं व कोल्ह्या-गिधाडाच्या टोळ्यांनीं वेष्टिलेली अपल्या पुत्रांची, पित्याचीं, भावांचीं व पतींचीं प्रेतें पाहून त्या स्त्रिया अत्यंत हृदयभेदक विलाप करूं लागल्या! आपलें १०० मुलगे--विशेषतः दुर्योधन--यांचीं प्रेतें पाहून तर गांधारीचे दुःखास पारावार राहिला नाहीं. विदुर, संजय, युयुत्सु, धौम्य, सुधर्मा यांजकडून वीरांच्या दहनाची धर्मराजानें सर्व तयारी करविली. कांहीं वेळानें सर्व कुरुक्षेत्रांत चंदन, अगरु व इतर लांकडें, रथ, शस्त्रें व बाण यांच्या चिता तयार होऊन पेटल्या! दहनाच्या वेळचे मंत्र. स्त्रीपुरुषांचे विलाप व कोल्हे-गिधाडे यांचे शब्द यांनीं कुरुक्षेत्र भरून गेलें! तेथील विधि आटोपल्यावर ही सर्व मंडळी भागीरथीतीरीं आली. तेथें सर्वांनीं मृतांचें तर्पण केलें. कर्ण हा सूतपुत्र नसून खरोखर पांडवांचा वडील भाऊच

आहे, हें या वेळीं कुंतीनें धर्मराजास व इतर पांडवांस सांगितलें. तें ऐकून त्यांस--विशेषतः धर्मराजास--पराकाष्ठेचें दुःख झालें. कर्ण हा आपला वडील भाऊ आहे ही गोष्ट कुंतीनें आपणांस पूर्वींच सांगितली असती, तर सभेंतील छळ, वनवासांतील दु:खें, युद्ध व त्यांतील संहार हीं सर्व टळलीं असतीं; असें वाटून धर्मराजास फार दु;ख झालें. इतरांबरोबर धर्मराजानें कर्णाचें, आपला वडील भाऊ या नात्यानें, और्ध्वदेहिक कर्म केलें. ( स्त्रीपर्व अ० १६--२७ )



# प्रकरण अकरावें.



## भीष्मांचा अंतकाळचा उपदेश

——०:०——



न युद्धाच्या धडाक्यामध्यें व खणखणाटामध्यें जरी धर्माचे मनास दुःख अथवा पश्चात्ताप हीं शिवलीं नाहींत; तरी तें संपल्यानंतर रणभूमीवर जिकडे तिकडे पसरलेलीं प्रेतें, स्त्रियांचा हृदयभेदक शोक व विलाप आणि उत्तरक्रियेसाठीं गंगा तीरीं जमलेला तो लोकसमुदाय पाहून युधिष्ठिराच्या धर्मशील कोमल, सात्त्विक व दायळू अंतःकरणास दुःख व किंचित् पश्चात्ताप वाटूं लागला. त्यातून कर्णासारखा शूर, पराक्रमी व दानशूर वडील भाऊ आपल्या हातून मरण पावल्याचें कळल्यामुळें तर त्यास अतिशयच वाईट वाटलें. गंगेचे कांठीं उत्तरक्रिया केल्यानंतर कांहीं दिवस युधिष्ठिर, धृतराष्ट्र वगैरे सर्वजण तेथेंच राहिले. त्यांचे समाचारास नारद व इतर ऋषि तेथें आले. त्यास धर्मानें आपल्या दुःखाचें कारण निवेदन करून, युद्ध ऐन रंगांत आलें असतां कर्णाच्या रथाचें चाक पृथ्वीनें कसें गिळलें,असें त्यास विचारलें. तेव्हां नारदानीं कर्णाचें पूर्ववृत्त त्यास पुढील प्रमाणें सांगितलें:-द्रोणाचार्यांनीं ब्रह्मास्त्र खेरीजकरून इतर सर्व अस्त्रें कर्णास शिकविलीं. तो ब्राह्मण अथवा तपोनिष्ठ क्षत्रिय यांपैकीं कोणी नसल्यामुळें त्यांनीं त्यास हें अस्त्र शिकविलें नव्हतें. तेव्हां परशुरामाकडे जाऊन ' मी भृगु

गोत्री ब्राह्मण आहे ' असें खोटेंच सांगून तो त्याजपाशीं राहिला; तेथें असतां कर्णाचे हातून एका ब्राह्मणाची होमधेनु मरण पावली. म्हणून ' ऐन युद्धांत पृथ्वी तुझ्या रथाचें चाक गिळील व तुझा हाडवैरी तुझें शीर उडवील ' असा त्यानें शाप दिला. परशुरामानें त्यास ब्राह्मण समजून ब्रह्मास्त्र सोडण्याचे आणि परत घेण्याचे सर्व मंत्र शिकविलें. पुढें एके समयीं परशुराम आपलें डोकें त्याचे मांडीवर ठेवून निजले असतां एका किड्यानें येऊन त्याची मांडी पोखरण्यास प्रारंभ केला! हालचाल केल्यास गुरुची झोंप मोडेल, या भीतीनें त्या वेदना कर्णानें मुकाट्यानें सहन केल्या.परंतु त्याचे मांडींतून बाहेर आलेलें ऊन ऊन रक्त अंगास लागल्यामुळें जामदग्न्य जागा झाला व हा काय प्रकार आहे असें त्यानें त्यास विचारलें. कर्णाचें उत्तर ऐकून येवढे दु:ख सहन करण्यास लागणारें धैर्य ब्राह्मणाचें अंगीं नसावयाचें, हा कांहीं खरा ब्राह्मण नव्हे असें त्यास वाटलें. खरें वृत्त पुसलें असतां कर्णानें आपण ब्राह्मण नसून सूतपुत्र आहों असें नम्रपणानें सांगितलें. परशुरामानीं त्याचें असत्याचरण व कपट पाहून हें ब्रह्मास्त्र तुला वेळेला कधीं सुचावयाचें नाहीं असा त्यास शाप दिला!" उघडच आहे कीं, **ज्या विद्येचें मूळ कपट व खोटेपणा यांत आहे ती आणीबाणीच्या वेळीं निष्फळच व्हावयाची !** नारद नीं सांगितलेल्या या पूर्ववृत्तांतानेंहि धर्माचें समाधान झालें नाहीं य:कश्चित्त राज्याकरितां नश्वर राज्यवैभावाकरितां आपण आपल्या कुलांचा क्षत्रियजातीचा कर्णासारखा भावाचा व कौरवांचा नाश करण्यास कारणीभूत झालों ही गोष्ट त्याचे मनास फारच टोचूं लागली; व हें राज्य अर्जुनास देऊन टाकून आपण अरण्यांत तप करण्यास जावें; असेंहि त्याचे मनांत आलें. ही त्याची उद्विग्नता व निराशा अर्थातच भीमादि पांडव, द्रौपदी व तेथें आलेले ऋषि यांस आवडली नाहीं लहानपणापासून कौरवांचे शतश: अपराध सहन केले; द्रौपदीची विटंबना व छळणूक, द्वेष मनांतल्या मनांत दडपून टाकून धर्मासाठीं निमुटपणें सोशिली; वनवासांतील क्लेश व अज्ञातवासांतील अपमानकारक स्थिति सहन केली; परत आल्यावर समोपचारानें राज्य परत मागितलें; परंतु तें तसें मिळत नाहीं असें पाहून कौरवांशीं धर्मानें न्यायानें उघड युद्ध आरंभिलें; आणि त्या सर्वांचा नि:पात करून पूर्वींचीं दु:खे दुरुत्तरें, छळ व अपमान यांचा पुरा सूड उगविला व न्यायानें आपलें राज्य परत मिळविलें.या सर्वांचे शेवट गोड होण्याची वेळ जवळ आली असतां एकाद्या तपस्वी व दुबळ्या ब्राह्मणाप्रमाणें क्षत्रियास न शोभण्यासारखें वर्तन करण्याची धर्मानें मनांत आणावें, हें पाहून पांडवादिकांस आश्चर्य व दु:ख वाटून धर्माचा बराच रागहि आला; अर्जुन

व भीम यांनीं व ऋषींनीं त्याची अनेक प्रकारें समजूत केली तेव्हां शेवटीं तो राज्याभिषेक करून घेण्यास कबूल झाला.

नंतर युधिष्ठिर आपल्या रथांत बसला, भीमसेन त्याचा सारथी झाला, अर्जुनानें त्याचेवर श्वेत छत्र धरिलें व त्याचेवर वारण्यासाठीं नकुल--सहदेवांनीं चवऱ्या व मोर्चेलें हातीं घेतली ! अशा थाटानें धर्मानें हस्तिनापुरांत प्रवेश केला. नगराचे रस्ते, चौक व देवळें त्यांचे सन्मानार्थ गुढ्या, तोरणें व पताका यांनीं शृंगारून स्त्रीपुरुषांनीं त्यांचें मन:पूर्वक स्वागत केलें. वनवासास गेल्यापासून १३ वर्षांनीं परत आलेल्या या शूर, पराक्रमी, तेजस्वी व धर्मनिष्ठ राजपुत्रांस पाहून प्रजाजनांस फारच आनंद झाला. दुर्योधनाच्या एका राक्षस मित्रानें मात्र चर्वाक ब्राह्मणाच्या रूपानें येऊन या आनंदोत्सवावर विरझण घालण्याचा प्रयत्न केला. राज्याकरितां आपलें कुल; ज्ञाति व गुरु यांचा वध करणारा तूं दुष्ट राजा आहेस, असें या सर्व ब्राह्मणांचें मत आहे ; तुला धिःकार असो' असें तो म्हणाला ! तें ऐकून धर्मराजानें नम्रपणानें त्यांचें मत विचारलें असतां ब्राह्मणांनीं त्यास आशिर्वाद दिले; व त्या तपोनिष्ठ ब्राह्मणांनीं रागानें नुसत्या हुंकारानेंच त्या नीच राक्षसाचा वध केला ! नंतर योग्य कालीं सुमुहूर्तावर धर्मराजास सिंहासनावर बसून श्रीकृष्णांनीं स्वत: आपल्या हातानें पांचजन्यांतील पवित्र उदकानें त्यास राज्याभिषेक केला ! राज्यकारभारासाठीं निरनिराळे मंत्री व अधिकारी नेमून धृतराष्ट्राच्याच अनुमतानें राज्य चालविण्याचें धर्मानें वचन दिलें. युद्धांत पडलेल्यांच्या स्मरणार्थ धर्मशाळा, पाणपोया, अन्नछत्रें तळीं व विहरी त्यानें बांधल्या; आणि युद्धांत मरण पावलेल्यांच्या अनाथ स्त्रियांचें व पोरक्या मुलांचें गौरवपूर्वक पालनपोषण केलें. याप्रमाणें हा राज्याभिषेकसमारंभ आटोपल्यावर राजे व क्षत्रिय आपापल्या देशास निघून गेलें. ( शांतिपर्व अ० १–४६ )

शेवच्या आठ दिवसांच्या युद्धांतील सर्व लढाया व नंतर झालेला धर्माचा राज्याभिषेक चालला असतां, इकडे वृद्ध वीर भीष्म शरपंजरीं पडून उत्तरायणाची वाट पहात होते. राज्याभिषेकानंतर कांहीं दिवसांनीं युधिष्ठिर श्रीकृष्णाचे भेटीस गेला. त्या वेळीं श्रीकृष्ण ध्यानस्थ बसले असल्यामुळें त्यांनीं त्यास उत्तर दिलें नाहीं. त्रैलोक्याच्या प्रभूला दुसऱ्या कोणाचें ध्यान करण्याचें कारण काय ? असें धर्मराजाला गूढ पडलें. परंतु, भीष्म या वेळीं माझें ध्यान करीत आहेत म्हणून माझें अंत:करण त्यांचेकडे लागलें आहे, असें श्रीकृष्णांनीं उत्तर दिलें ! नंतर पांडव

व श्रीकृष्ण रथांत बसून रणभूमीवर जेथें भीष्म पडले होते तेथें गेले. अर्जुनाचे बाणांनीं जखमी होऊन रथांतून खालीं पडल्यापासून भीष्मांनीं उत्तरायण होईपर्यंत प्राण धारण करण्याचा निश्चय करून वाणी, मन व कर्म हीं सर्व त्यांनीं श्रीकृष्णाकडे लाविलीं होतीं. श्रीकृष्ण व पांडव भीष्मांजवळ येऊन नम्रपणानें बसल्यानंतर श्रीकृष्णांनीं त्यांच्या प्रकृतीविषयीं विचारपूस केली. नंतर, इतक्या वर्षांत मिळविलेला अनुभव आणि राजधर्म, क्षत्रियधर्म, आश्चर्यधर्म व नीति, यांचा युधिष्ठिरास बोध करून त्याचें दुःख नाहींसें करा, अशी त्यांनीं त्यांस विनंती केली. 'माझें शरीर बाणांच्या जखमांनीं व्याकूळ झालें आहे, मन आणि बुद्धि चंचल व मूढ झालीं आहेत. मला वारंवार मूर्च्छा येत आहे. केवळ तुझ्या कृपेनेंच मी अजून जिवंत राहिलों आहे; माझ्यानें बोलवत नाहीं, याची क्षमा असावी.' असें भीष्मानें दीन वाणीनें उत्तर दिलें. तेव्हां श्रीकृष्णांनीं भक्तप्रेमानें गहिंवरून 'तुमची मूर्च्छा, वेदना, क्लेश व मोह हीं सर्व नष्ट होतील' असा त्यांस वर दिला! पुढें दिवस अस्तास गेल्यामुळें त्यांचा निरोप घेऊन पांडव वगैरे सर्व आपापल्या वाड्यांत परत आले.

दुसरे दिवशीं पांडव, श्रीकृष्ण, युद्धांतून वांचलेले योद्धे, थोडे बहुत राजे व क्षत्रिय आणि ऋषि भीष्मांकडे गेले. उत्तरायण सुरू होण्यास ५६ दिवस अवकाश असल्यामुळें तेवढ्या कालांत भीष्मांनीं आपलें ज्ञान, अनुभव व विद्या यांचा उपयोग करून धर्मास बोध करावा, असें श्रीकृष्णांनीं पुनः सुचविलें. योगेश्वर श्रीकृष्णाच्या प्रसादानें आपल्या शरीराच्या सर्व वेदना पार नाहींशा होऊन, आपल्या अंतःकरणास हुषारी व बुद्धीस तरतरी आली आहे; असें सांगून, राजधर्म व राजनीति यांचा श्रीकृष्णांनींच स्वतः धर्मास उपदेश कां केला नाहीं, असें भीष्मांनीं विचारलें. 'तेव्हां भक्ताचें यश व कीर्ति वाढावी यासाठीं मी उपदेश न करितां तुम्हांस तो करण्यास सांगत आहे' असें त्यांनीं उत्तर दिलें! सर्वांपेक्षां युधिष्ठिराचेच अंगीं धैर्य, क्षमा, ब्रह्मचर्य, शांति, सत्य व बुद्धिमत्ता अधिक असल्यामुळें राजधर्माविषयीं प्रश्न करावयास तोच पुरुष योग्य आहे; असें पाहून भीष्मांनीं त्यास आपल्या शंका विचारण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें राजनीति व इतर अनेक विषयासंबंधानें आपणास जे संशय असतील, त्याबद्दल रोज धर्मानें प्रश्न करावे व भीष्मांनीं त्याचें समाधान करावें. याप्रमाणें मरणकालपर्यंत भीष्मांचे मुखांतून बोधामृताचा जो प्रवाह सारखा चालला

होता, तो महाभारताच्या ' शांति ' व ' अनुशासन ' या दोन पर्वांत व्यासांनीं सांठविला आहे. ( शांतिपर्व अ० ४७--५५ )

प्रथमत: धर्मानें राजधर्म कोणता व राजाचीं कर्तव्यें कोणतीं? असा प्रश्न केला तेव्हां भीष्मांनीं जें उत्तर दिलें व इतरत्राहि पुष्कळ ठिकाणीं राजधर्म व क्षात्रधर्म यासंबंधानें जे विचार महाभारतांत आढळतात त्यांवरून इकडील पूर्वीचे क्षत्रिय आणि राजे व योद्धे यांच्यासंबंधांची आर्यांची उदात्त कल्पना सर्वांचे ध्यानांत येणार आहे. भीष्म म्हणाले:---- राजानें प्रथमतः धर्मशील होऊन देवता व ब्राह्मण यांचें प्रजेच्या हितासाठीं पूजन करावें त्यानें नेहमीं उद्योगी व उल्हासी असावें कोणत्याही कार्यांत अपयश आल्यास तें साध्य करण्यास त्यानें दुप्पट हिमतीनें पुन: प्रयत्न करावा. **राज्यानें सत्याची कास कधींहि सोडूं नये** प्रजेवर अंमल करतांना त्यानें वसंत ऋतूंतील सूर्याप्रमाणें फाजील सौम्यपणा किंवा कडकपणाहि दाखवूं नये.

**यथाहि गर्भिणी हित्वा स्वप्रियं मनसोऽनुगम्॥**
**गर्भस्य हितमादत्ते तथा राज्ञाप्यसंशम् ॥**
**वर्तितव्यं कुरुश्रेष्ठ सदा धर्मानुवर्तिना ॥**
**स्वप्रियं तु परित्यज्य यद्यल्लोकहितं भवेत् ॥**

जशी गर्भिणी स्त्री आपल्या मनास प्रिय असेल तें न करतां गर्भास हितकारक होईल त्याचेंच ग्रहण करितें; त्याप्रमाणें राजांनीं राजधर्माप्रमाणें वागून आपणास आवडेल तसें न वागतां ज्यापासून लोकहित होईल तसें वर्तावें. **लोकांचें हित, सत्याचें पालन, व्यवहारांत सरळपणा व आत्मसंयमन** हे गुण अंगीं आणणें हा राजांचा सनातनधर्म आहे. ज्यांचें मन नेहमीं संशयी असतें कोणावरहि विश्वास नसतो,जो प्रजेचें सर्वस्व हरण करूं पाहतो व ज्याची वागणूक सरळपणाची नाहीं, त्या राजाचे नातलग व इष्टमित्रहि त्यास प्रतिकूल होतात. **बापाच्या घरामध्यें जशीं मुलें निर्भय वागतात तशी प्रजा ज्याचे राज्यांत सुखानें नांदते,** ज्याचे नागरिक लोक न्याय, अन्याय जाणणारे असून आपलें वैभव निर्भयपणें दाखवितात, ( शां. प. अ० ५५–श्लोक ३३–३७ ) लोककर्तव्य करण्यात दक्ष व त्यासाठीं प्राण देण्यास तत्पर, भांडण-तंटे करण्यास पराङ्मुख,राजनिष्ठ व उदार असतात; तोच राजा ' भूपति ' या पदवीस योग्य होय. **प्रजेचें सर्व प्रकारें**

**संरक्षण करणें हें राजाचें पाहिलें कर्तव्य होय.** तें जो न करील त्याचा-शिक्षण न देणारा गुरु व अपमान करणारी पत्नी यांचा समुद्रांत फुटलेल्या **नावे**-प्रमाणें प्रजेनें तात्काळ त्याग करावा, ( शां. प. अ. ५७ श्लोक ४४--४५ )

परंतु सर्व मनुष्यास हस्त-पादादि अवयव सारखेच असून सुख--दु:ख व जन्म-जरामरण हींहि सर्वांस सारखीच आहेत;व सर्व मनुष्यप्राण्याची योग्यताहि सारखीच आहे. तर एका मनुष्यानें इतर सर्वांवर सत्ता चालवावी याचें कारण काय ? ही प्रवृत्ति कां पडली असा युधिष्ठिरानें प्रश्न केला. तेव्हां आरंभीं राजा वगैरे कांहीं नसतांना प्रजाजनच एकमेकांचें न्यायानें कसें संरक्षण करीत असत; पण पुढें मत्सर, द्वेष व लोभ यांचा उद्भव झाल्यामुळें त्यांचें संरक्षण करण्यास एका राजाची कशी आवश्यकता उत्पन्न झाली, नंतर देवांनीं पृथु, मनु वगैरे राजे पृथ्वी-वर कसें पाठवून दिले हा इतिहास भीष्मांनीं सांगितला. चारी वर्णांचीं कर्तव्यें नीट रीतीनें होणें हें सर्वस्वीं राजावर अवलंबून आहे. राजानें दुसऱ्याची याचना कधींहि करूं नये, पण याचकांच्या इच्छा तृप्त कराव्या अध्ययन व यजन करावें, पण शिक्षणाचें ब्राह्मणाचें काम आपल्याकडे घेऊं नये.

**कालो वा कारणं राज्ञो राजा वा कालकारणम् ।**
**इति ते संशयो मा भूद्राजा कालस्य कारणम् ॥**
**दण्डनीत्या यदा राजा सम्यक्कार्त्स्न्येन वर्तते ।**
**तदा कृतयुगं नाम कालसृष्टं प्रवर्तते ॥**

जसा बरा वाईट काल असतो त्याप्रमाणें बरा बाईट राजा असतो, कीं जसा राजा असतो तसा काल बनतो, असा संशय घेण्याचें कारण नाहीं. **राजा जसा बरा वाईट असतो तसा कालमहिमा बदलतो**, राजा ज्या वेळेस स्वकर्तव्य प्रमाणिकपणानें व दक्षतेनें करतो त्यावेळीं कृतयुगच आहे असें समजावें. **लोभानें किंवा अन्यायानें प्रजेस पिळून मिळाविलेलें द्रव्य फार दिवस टिकत नाहीं.** लोभानें प्रजेपासून असह्य कर वसूल करणारा राजा, दुधासाठीं गाईचीं चारी अचळें पिळणाऱ्या मनुष्याप्रमाणें अत्यंत निंद्य होय. दुर्बलांचें रक्षण करण्यासाठींच ' राजा ' हीं व्यक्ति ब्रह्मदेवानें उत्पन्न केली आहे. **दुर्बलांचें आपल्या वाणीनें, शरीरानें व कृतीनें सर्वस्वी रक्षण करणें हें राजाचें कर्तव्य आहे.** दुर्बल आपलें काय करणार आहे, असें उन्मत्त राजास वाटेल. **पण दुर्बलाच्या नुसत्या नेत्रांत जें सामर्थ्य आहे तें इतरांच्या**

**बाहूंतहि नाहीं.** बलवानानें अपमान केला असतां किंवा घात केला असतां अथवा कपटाचरणानें नाश होत असतां, दुःखानें आक्रोश करणाऱ्या दुर्बल अनाथांचे साह्यास कोणी न गेल्यामुळें त्यांची सुटका झाली नाहीं, तर त्या देशाच्या राजावर परमेश्वरी दंड कोसळेल. एवढेंच नव्हें तर त्याच्या सर्व वंशाचें निर्मूलन होईल, हें त्यानें खास समजावें !

**मृषावादं परिहरेत् कुर्यात्प्रियमयाचितः ।**
**न कामान्न च संरंभात् न द्वेषाद्धर्ममुत्सृजेत् ॥**

**राजानें असत्य कधींहि बोलूं नये व प्रजेनें याचना करण्यापूर्वींच तिचें प्रिय करावें.** राग द्वेष, हयगय व काम यांस वश होऊन राजानें आपलें कर्तव्य करण्याचें कधींहि सोडूं नये. ज्या राजाचे घराण्यांतील पुरुष, अमात्य, योद्धे, नागरिक व शेतकरी सर्व सारखेच संतुष्ट व सुखी असून धनधान्य--संपन्न असतात, त्याचेंच राज्याचा पाया भक्कम आहे, असें समजावें ( शांतिपर्व अं० ५९--९४. )

युद्ध करणाऱ्या क्षत्रियाचें कर्तव्य काय, या विषयीं भीष्मांनीं केलेला उपदेश असाच उदात्त व मनोहर आहे. शत्रु चिलखत घालून आला तरच क्षत्रियानें चिलखत घालून लढावें; एकटा आला तर एकट्यानेंच त्याशीं लढावें; शत्रु ज्या मार्गाचा अवलंब करील त्याचाच क्षत्रियानें आश्रय करावा; शत्रु संकटांत असतां, तो भयभीत अथवा जित झाला असतां, त्यानें शस्त्र खालीं ठेवलें असतां, किंवा तो शरण आला असतां त्याशीं युद्ध करूं नये. शस्त्रें विषांत बुडवूं नयेत; ज्याचें शस्त्र मोडलें आहे व जो अनाथ झाला आहे, त्याजवरहि हत्यार उचलूं नये. जखमी असतील त्यांची शुश्रूषा करून त्यास आपल्या देशांत परत पाठवून द्यावें व कैद केलेले असतील त्यांस सोडून द्यावें. **युद्ध करतांना मनांत द्वेष, सूड अथवा क्रोध ठेवूं नये. कर्तव्य म्हणून युद्ध करावें.**

**धर्मेण निधनं श्रेयो न जयः पापकर्मणा ।**
**अधर्मयुक्तो विजयो ह्यध्रुवोऽस्वर्ग्य एव च ॥**

**धर्मानें युद्ध करतां करतां मरण आलेलें पत्करिलें; पण कपटानें कधींहि जय मिळवूं नये. अन्यायानें मिळविलेला विजय क्षणभंगुर**

**व पापमय आहे**, हें तत्त्व क्षत्रियांनीं ध्यानांत ठेवावें. या उपदेशावरून आर्य क्षत्रियांना युद्ध करण्यामध्येंहि नीतिचें वळण कसें लावण्यांत येत असें, तें दिसून येईल. ( शांतिपर्व अ० ९५--९६ )

मनुष्याच्या सर्व सामान्य धर्मांचें विवेचन करतांना भीष्मांनीं केलेला उपदेशहि असाच मनोहर व गंभीर आहे. सर्व कर्तव्यामध्यें,

**मातापित्रोर्गुरूणां च पूजा बहु मता मम ॥**

आई बाप व गुरु यांस पूज्य मानणें हें कर्तव्य श्रेष्ठ होय, असें भीष्मांनीं मत दिलें आहे. पूज्यभाव, नम्रपणा, भक्ति वगैरे गुण हाच सदाचरणाचा व समाजसुस्थितीचा पाया आहे. त्याचा बिघाड झाल्यास गृहव्यवस्था व समाजबंधनें हीं दोन्हीं विस्खलित होतात. माता, पिता व गुरु यांना सन्मान देणें हा सर्व सग्दुणांचा श्रीगणेशायनमः आहे. ' दहा उपाध्यायांहून पिता श्रेष्ठ आहे. पित्यापेक्षां किंबहुना सर्व जगापेक्षां माता दसपट श्रेष्ठ आहे ! मातापिता हीं आपणांस जन्म देतात; परंतु गुरु सदुपदेशानें व सन्मार्ग दाखवून जो जन्म देतो तो दिव्य असल्यामुळें त्याची योग्यता त्यांहून श्रेष्ठ आहे. ' पाश्चात्य सुधारणेच्या अंगभूत असलेल्या ' स्वातंत्र्या ' च्या भ्रामक कल्पनांनीं आर्य लोकांचे अंगांतील वरील सद्गुण सांप्रत बहुतेक नाहींसे झाले आहेत. पूर्वींचें गुरुशिष्यांचें पवित्र नातें तर अगदीं नष्ट झालें आहे. याची बहुतेक जबाबदारी भिन्न परिस्थितीकडे आहे हें खरें. पण हल्लींहि गुरूचें शिष्यावर जर खरें प्रेम व सन्मार्गदर्शनाची उत्कट इच्छा असेल तर या भ्रष्ट कालांतहि शिष्याचे अंतःकरणांत गुरुविषयीं भक्ति पूज्यभाव व दृढविश्वास उत्पन्न झाल्यावांचून राहणार नाहीं.

धर्म, अर्थ व काम या तीन पुरुषार्थविषयीं भीष्मांनीं असें सांगितलें कीं, **अर्थाचें मूल धर्मांत आहे व कामाचें अर्थांत आहे**. अर्थप्राप्ति करावयाची असल्यास धर्मानुरोधानें करावी व काम [ सुखोपभोग ] साधावयाचा असतांना त्या योगानें धर्म व अर्थ यांची हानि होऊं देऊं नये. फलाच्या किंवा बक्षिसाच्या आशेनें सद्वर्तन करणें हा धर्माचा मल ( दोष ) आहे; सत्पात्रीं व्यय न करतां धन सांठवून ठेवणें हा अर्थाचा ( संपत्तीचा ) मल आहे; व संप्रमाद हा कामाचा मल आहे. हे दोष टाकून त्यांचें सेवन केलें असतां ते पुरुषार्थ अपकारक न होतां उपकारकच होतात. **सर्व सद्गुणांत सत्य हेंच श्रेष्ठ आहे**, किंबहुना

इतर सर्व सद्‌गुणांची त्यापासूनच उत्पत्ति आहे. **सत्याची योग्यता तप, योग, यज्ञ, ब्रह्म या सर्वांचे बरोबरची आहे.** समता, इंद्रियदमन अमात्सर्य, क्षमा, नम्रपणा, दान, ध्यान, धैर्य, दया, अहिंसा हीं सर्व सत्याचीच भिन्न भिन्न स्वरूपें आहेत.

**नास्ति सत्यात्परो धर्मो नानतात्पातकं परम् ।**
**श्रुतिर्हि सत्यं धर्मस्य तस्मात्सत्यं न लोपयेत् ॥**

असत्यासारखें पातक व सत्यासारखा श्रेष्ठ धर्म दुसरा कोणताच नाहीं. सत्य हेंच सद्धर्माचें मूळ आहे, म्हणून सत्याचा कधींहि लोप होऊं देऊं नये.

याप्रमाणें युद्ध संपल्यापासून उत्तरायणास प्रारंभ होईपर्यंत भीष्मांनीं सारखा छपन्न दिवस युधिष्ठिरास उपदेश केला. वरील विषयाशिवाय ब्राह्मणादि वर्ण व ब्रम्हचर्यादि आश्रम यांचे धर्म, तपोधर्म, आपद्धर्म, मांसाशन, योगशास्त्र, अहिंसा अमरविद्या, कर्मगति, इत्यादि गहन प्रश्न व राजनीतींतील इतर पुष्कळ बाबीं यासंबंधानें शांति व अनुशासन या पर्वांत भीष्मांनीं उपदेश केला आहे. त्यावरून त्या काळचा धर्म, नीति, ज्ञान, पूर्वीची समाजव्यवस्था व आर्यांचे आचार-विचार यांची सविस्तर माहिती होण्यासारखी आहे. सूर्य उत्तर दिशेस वळल्यानंतर भीष्मांचा अंतकाळ समीप आला. नेमल्या दिवशीं युधिष्ठिर, सर्व आप्तइष्ट, उपाध्याय, पांडव व श्रीकृष्ण यांस बरोबर घेऊन भीष्माचार्यांच्या शेवटच्या दर्शनास आला. भीष्मांनीं युधिष्ठिरास प्रेमानें जवळ घेऊन, राज्यकारभार व सामान्य वर्तन सदाचरणानें व न्यायानें करावयास सांगितलें. दुष्ट व मत्सरी पुत्रांच्या मरणाबद्दल शोक न करतां आतां पांडवांचें पालन करून राहिलेलें आयुष्याचे दिवस काढ, असें त्यांनीं धृतराष्ट्रास सांगितलें. याप्रमाणें सर्वांचा निरोप घेतल्यावर मरणसमयीं भीष्मांचें मन व नेत्र श्रीकृष्णाकडे वळले ! आपलें मानवी शरीर येथेंच टाकून स्वस्थानीं जाण्यास श्रीकृष्णाची त्यांनीं आज्ञा मागितली. ' आजपर्यंत तुमचे हातून कोणतेंही पातक झालेलें नाहीं, तुमचें आचरण अगदीं निष्कलंक आहे; वसुलोकांत परत जाण्यास माझी तुम्हांस अनुज्ञा आहे ' असें श्रीकृष्णांनीं उत्तर दिलें. पुनः एकदां युधिष्ठिरास शेवटचे दोन शब्द सांगून भीष्म स्तब्ध राहिले. नंतर श्रीकृष्णाचें ध्यान करीत हळूहळू ते आपला प्राणवायु योगबलानें जसजसा वरवर ब्रह्मांडीं नेऊं लागले, तसतसें त्यांचें शरीर सुदृढ व सुंदर बनत गेलें ! शेवटीं त्यांचे

मस्तकांतून एक तेजोमय ज्योति बाहेर पडून आकाशांत निघून गेली. याप्रमाणें प्रख्यात कुरुकुलाचे आधारस्तंभ जे भीष्म त्यांचा अंत झाला !

आर्य लोकांच्या प्राचीन इतिहासांत वर्णिलेला भीष्मांसारखा सर्वगुणसंपन्न पुरुष इतरत्र केव्हांहि निर्माण झालेला नाहीं. बालपणापासून तों अंतकालपर्यंत त्यांच्या कोणत्याहि कृत्याचें परीक्षण केलें तरी त्यांत त्यांचें अलौकिक धैर्य, निष्पाप वर्तन, अचल कर्तव्यनिष्ठा, अनुपमेय सत्य-प्रीति इत्यादि अनेक सद्गुण दिसून येतात. केवळ पित्याचे सुखासाठीं आमरण ब्रह्मचर्य पाळून राज्यसुखाचा व पत्नीसुखाचाहि त्याग करणें; आपल्या भावांचें, भावांच्या मुलांचे व नातू पणतूंचें सारख्या प्रेमानें पालनपोषण करून त्यांस सदुपदेश करणें; त्यांस शिक्षण वगैरे देऊन त्यांचें राज्य त्यांचे हवालीं करणें; युद्धाचा समय आला असतां, उभयपक्षांपैकीं खरा व खोटा पक्ष कोणता हें माहीत असतांहि केवळ कर्तव्य स्मरून दुर्योधनाचे बाजूनें युद्ध करण्यास तयार होणें; या सर्व गोष्टींचे सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन केलें असतां भीष्म हे संपूर्ण कुरुकुलाचे पितामह व आधारस्तंभ कसे, तें लक्षांत येतें. शांतनुपुत्र,–चित्रांगद, विचित्रवीर्य, धृतराष्ट्र, पांडु, विदुर आणि शेवटीं कौरव व पांडव यांचा पालनकर्ता, दुर्योधनाचा मंत्री योद्धा व सेनापति, मुत्सद्दी, भक्त. योगी, ज्ञानी व सन्मार्गोपदेशक या सर्व नात्यानें निरनिराळ्या प्रसंगीं त्यांनीं केलेलें वर्तन पाहिलें असतां तें अगदीं निर्दोष, शुद्ध, सत्यमय व अत्यंत उदात्त होतें, असेंच म्हणावें लागतें.(शांतिपर्व व अनुशासनपर्व).



# प्रकरण बारावें.

—:०:—

## शेवट.



भागिरथीचे पवित्र तीरीं भीष्मांचा अंत्यविधि आटोपून तेथून परत फिरतांना युधिष्ठिराचें अंतःकरण दुःखानें अगदीं भरून आलें, व जमीनीवर अंग टाकून तो एकाद्या स्त्रीप्रमाणें अतिशय शोक करूं लागला! युद्धापूर्वी लहानपणापासून भोगलेलीं दुःखें व सोसलेले अपमान यांची आठवण पार बुजून जाऊन युद्धांतील भयंकर प्राणहानि, कुलाचा नाश, भीष्मासारख्या पूज्य वडिलांचा वध, कौरवस्त्रियांचे हृदयभेदक विलाप हीच त्याच्या अंतःकरणास जाळूं लागली. मेलेल्या मनुष्यासाठीं शोक केल्यास त्यांचे आत्म्यास दुःख होतें असें सांगून श्रीकृष्णांनीं त्याचें समाधान केलें. ते म्हणाले:—द्रोण, भीष्म वगैरेंशीं झालेल्या युद्धांत सैन्य, बांधव, आप्त, इष्टमित्र हे तुला साह्यकारी होते; व त्यांच्याच साह्यानें तूं शत्रूंचा नाश केलास. परंतु तुझ्याच शरीरांत उत्पन्न झालेला हा शोकरूपी शत्रु तुला कसा दिसत नाहीं? ज्यामध्यें शत्रूशीं तुला एकट्यालाच लढलें पाहिजे व ज्यांत झगडण्यास आपल्या मनावांचून तुला दुसरा साह्यकर्ता नाहीं, तें युद्ध आतां येऊन ठेपलें आहे. हा शत्रु जिंकून तूं विजयी झालास म्हणजेच खरा कृतकृत्य होशील.' आपल्या मनाची ही तळमळ व दुःख नाहींसें करण्यास अश्वमेध यज्ञ करावा, असें व्यासांनीं धर्माला सांगितलें. परंतु दुर्योधनाच्या दुष्ट दुराग्रहामुळें झालेल्या लढाईंत हजारों राजे व क्षत्रिय बळी पडलेले, या प्राणहानीनें सर्व प्रजा हैराण झालेली व खजिना रिकामा पडलेला! अशा स्थितींत अश्वमेध यज्ञासाठीं प्रजेवर जास्त कर बसविणें, त्या प्रजावत्सल धर्मराजास मुळींच पसंत पडलें नाहीं. परंतु प्राचीनकाळी सत्ययुगांत एका राजानें हिमालय पर्वतावर यज्ञ केला होता, त्याची हकीकत व्यासांनीं त्यास सांगितली; व त्या यज्ञांतील द्रव्य तेथें अजून जमीनींत तसेंच पुरलेलें राहिलें आहे. तें आणून यज्ञ कर, अशी त्यांनीं त्यास आज्ञा केली. व्यास, श्रीकृष्ण, इतर राजे व ऋषि यांनीं याप्रमाणें बोध व समा-

धान केल्यावर धर्माचें दुःख थोडेसें कमी होऊन तो हास्तिनापुरास परत येऊन राज्यकारभार पाहूं लागला. ( अश्वमेधपर्व अ० १–१४ ).

हस्तिनापुरास आल्यानंतर इंद्रप्रस्थाचे बाजूची तीर्थें, वनें, नद्या, इत्यादिकांची शोभा पहात कृष्णार्जुन आनंदाने फिरूं लागले. युद्धाच्या कथा, पूर्वीच्या राजांचे व ऋषींचे वंश, त्यांच्या गोष्टी, गहन तत्त्वज्ञान वगैरे संबंधानें संभाषण करण्यांत त्यांनीं हा काळ घालविला. युद्धारंभीं श्रीकृष्णांनीं भगवद्गीतेंत जो उपदेश केला होता तो आपण बहुतेक विसरलों असें अर्जुनानें सांगितल्यावरून श्रीकृष्णांनीं ब्राह्मण व काश्यप यांच्या संवादरूपानें त्यास पुनः उपदेश केला. या उपदेशास ' अनुगीता ' असें नांव आहे. ( अश्वमेधपर्व अ० १६–५१ )

तेथून परत आल्यावर द्वारकेहून येऊन पुष्कळ दिवस झाल्यामुळें युधिष्ठिरादि पांडव व धृतराष्ट्रादि वृद्ध कौरव या सर्वांचा प्रेमपूर्वक निरोप घेऊन आणि सुभद्रा व कुंती यांस बरोबर घेऊन श्रीकृष्ण द्वारकेस निघून गेले. तेथें गेल्यावर त्यांनीं भारतीय युद्धाची हकीकत सांगून, तरुण वीर अभिमन्यु याचा वध कसा झाला तें सविस्तर वर्तमान वसुदेवादिकांस निवेदन केलें. ( अश्वमेधपर्व अ० ५२-६१)

व्यासांच्या आज्ञेप्रमाणें युधिष्ठिरानें अश्वमेधयज्ञाची तयारी चालविली. प्रथमतः त्यांनीं सांगितलेल्या ठिकाणाहून द्रव्य आणण्यासाठीं पांचहि पांडव बरोबर अनेक वाहनें व नोकर-चाकर घेऊन हिमालयाचे उत्तरणीवर गेले. आरंभीं यथाशास्त्र महादेवाची पूजा करून त्यांनीं जमीन खणण्यास प्रारंभ केला. नंतर कांहीं दिवसांनीं तेथें सांपडलेली सोन्याचीं नाणीं, कलश वगैरे अनेक बहुमोल पदार्थ काढून व ते खेचरें, घोडे, उंट, हत्ती यांचेवर लादून हळूहळू मुक्काम करीत ते हास्तिनापुराकडे येण्यास निघाले. इकडे अभिमन्यूची दुर्दैवी तरुण पत्नी उत्तरा प्रसूत होण्याचा समय आला. हें जाणून श्रीकृष्णहि द्वारकेहून त्वरेनें तेथें आले. उत्तरा प्रसूत होऊन तिला पुत्र झाला, परंतु तो जन्मतांच मेला ! भारतीय युद्धांमध्यें पांडवांचे अभिमन्यु वगैरे सर्व पुत्र मरण पावले; त्यामुळें दुःखानें पोळलेली कुंती, द्रौपदी सुभद्रा वगैरेंचीं अंतःकरणें उत्तरेच्या प्रसूतिकालाकडे चातकाप्रमाणें लागलीं होतीं. परंतु पांडवांचा किंबहुना अखिल कुरुकुलाचा हा शेवटचा कोमल अंकुर अश्वत्थाम्याच्या ब्रह्मास्त्रानें अकालींच करपून गेल्यामुळें सर्वांस-विशेषतः कुंती वगैरे स्त्रियांस—अत्यंत दुःख झालें. अगदीं लहानपणीं पति युद्धांत मरण पावलेला व सर्वांच्या आशा ज्याचेवर गुंतून राहिल्या होत्या तो पहिला



[· श्रीकृष्ण घाईघाईनें प्रसूतिगृहाकडे आले.

[ पृ. २१७

पुत्रहि मरण पावलेला पाहून. उत्तरा तर शोकानें अगदीं वेडी होऊन गेली ! श्रीकृष्ण धाईधाईनें प्रसूतिगृहाकडे आले.तों वाटेंत कुंती व सुभद्रा यांनीं डोळ्यांत अश्रु आणून सर्व हकीकत सांगितली; व त्यांस आपल्या प्रतिज्ञेची आठवण देऊन आपल्या आवडत्या भाच्याच्या मुलास जिवंत करण्याविषयीं त्या दीनपणानें प्रार्थना करूं लागल्या. खोलींत गेल्यावर दुःखानें विव्हळ झालेल्या उत्तरेनें श्रीकृष्णाकडे मोठ्या केविलवाण्या दृष्टीनें पाहून, ' माझ्या हृदयांतील सर्व मनोरथ ज्यावर गुंतून राहिलें होतें तो पुत्र जर जिवंत होणार नाहीं, तर मी प्राणत्याग करीन ' असें ती म्हणाली ! तिनें त्या दुःखयुक्त प्रेमानें आपल्या पुत्रास मांडीवर घेऊन ' तुझी पणजी कुंती, आजी सुभद्रा व द्रौपदी आणि तुझी ही हतभागी आई किती शोक करीत आहे तें बाळा ! एकदां पहा. तुजकडे त्रैलोक्यनाथ श्रीकृष्ण येत आहे त्याकडे तरी एकवार डोळे उघडून पहा ' असें म्हणूं लागली ! नंतर सर्वांचें सांत्वन करून श्रीकृष्ण म्हणाले:—' मी जी पूर्वी प्रतिज्ञा केली ती शेवटास नेण्यास मी कधींहि चुकणार नाहीं. माझें भाषण कधींहि खोटें व्हावयाचें नाहीं. मी जर कधींहि असत्य भाषण केलें नसेल युद्धांतून जर मी कधींहि पराङ्मुख होऊन परत आलों नसेन, धर्म व ब्राह्मण जर मला प्रिय असतील, सत्य व धर्म हीं जर माझे ठिकाणीं पूर्णपणें व एकत्र वसत असतील, अर्जुनाचा व माझा जर कधींहि विरोध आला नसेल, आणि केशी-कंस दैत्यांचा जर मी न्यायानें वध केला असेल, तर ब्रह्मास्त्रानें मरण पावलेला हा बालक उठो !' असें म्हणतांच तें मूल जिवंत होऊन रडूं लागलें; व जिकडे तिकडे आनंदीआनंद झाला ! सर्व कुल ' परिक्षीण ' झालें असतां यानें जन्मून त्याचा अंकुर कायम ठेविला म्हणून त्याचें श्रीकृष्णांनीं ' परिक्षित् ' असें नांव ठेवलें. परिक्षित् जन्मून एक महिना लोटल्यावर पांडव हिमालयावरील अगणित धन घेऊन हस्तिनापुरास आले. राजपुत्राच्या जन्मोत्सवाकरितां व त्यांचेंहि अभिनंदन करण्यासाठीं नागरिकांनी ध्वज, पताका तोरणें, गुढ्या, पुष्पमाला यांनीं रस्ते, चौक, देवालयें व आपापलीं घरें सुशोभित केली; आणि सर्व नगरांत जिकडे तिकडे आनंदाचा जयघोष सुरूं झाला. ( अश्वमेधपर्व अ० ६२-७०. )

नंतर श्रीकृष्ण व व्यास यांच्या आज्ञेनें धर्मानें अश्वमेध यज्ञास चैत्री पौर्णिमेस आरंभ केला. व्यास, पैल व याज्ञवल्क्य यांनीं यज्ञाची सर्व तयारी करून धर्मास दीक्षा दिली; व उत्तम जातिवंत काळा घोडा यथाविधि सोडला. अर्जुन आपला रथ व गांडीव धनुष्य सज्ज करून सैन्य बरोबर घेऊन त्याचे मागून निघाला.

त्यास शहरांतून पोंचविण्यास सर्व नगर लोटलें होतें. ज्या देशांत हा घोडा जाई तेथील राजा धर्मराजाचें वर्चस्व कबूल करून खंडणी देई. अथवा घोड्याला पकडून युद्धास सिद्ध होई. याप्रमाणें देशोदेशीं तो घोडा फिरत असतां, त्रिगर्त देशाचा राजा सूर्यवर्मा, प्राग्ज्योतिषाचा वज्रदत्त, इत्यादि राजांचा पराभव करून अर्जुनानें त्याजपासून करभार घेतला. जयद्रथाचा वध झाल्यानंतर त्याचा एकुलता एक तरुण मुलगा गादीवर बसला होता. परंतु अर्जुन सिंधुदेशांवर चाल करून आला असें ऐकतांच त्यानें आत्महत्या केली ! सैन्धवांनीं कांहीं वेळ त्यांशीं युद्ध केलें; परंतु त्याचा त्यानें तेव्हांच पराभव केला. शेवटीं जयद्रथाचा तान्हा नातु घेऊन दुःशला अर्जुनाकडे आली; व त्या बालकास आशीर्वाद मागूं लागली ! तेव्हां अर्जुनानें धनुष्य खालीं ठेवून युद्ध बंद केलें. नंतर तो घोडा फिरत फिरत मणिपुर येथें आला. तेथील राजा बभ्रुवाहन यानें आपल्या पित्यासमोर येऊन नम्रपणानें त्यास नमस्कार केला. पण ' क्षत्रियाचा बच्चा असून युद्धासाठीं आलेल्या वीराचें तूं एखाद्या स्त्रीप्रमाणें भ्याडपणानें आगतस्वागत करीत आहेस. तूं क्षत्रियधर्म टाकणारा क्षत्रियाधम आहेस' असें म्हणून त्यास अर्जुनानें धिःकारलें ! इतक्यांत नागराजाची कन्या उलुपी ही तेथें आली. तिनें प्रोत्साहन दिल्यावरून बभ्रुवाहनानें आपल्या पित्याशीं निकराचें युद्ध मांडलें. त्यांत बभ्रुवाहनानें एक बाण अर्जुनाचे हृदयावर मारून त्यास रणभूमीवर पाडले व आपणहि मूर्च्छित होऊन जमीनीवर पडला ! आपल्या पुत्राचे हातून आपल्या पतीचा असा अंत झालेला ऐकून चित्रांगदाहि तेथें आली; व झालेल्या या घाताबद्दल उलुपीची निर्भर्त्सना करून अर्जुन जिवंत होईपर्यंत ' प्रायोपवेशन ' करण्याची तिनें प्रतिज्ञा केली. बभ्रुवाहनानेंहि मूर्च्छा जाऊन सावध झाल्यावर अतिशय दुःखानें व पश्चात्तापानें आपल्या आईप्रमाणेंच निश्चय केला. परंतु उलुपीनें संजीवनमणि आणून देऊन बभ्रुवाहनाकडून तो अर्जुनाचे हृदयावर ठेववितांच झोंपेंतून उठल्याप्रमाणें तो जागा झाला. उलुपी, चित्रांगदा, बभ्रुवाहन आपणाजवळ बसलेले पाहून त्यानें आश्चर्यानें हा काय प्रकार आहे, म्हणून विचारलें. तेव्हां भीष्म युद्ध करीत नसतां त्यांस अर्जुनानें मारल्यामुळें वसूंनीं त्यास दिलेला शाप, त्या पातकाची निष्कृति होण्यासाठीं तिनें उत्पन्न केलेली माया व युद्धामध्यें बभ्रुवाहनाच्या हस्तें त्याचा झालेला वध, हीं कशीं झालीं तें तिनें सविस्तर सांगितलें. आपला पति पुष्कळ दिवसांनीं भेटल्यामुळें चित्रांगदेस अतिशय आनंद झाला. अश्वमेध यज्ञाचे वेळीं येण्यास बभ्रुवाहनाला सांगून अर्जुन दुसऱ्या देशांकडे गेला. याप्रमाणें

समुद्रकिनाऱ्यापर्यंतचे चारी दिशांचे मागध, कोसल, चेदी, पंचनद, गांधार इत्यादि देशचे सर्व राजे जिंकून व अमित करभार घेऊन अर्जुन हस्तिनापुरास परत आला. ( अश्वमेधपर्व अ० ७१-८४ )

याप्रमाणें अर्जुनानें पराक्रमानें संपत्ति मिळवून सर्व राजांवर वर्चस्व स्थापित केल्यानंतर यज्ञसमारंभास सुरवात झाली. चोहोंकडे मुनि, तपोनिष्ठ व विद्वान् ऋषि, ब्राह्मण, प्रमुख राजे, श्रीकृष्ण, बभ्रुवाहन, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, म्लेच्छसुद्धां अश्वमेध यज्ञास बोलविले होते. सर्वांसाठीं रोज भोजन, राहण्याचें ठिकाण, इतर सुखसोई, विहार, पुष्पवटिका यांची व्यवस्था केली होती. त्यासमर्नांस धर्मराजानें यज्ञदक्षणेबद्दल सर्व पृथ्वी आर्पण केली. परंतु त्याबद्दल हजार मोहरा घेऊन ती त्यांनीं धर्मास परत दिली. मिळविलेलें इतर धनहि यज्ञास आलेल्या तपोनिष्ठ ब्राह्मणांपासून म्लेंच्छापर्यंत सर्वांस ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें त्यानें महादानरूपानें दिलें. यज्ञसमारंभ बहुतेक संपत आला. धर्माच्या व पांडवांच्या पराक्रमाची, औदार्याची व यज्ञाची सर्वतोमुखीं स्तुति होत असतां एक चमत्कार घडून आला. तेथें अकस्मात् एक मुंगूस आलें; त्याचें एक अंग सोन्याचें होतें ! ' येवढा मोठा यज्ञ झाला तरी त्याची योग्यता कुरुक्षेत्रात उंछवृत्तीनें राहणाऱ्या ब्राह्मणानें दिलेल्या सातूच्या पिठाहून कमी आहे ' असें तें मनुष्यवाणीनें बोलूं लागलें ! तेव्हां आश्चर्यचकित होऊन विचारलें असतां त्यानें हकीकत सांगितलीः—'कुरुक्षेत्रांत' कापोती नांवाचा ब्राह्मण राहत आहे. त्यास एक भार्या, एक पुत्र व एक सून आहे. शेतामध्यें वेंचून जेवढें धान्य मिळेल तेवढ्यावर दिवसांतून फक्त एकवारच भोजन करण्याचा त्यांचा नियम आहे. एकदां त्या प्रांतांत दुष्काळ पडला. त्यामुळें त्या कुटुंबास बरेच दिवस उपास काढावे लागले. शेवटीं एके दिवशीं मोठ्या कष्टानें मिळालेलें धान्य आणून त्यांनीं त्याचें अन्न तयार केलें. ब्राह्मण आपलें जपजाप्य व नित्यहवन आटोपून भोजनास बसणार, इतक्यांत एक अतिशय भुकेलेला आतिथि त्याचे पर्णकुटिकेंत आला. त्याचें स्वागत करून ब्राह्मणानें आपले वांटणीचें अन्न त्यास दिलें. तें सर्व खाल्लें तरी त्याची भूक शांत झाली नाहीं. म्हणून त्या ब्राह्मणाची वृद्ध व क्षुधेनें व्याकुळ झालेली बायको आपला वांटा त्यास देऊं लागली. परंतु तिची ती स्थिति पाहून तिचें तें अन्न घेऊन ब्राह्मणाच्यानें अतिथीला देववेना. परंतु तिनें विनवणी केल्यावरून तिचेंहि अन्न अतिथीस दिलें; तरीहि त्याचें समाधान झालें नाहीं. तेव्हां पुत्रानेंहि आपलें कर्तव्य जाणून आपला हिस्सा त्यास दिला. त्यानेंहि अतिथीची क्षुधा शमली नाहीं ! तेव्हां शेवटीं त्या तरुण सुनेनेंहि

आपला भाग आणून दिला. तो सुनेच्या तोंडचा शेवटचा घास काढून अतिथीस देतांना ब्राह्मणांस फार वाईट वाटलें व मन कचरूं लागलें. परंतु तिनें पुष्कळ आग्रह व विनवणी केल्यामुळें, आणि **कुटुंबांतील माणसांनीं एकमेकांच्या दुःखाचे व कर्तव्याचे वांटेकरी झाले पाहिजे**, असें सांगितल्यामुळें तेंहि अन्न अतिथीस दिलें- तें खाऊन मात्र त्याचें समाधान होऊन अतिथीरूपानें आलेला प्रत्यक्ष यमधर्म त्यांचें पुढें उभा राहिला ! त्याचें हें धर्माचरण व कांहीं झाले तरी तें न सोडण्यांत दिसून आलेलें धैर्य पाहून त्यानें त्यांस आशीर्वाद देऊन सर्व कुटुंब स्वर्गांत नेलें. यानंतर, मुंगूस म्हणालें, मी बिळांतून बाहेर येऊन अतिथीस देऊन तेथें पडलेल्या सातूचे पिठावर थोडासा लोळल्याबरोबर माझें अर्धें अंग सोन्याचें झालें. माझें दुसरें अंग सोन्याचें करणारा दुसरा एकहि यज्ञ मला दिसत नाहीं. तुझ्या या अश्वमेध यज्ञाचें अंगां असें सामर्थ्य असल्याचें दिसत नाहीं. न्यायानें मिळविलेलें **अन्न अतिथीस देऊन** त्या आणीबाणीच्या वेळीं धैर्य दाखवून त्यानें **केलेल्या यज्ञाची योग्यता कोट्यावधि रुपयांची व सोन्याची दक्षिणा दिलेल्या यज्ञास नाहीं.** असें मीं म्हटलें याचें कारण हेंच.' असें सांगून तें मुंगूस गुप्त झालें. ( अश्वमेध-पर्व अ० ८४—९२).

आपले शंभर पुत्र मरण पावलेले, वार्धक्य आलेलें व दृष्टिसुख तर कधींच नाहीं, अशा स्थितींतहि धृतराष्ट्र पांडवांजवळ सुखानें राहिला होता. आपल्या पुत्राचें त्यास स्मरण होणार नाहीं, अशा रीतीनें युधिष्ठिरादि पांडव, संजय, विदुर, वगैरे वागत होते. कुंती, द्रौपदी, सुभद्रा, ह्याहि गांधारीची योग्य सेवा करीत धर्मराज तर त्यांचें आज्ञेबाहेर कधींहि गेला नाहीं. होता होईल तों धृतराष्ट्रास सुख देण्यांत युधिष्ठिर किमपिहि हयगय करीत नसे. परंतु त्याची पूर्वींची दुष्ट बुद्धि व त्यानें घडवून आणलेलें द्यूत, त्यावेळीं कौरवांनीं आपलें सर्वस्व हरण केलें असतां त्याचा स्पष्टपणें दिसून आलेला आनंद, हीं भीमाचे मात्र मनांतून कधींहि गेली नाहींत. कोणास न कळत तो धृतराष्ट्रास वारंवार टोंचून बोलल्यावांचून रहात नसे. आपले स्नेही व इष्टमित्र यांचेमध्यें बसला असतांना, ज्यांच्या बलावर मी आंधळ्या राजाचे दुर्योधन, दुःशासनादि पुत्र रणांगणामध्यें रगडून टाकले, ते हे माझे बाहु पहा, असें धृतराष्ट्र व गांधारी यांस ऐकूं जाईल असें म्हणून भीम आपलें दंड जोरानें थोपटीत असे ! भारतीय युद्ध होऊन याप्रमाणें पंधरा वर्षे लोटल्यावर धृतराष्ट्रानें पांडवांस बोलावून पूर्वीं केलेल्या दुष्कृत्याबद्दल आपण नेहमीं उपवास व व्रते कशी केलीं तें सांगून, आतां आपणास

वनांत जाऊन आपल्या देहाचें सार्थक करण्यास परवानगी द्यावी, अशी धर्मराजास विनंति केली. हें त्याचें बोलणें ऐकून धर्मराजाचें अंतःकरण दुःखानें भरून आलें. ' तुम्हांस जर आमचेकडून दुःख होत असेल तर आम्हांस हें राज्यच नको; तुमचा पुत्र युयुत्सु यास राज्य देतों. पण आपण येथेंच रहावें, वनांत जाऊं नये ' याप्रमाणें धर्म म्हणूं लागला. परंतु धृतराष्ट्रानें आपला निश्चय सोडला नाहीं. ' याचें आयुष्य आतां थोडें राहिलें आहे. **क्षत्रियानें रणामध्यें अथवा तपाचरण करतां करतां मरावें असा शास्त्रनियम आहे;** यासाठीं त्याचे निश्चयाचें आड येऊं नको ' असें व्यासांनींहि सांगितल्यामुळें धर्मानें निरुपायानें विशेष आग्रह धरला नाहीं. धृतराष्ट्रानें शेवटचा निरोप घेण्यासाठीं आपल्या वाड्यांत पांडवांस, विदुरास व कृप इत्यादिकांस बोलाविलें. राजधर्मासंबंधानें त्यानें धर्मास शेवटचा उपदेश केला. नंतर त्याचे आज्ञेवरून जमविलेल्या नागरिकांसही त्यानें पुढीलप्रमाणे विनंति केली:—' कुरुकुलाचा व तुमचा आज पुष्कळ वर्षांचा संबंध आहे. तुमच्या मनांत जी राजप्रीति आहे ती इतर देशांत कोठेंहि आढळून येत नाहीं. शंतनु, भीष्म, विचित्रवीर्य यांनीं तुमचें चांगलें पालन केलें; मीं व माझे पुत्र यांनींहि तुमचें यथाशक्ति संरक्षण केलें आहे. दुर्योधनाच्या दुष्ट अभिमानानें या देशांतील राजे व क्षत्रिय यांचा नाश होऊन देशाची व प्रजेची फार हानि झाली. या व दुसऱ्याहि आमच्या कित्येक बऱ्या वाईट कृत्यांची तुम्ही क्षमा करा. तुमचें संरक्षण व पालन करण्याचें काम आतां धर्मराजाकडे आलें आहे, तो तुमचें उत्तम प्रकारें संरक्षण करील. पुत्ररहित झालेला, वृद्ध व अंध असा मी व गांधारी यांनीं आतां वनांत जाऊन तप करण्याचा निश्चय केला आहे. ता या कृत्यास तुमची संमति असावी !' हें भाषण ऐकून नागरिकांस गहिंवर आला, ' दुर्योधनानें आमचें सर्व प्रकारें चांगलें संरक्षण केलें. आमचें त्याच्याविषयीं कांहीं म्हणणें नाहीं. कुरुक्षेत्रावर युद्ध होऊन जो भयंकर संहार झाला तो बलवत्तर अशा कालगतीचाच खेळ होता; त्याबद्दल आम्ही तुम्हांस किंवा दुर्योधनास मुळींच दोष देत नाहीं. आपण मनांतील दुःख काढून टाकून सुखानें वनांत जाऊन आपल्या जीविताचें सार्थक करावें. त्यास आमची कांहीं हरकत नाहीं. ' याप्रमाणें मत नागरिकांनीं एका ब्राम्हणास पुढें करून त्याचें द्वारें धृतराष्ट्रास कळविलें ( आश्रमवासीपर्व अ० १--११ ).

नंतर दुसरे दिवशीं भीष्म, द्रोण व कौरव याचे नांवानें ब्राम्हणांस शेवटचे दानधर्म करण्याची धृतराष्ट्रानें इच्छा दर्शविल्यावरून धर्मानें अमित धन व

जवाहिर त्यास आणून दिलें; पण भीमास त्याचें हें कृत्य मान्य नव्हतें. 'आमचा द्यूतांत व द्रौपदिचा सभेंत छळ झाला व आम्हीं वनवासांत दुःखें भोगिलीं, तेव्हां धृतराष्ट्राची व भीष्म-द्रोणादिकांची न्यायबुद्धि व प्रेम कोठें गेलें होतें ? आणि यांचे नांवानें आतां आम्ही दानधर्म तरी काय म्हणून करावा ? आम्हांशीं द्यूत चालू असतांना ' आतां काय जिंकिलें, मग काय जिंकिलें ' अशी चौकशी उत्सुकतेनें करणाऱ्या आणि अज्ञातवासांतून परत आल्यावर आम्हांस, राज्य तर राहोच, पण फुटकी कवडीहि देण्याची बुद्धि नसलेल्या धृतराष्ट्रास दानधर्मास आम्हीं तरी आतां कां द्रव्य द्यावें 'असें तो म्हणूं लागला ! परंतु धर्मार्जुनांनीं त्यास तसेंच आवरून धरलें. राजास उचित असे दानधर्म करून धृतराष्ट्र वल्कलें धारण करून आपल्या पत्नीसह-ज्या हस्तिनापुरावर त्यानें आजपर्यंत सत्ता चालविली होती तें सोडून-निघाला. त्यावेळीं सर्व नागरिक व कौरवपांडवांकडील स्त्रिया यांनीं अतिशय शोक केला. धृतराष्ट्राबरोबर संजय व विदुर हेहि निघाले. कुंतीहि गांधारीबरोबर त्यांची सेवा करण्यास निघाली. जिच्या दुःखाचें परिमार्जन करण्यासाठीं एवढें युद्ध आरंभून व शत्रूंस ठार करून शेवटीं राज्य मिळविलें, तिनें सुखांत कालक्रमणा करण्याचें टाकून वनांत जाण्याचें मनांत आणलें, तर तें राज्य मिळविल्याचें काय सार्थक झालें ? कौरवांशीं सख्य न करतां युद्ध करून आपलें राज्य परत मिळविण्याविषयीं आपणांस उपदेश करून आतां कुंतीनेंच वनांत जावें, हें पाहून पांडवांस-विशेषतः धर्मास-फार वाईट वाटलें. तेव्हां कुंती त्यांस म्हणाली:-----" तुमचें राज्य जाऊन दीनाप्रमाणें--पांडूचे पुत्र असूनहि--शत्रूचे तोंडाकडे पाहण्याची पाळी तुम्हांवर येऊं नये, तुमचें यश वृद्धिंगत व्हावें, तुमचें राज्य तुम्हांस मिळावें, तुम्हीं सर्वांनीं लहानपणापासून भोगलेल्या दुःखांना व बिचाऱ्या द्रौपदीच्या झालेल्या छळाचा कांहीं तरी सूड उगवावा, या हेतूनें मीं तुम्हांस युद्धास उद्युक्त केलें.

नाहं राज्यफलं पुत्राः कामये पुत्रनिर्जितं ।
पतिलोकानहं पुण्यान् कामये तपसा विभो ॥

पुत्रांनीं मिळविलेल्या राज्याचें सुख उपभोगण्याकरितां मीं हें केलेलं नाहीं व तशी माझी इच्छाहि नाहीं; **पुत्रांच्या राज्यसुखापेक्षां परलोकीं पतीजवळ जाणेंच अधिक श्रेयस्कर आहे.** तपाचरण आणि धृतराष्ट्र व गांधारी यांची शुश्रुषा करून पतिलोक प्राप्त करून घेण्यासाठींच मी आतां वनांत जात आहे.

करतां माझ्या आड कोणी येऊं नका.' हें ऐकून लज्जित होऊन व त्यांस नगराबाहेर पोंचवून पांडव परत आले, धृतराष्ट्र, विदुर, संजय, गांधारी व कुंती हे भागीरथीचे तीरीं ऋषींच्या आश्रमांजवळच्या शतयूष नांवाच्या राजर्षीचे आश्रमांत राहूं लागले. याप्रमाणें बरेच दिवस लोटले; पण पांडवांच्या मनास चैन पडेना व राजकार्यें, मृगया इत्यादिकहि त्यांस गोड वाटेनांत. आपल्या वृद्ध मातेची व धृतराष्ट्र, गांधारी यांची वनांत काय स्थिती झाली असेल हें मनांत येऊन त्यांस फार दुःख होऊं लागलें एकदां त्यांना जाऊन भेटावें असें सहदेवाच्या मनांत येऊन त्यानें धर्मास पुसिलें; त्यासहि तें पसंत पडून, लगलीच रथ, घोडे, शिबिका वगैरे सिद्ध करण्याचा हुकूम झाला. नागरिकांपैकीं ज्या कोणास धृतराष्ट्राचें दर्शन घ्यावयाचें असेल त्यांनीं बरोबर यावें, अशीहि त्यानें दवंडी पिटविली. युयुत्सु व धौम्य यास नगरामध्यें ठेवून सर्व पांडव आपल्या स्त्रिया व कांहीं नागरिक बरोबर घेऊन कुंतीस भेटण्यासाठीं निघाले. शतयूषाचे आश्रमांत जाऊन विचारतां, स्नान करून फुलें व पाणी आणण्यास ते यमुना नदीवर गेलें आहेत असें त्यांस कळलें. तिकडे गेल्यावर धृतराष्ट्र, गांधारी व कुंतीही स्नान करून हळूहळू पायीं येत असलेलीं त्यांनीं पाहिलीं. सहदेवानें धांवत जाऊन मातेस वंदन केलें; व तिला मिठी मारली ! इतरांचेंहि भेटणें व कुशल प्रश्न वगैरे झालें व सर्वांस आनंद झाला विदुर तेथें कोठें दिसेना: म्हणून त्याची धर्मानें चौकशी केली असतां धृतराष्ट्र म्हणाला:—' विदुर हा वायुभक्षण करून राहून निर्जन अरण्यामध्यें कोठें तरी तपाचरण करीत असलेला कांहीं ब्राह्मणास कधीं कधीं आढळतो.' असें तो सांगत आहे तोंच दूर अंतरावर, डोक्यावर जटा धारण केलेला, धुळीनें अंग माखलेला, कृश व नग्न असा विदुर धर्माचे दृष्टीस पडला. धर्म त्यास हाका मारीत त्याचे मागें धांवत जाऊं लागला. विदुर पुढें व धर्म मागें असें बराच वेळ धांवत गेल्यानंतर शेवटीं विदुर एका वृक्षाखालीं थांबून त्यास टेंकून उभा राहिला. धर्म पुढें येऊन उभा राहतांच त्याजकडे त्यानें कांहीं वेळ सारखी टक लाविली; आणि त्यानें योगबलानें आपलीं इंद्रिये व प्राण आपले शररिांतून काढून धर्माचें इंद्रियांशीं व प्राणांशीं मिळवून टाकताच त्याचें शरीर मृतप्राय होऊन पडलें! हें होतांच धर्मास आपले अंगीं विशेष सात्त्विक सामर्थ्य, जास्त विद्या व अधिक ज्ञान आल्याप्रमाणें वाटलें. तेथून आश्रमांत परत येऊन हा आश्चर्यकारक प्रकार त्यानें धृतराष्ट्रास सांगितला. त्या रात्रीं सर्व पांडव आपापलीं राजशयनें सोडून मातेचें भोंवतालींच दर्भाचे अंथरुणावर निजले. सकाळीं उठून व आपापलीं नित्य

कर्में आटोपून तें आश्रममंडळ व तेथील यज्ञवेदी वगैरे पाहून ते आश्रमांत परत आले. ( आश्रमवासिकपर्व अ० ११--२६ )

त्या आश्रमांत याप्रमाणें ते सुमारें एक महिना राहिल्यानंतर व्यास तेथें आले. युद्धामध्यें वध पावलेल्या आपल्या मुलांची पुढें काय अवस्था झाली आहे, हें जाणण्याची धृतराष्ट्रास फारच उत्कंठा वाटूं लागली. कुंतीलाहि कर्णाचें, सुभद्रा-द्रौपदी यांना आपल्या पुत्रांचें व कौरव-स्त्रियांस आपापल्या पतींचें पुनः एकवार दर्शन घेण्याची इच्छा झाली. " कौरव वगैरे युद्धांत मेलेले वीर पूर्वींचे असुर व गंधर्व असून देवकार्य करण्यासाठीं पृथ्वीवर जन्म घेऊन आले होते, त्यांचें दर्शन घेण्याचें असेल तर सर्वांनीं गंगातीरीं यावें म्हणजे तेथें सर्वांस त्यांचीं दर्शनें होतील. " असें व्यासांनीं सांगताच सर्वजण आनंदानें तिकडे गेले. रात्र झाल्या-नंतर योगिश्रेष्ठ व्यास मुनींनीं भागीरथीचे प्रवाहांत उभें राहून त्यांस बोलाविलें. तों युद्धामध्यें मरण पावलेले दोहीं पक्षांकडील सर्व वीर दिव्य शरीरें धारण करून आणि क्रोध व मत्सर टाकून भागीरथींतून एकदम वर आले ! मायलेकांच्या, भावाभावांच्या, पतिपत्नींच्या पुनः गांठी पडून सर्वांस आनंद झाला. धृतराष्ट्रासहि तेवढ्यापुरते दिव्यदृष्टीनें आपले पुत्र दिसले. सुभद्रा व अभिमन्यु, द्रौपदी व सुतसोमादि पुत्र, कुंती व कर्ण याप्रमाणें सर्वांच्या भेटी झाल्या. त्या एका रात्रीं असा आनंद व पतिपत्नींचें विहार झाल्यानंतर ते सर्व पुनः आले तसे भागीरथीचे पाण्यांत शिरून गुप्त झाले ! ज्या ज्या क्षत्रियांच्या स्त्रियांना पतिबरोबर जावयाचें असेल, त्यांनीं त्यांचे मागोमाग भागीरथींत शिरावें असें व्यासांनीं सांगतांच कौरवांच्या व इतर क्षत्रियांच्या स्त्रियांनीं नदीमध्यें उड्या टाकल्या; व मनुष्यदेह टाकून त्या पतिलोकीं गेल्या ! कांहीं दिवसांनीं पांडव हस्तिनापुराकडे परत निघाले. कुंतीनें आपल्याबरोबर नगरास परत यावें म्हणून त्यांनीं बराच आग्रह केला, तरी तें कुंतीनें ऐकिलें नाहीं; व पांडव तसेच परत हस्तिनापुरास आले. तेथें येऊन सुमारें २ वर्षें लोटल्यानंतर एके दिवशीं नारदानीं येऊन त्या तिघांचा वनांत कसा अंत झाला, तें निवेदन केलें. ते म्हणाले:—धृतराष्ट्राचें नित्याचें हवन होऊन तेथील अग्नि एके दिवशीं तसाच राहिला. इकडे धृतराष्ट्र, गांधारी कुंती व संजय गंगास्नानास गेले. स्नान वगैरे आटोपून परत येत असतां वाऱ्यानें तो अग्नि अधिक पेटून त्यांचा आश्रम व पर्णकुटी यांनीं पेट घेतला. गवतामुळें ही आग सर्व रानभर पेटून त्यांचें भोंवतीं पसरली ! अंध धृतराष्ट्र तपानें व वार्धक्यानें कृश झालेला आणि कुंती, गांधारी यांनीं नुसतें पाणी पिऊन एक महिना उपवास

केलेला असल्यामुळें, चोहोंकडे पेटलेल्या अग्नींतून सुटून पळून जाण्यास आपणांस सामर्थ्य नाहीं; हें पाहून संजयास वाट फुटेल तिकडे जाऊन आपले प्राण वांचविण्यास सांगून, तीं तीघें धैर्यानें प्राणायाम करून समाधि लावून बसलीं. कांहीं वेळानें अग्नीनें त्या तिघांचींहि शरीरें दग्ध करून टाकिलीं! संजय मात्र मोठ्या कष्टानें त्या वणव्यांतून वांचला व तो दावानल शांत झाल्यानंतर हिमालयाकडे निघून गेला. "

नारदांचें हें भाषण ऐकून पांडव व द्रौपदीसुभद्रादि स्त्रियांच्या दुःखास पारावार राहिला नाहीं. सर्व जण मोठ्यानें विलाप करूं लागली. धर्म तर एकाद्या लहान मुलाप्रमाणें हात वर करून मोठ्यानें आक्रोश करूं लागला. परंतु जगाच्या रहाटी-कडे लक्ष देऊन त्यांनीं आपलें दुःख कसेंबसें हळूंहळूं आवरलें. गंगातीरीं जाऊन त्यांची त्यांनीं व युयुत्सूनें यथाविधि उत्तरक्रिया केली आणि ते हस्तिनापुरास परत आले. या वेळीं कुरुक्षेत्रावरील भयंकर रणसंग्राम होऊन १८ वर्षें लोटलीं होतीं. ( आश्रमवासिकपर्व अ० २७–३९ ).

पुढें अशींच आणखी १८ वर्षें म्हणजे कुरुक्षेत्रावरील युद्धापासून एकंदर ३६ वर्षें लोटल्यानंतर गांधारीनें दुःखानें श्रीकृष्णास जो शाप दिला होता, तो सफल होण्याचा समय जवळ आला. विश्वामित्र, कण्व, नारद इत्यादि ऋषि द्वारकेस आले असतां, त्यांची चेष्टा करण्याच्या हेतूनें यादवांनीं सांबाला स्त्रीचा वेष देऊन ऋषींकडे नेलें. व ' ही बभ्रुची स्त्री आहे; आपणांस पुत्र व्हावा अशी हिला इच्छा आहे. तर हिला काय होईल तें सांगा ' असें त्यांस विचारलें! ऋषींना अंतर्ज्ञानानें सर्व खरा प्रकार समजला. त्यांनीं रागानें या सांबाला ' **वृष्ण्यंधका विनाशाय मुसलं घोरमायसम्** ' सर्व यादवांचा संहार करणारें लोखंडाचें भयंकर मुसळ होईल, असा शाप दिला! त्याप्रमाणें दुसरे दिवशीं सांबास मुसळ झालें! बभ्रुराजानें त्याचें पीठ करवून तें समुद्रांत टाकविलें; व आजपासून द्वारकेंत कोणीहि सुरा अथवा आसव पिऊं नये अशी दवंडी पिटविली. तथापि तो शेवटचा दिवस जवळ येत चालला. चोहोंकडे उत्पात होऊं लागले; श्रीकृष्णाचें सुदर्शन-चक्र आकाशांत गेलें, रथासह घोडे पळून गेले, आणि बळरामाचा ध्वज अप्सरांनीं नेला! नंतर एकदां सर्व यादव समुद्रतीरीं प्रभासतीर्थावर यात्रेस गेले. तेथें त्या सर्व यादवांनीं–बळराम, कृतवर्मा, सात्यकि या वृद्धांनीं सुद्धां कालें--प्रेरित होऊन अतिशय सुरापान केलें. कृतवर्म्यानें निजलेल्या वीरांस ठार मारलें, इत्यादि पूर्वीच्या युद्धाचे वेळचीं एकमेकांची उणीं काढून दारूच्या धुंदीत भांडण सुरू झालें. होतां होतां तें हातघाईवर येऊन सात्यकीनें कृतवर्म्याचें शिर तरवारीनें उडविलें!

हें पाहून चोहोंकडे एकच दंगा उसळला. समुद्राच्या किनाऱ्यावरचें लव्हाळें घेऊन ते एकमेकांस मारूं लागले. ब्रह्मशापानें तें लव्हाळेंच शस्त्राप्रमाणें होऊन चोहोंकडे यादववीर मरून पडले ! तेव्हां श्रीकृष्णांनीं मूठभर गवत घेऊन वर फेंकतांच तेंहि वज्राप्रमाणें होऊन त्यांचे हातून राहिलेले सर्व यादव ठार झाले ! त्यांतून वांचलेल्या दारुकास त्यांनीं अर्जुनाला आणण्यासाठीं हस्तिनापुरास पाठविलें तसेंच बभ्रूला द्वारकेंतील स्त्रियांचें संरक्षणासाठीं पाठविणार तों तोहि एकदम मरून पडला ! तेव्हां श्रीकृष्ण स्वत: द्वारकेंत गेले. अर्जुन येईपर्यंत स्त्रियांचें व लहान मुलांचें संरक्षण करण्यास वृद्ध वसुदेवास सांगून व त्यांच्या चरणांचें शेवटचें दर्शन घेऊन ते, बळराम वनांत होता तेथें आले. बळरामाचे शरीरांतूनहि एक प्रचंड सर्प निघून जातांच तोहि मृतप्राय होऊन पडला ! देह सोडून जाण्याचा आपलाहि समय जवळ आलेला आहे, असें जाणून श्रीकृष्ण एका वृक्षाखालीं एका पायाची टांच दुसऱ्या पायाच्या गुडघ्यावर ठेवून योगनिद्रेंत स्वस्थ पडून राहिले. इतक्यांत लांबून तें हरिणच आहे असें वाटून 'जरा' नांवाच्या व्याधानें त्यांच्या टांचेस बाण मारला. व जवळ येऊन पाहतों तों पीतांबरधारी श्रीकृष्ण पडले आहेत, असें त्यास दिसलें ! व्याधाचें समाधान करून देवदूतांच्या जयघोषांत श्रीकृष्ण आपल्या खऱ्या दिव्यदेहानें निजधामास गेले !

इकडे दारुकानें हस्तिनापुरास येऊन यादवीमुळें वृष्णिकुलाचा अकस्मात् कसा संहार झाला, तें वृत्त पांडवांस निवेदन केलें. प्रथमत: तें अर्जुनास खरेंहि वाटेना; म्हणून तो घाईघाईनें द्वारकेस आला. तेथें येऊन पाहतां सर्व नगरीमध्यें रस्त्यांत तरुण पुरुष एकहि दिसेना ! चोहोंकडे विधवा स्त्रियांचे व पोरक्या पोरांचे आक्रोश व विलाप ऐकूं येत होते ! राजवाड्यांत जाऊन पुत्र, पौत्र, बांधव, ज्ञाति यांच्या भयंकर नाशानें विव्हल होऊन पडलेल्या वसुदेव मामाची त्यानें गांठ घेतली. वसुदेवानें घडलेला सर्व प्रकार त्यास सांगून, 'या पोरक्या मुलांना व विधवा स्त्रियांना येथून हस्तिनापुरास नेऊन त्यांचें पालन कर. श्रीकृष्णाचा तूं जिवलग मित्र आहेस, म्हणून त्यानें निजधामास जाण्यापूर्वीं तुला हें काम सांगितलें आहे. त्यांना घेऊन तूं येथून गेलास म्हणजे सर्व समुद्र उचंबळून द्वारकेवर येईल. व ही नगरी त्यांत बुडून जाईल.' असा श्रीकृष्णाचा निरोप त्यानें कळविला असतां अर्जुनानें त्याप्रमाणें वागण्याचें कबूल केलें. दुसरे दिवशीं सकाळीं वसुदेव केवळ दु:खामुळें मरण पावला ! त्याजबरोबर देवकी, रोहिणी व भद्रा या स्त्रिया सती गेल्या ! वसुदेवाची यथाविधि उत्तरक्रिया करून यादवांच्या सर्व स्त्रिया, मुलें व

यादवींतून वांचलेले वृद्ध पुरुष यांची हस्तिनापुरास जाण्याची तयारी करण्यांत पांच सहा दिवस गेले. नंतर यादवस्त्रिया व मुलें, आणि राजकुळांतील राजस्त्रिया या सर्वांसह अर्जुन द्वारकेतून बाहेर पडला; तों पाठोपाठ समुद्राच्या लाटा उसळून पाणी चढूं लागून नगरांत शिरलें. यामुळें सर्व लोक जलदीनें मार्गक्रमण करीत समुद्राच्या आटोक्याचे बाहेर गेले व इकडे सर्व द्वारका बुडून गेली ! ही सर्व मंडळी प्रवास करीत पंचनद प्रांतांत आल्यावर त्या अलंकार घातलेल्या सुंदर स्त्रिया व त्यांचा एकटाच संरक्षक पुरुष अर्जुन यास पाहून तेथें वनांत राहणारे दस्यु व भिल्ल, कोळी वगैरे रानटी लोक यांचे तोंडास पाणी सुटलें; व ते हल्ला करून अर्जुनाचे देखत बलात्कारानें स्त्रिया हरण करून नेऊं लागले ! अर्जुनानें त्यांस ' अरे नीचानों ! हा आत्मघातक प्रयत्न करूं नका; मी तुम्हां सर्वांचा संहार करीन ' असें गर्वानें म्हटलें. परंतु तो गांडीव धनुष्य वांकवूं लागला, तों तें त्यास वांकेना ! शेवटीं एकदां मोठ्या कष्टानें तें त्यानें वांकवून व दोरी चढवून सज्ज केलें. तो दस्यूंवर बाण टाकूं लागला; परंतु जे त्याचे भाते पूर्वी अक्षय्य होते त्यांतील बाण थोड्या वेळांत संपले. अस्त्रेंहि त्यास आठवेनाशीं झालीं ! नंतर तो धनुष्यानेंच त्यांस प्रहार करूं लागला. परंतु ते त्यास बिलकूल न जुमानता कुरुक्षेत्रांतील भारतीययुद्धांत विजय मिळविलेल्या या वीराचे डोळ्यादेखत बहुतेक सर्व स्त्रिया घेऊन गेले ? यामुळें अत्यंत लज्जित होऊन राहिलेलें धन व स्त्रिया घेऊन तो कुरुक्षेत्रास आला, मार्तिकावत् नगरांत भोजस्त्रियांस, हार्दिक्याचा पुत्र व सात्यकीचा पुत्र यांस सरस्वती नगरींत आणि व्रजाला इंद्रप्रस्थांत त्यानें ठेविलें, रुक्मिणी, जांबवंती वगैरे श्रीकृष्णाच्या स्त्रियांनीं अग्निकाष्ठ भक्षण केलें. सत्यभामा व इतर कांहीं स्त्रिया आणि अक्रूराच्या बायका तप करण्यास वनांत निघून गेल्या. द्वारकेंतील बरोबर आलेली प्रजा त्यानें वृज वगैरे मध्यें वांटून दिली ३६ वर्षांपूर्वी झालेला कुरुक्षेत्रांतील संहार, द्वारकेंतील यादव, अर्जुनाचें मन लज्जित करणारा पंचनदांतील प्रसंग, या सर्वांमुळें पांडवांचे मनहि दुःखपूर्ण व निराशामय होऊन गेलें. व्यासांचे आश्रमांत जाऊन अर्जुनानें ही सर्व हकीकत त्यास सांगितली. तेव्हां श्रीकृष्णादि अवतारी पुरुष, कौरवांसारखे दुष्ट लोक आणि पांडवांसारखे धर्मात्मे व पराक्रमी योद्धे मृत्युलोकीं जन्मास घालण्यांत परमेश्वराचा जो हेतु होता तो सफल झाला आहे; तुम्हीहि कृतकृत्य झाला असून आतां सर्वांनी हें जग सोडून जाण्याची वेळ आली आहे; ही गोष्ट तुम्हांस सुचविण्यासाठींच हा सर्व प्रकार झालेला आहे. ' असें व्यासांनीं त्यास सांगितलें. ( मौसलपर्व अ० १-८ )

व्यासांचें हें भाषण ऐकून, आतां आपला इहलोकचा ऋणानुबंध संपून आपला अंतकाल समीप आला आहे, असें धर्मानें सर्वांस सांगितलें. सर्वांच्या विचारानें, व्रतस्थ राहून पृथ्वीप्रदक्षिणा करण्याची त्यांनीं तयारी केली. त्यांनी परिक्षिताला सिंहासनावर बसविलें; व मागील जुन्या पिढींपैकीं जिवंत राहिलेला धृतराष्ट्राचा पुत्र युयुत्सु याचे स्वाधीन राज्यकारभार केला. यादवांचा बालराजा व्रज याची इंद्र-प्रस्थास स्थापना करून त्यांचें व परिक्षितीचें पालनपोषण करण्याचें काम सुभद्रेस सांगून त्यांनीं कृपाचार्यास त्यांचा गुरु नेमिलें. पुढें यादव, कृष्ण, बळिराम, वसुदेव यांच्या नांवानें शेवटचीं दानधर्मादि कर्में केली. नंतर पांच पांडव व द्रौपदी यांनी वल्कलें धारण करून, पूर्वीच्या अशाच एका समयाप्रमाणें, हस्तिनापुरांतून बाहेर प्रयाण केलें ! याप्रमाणें पांडव नगराबाहेर पडलेले पाहून पौरजन व राजकुलांतील राजपुरुष यांना किती दुःख झालें असेल, तें सांगतां पुरवत नाहीं. परंतु कृतकृत्य होऊन नगरांतून आपण जात आहों. याबद्दल पांडवांस आनंदच झाला. सर्वांचें पुढें धर्म, त्याचे मागून क्रमानें भीष्म, अर्जुन, नकुल, सहदेव व द्रौपदी अशीं चालूं लागलीं व सर्वांचें मागून धर्माचा एक आवडता कुत्राहि निघाला, प्रथमतः पूर्वेकडे जाऊन बऱ्याच दिवसांनी ते समुद्रतीरास पोंचले. अर्जुनानें कुरुक्षेत्रांत गाजविलेलें आपलें गांडीव धनुष्य व अक्षय्य भाते बरोबर घेतलें होतें. परंतु अग्नीचे सांगण्यावरून तें समुद्रांत टाकून, मृत्युलोकाशीं संबंध दर्शविणारे हे शेवटचे पाश अर्जुनानें तोडून टाकिले ! नंतर तेथून ते दक्षिण नैर्ऋत्य, पश्चिम या दिशांनी प्रवास करीत पाण्यांत बुडालेली द्वारका पाहून हिंमालयाकडे वळले. मोठ्या कष्टानें त्या पर्वतावर चढल्यानंतर दूर अंतरावर समोर मेरुपर्वताचें शिखर व मध्यंतरीं वाळूचें भयाण मैदान त्यांचे दृष्टीस पडलें. या मैदानावरून ते थोडेंसे चालून गेल्यावर द्रौपदी मागेचमागे मरून पडली ! द्रौपदी सारखी साध्वी स्त्री अशी एकाएकी मरून कां पडली ? असें भीमानें विचारलें असतां-द्रौपदी आपल्या प्रेमांत पंक्तिप्रपंच करीत असे, अर्जुनाविषयीं तिचे मनांत इतरांपेक्षां अधिक प्रेम होतें; त्याचें हें फळ होय ' असें धर्मानें उत्तर दिलें. आणखी थोड्या अंतरावर सहदेव मरून पडला. पूर्वीप्रमाणेंच भीमानें विचारिलें असतां ' आत्मनः सदृशं प्राज्ञं नैषोऽमन्यत कंचन ' ' माझ्यासारखा शाहणा दुसरा कोणीच नाहीं असें त्यास वाटत होतें. या दोषाचें त्यास हें प्रायश्चित्त मिळालें आहे ' असें धर्मानें उत्तर दिलें. थोडेंसें पुढें गेल्यावर नकुळहि मरून पडला ! 'रूपेण मत्समो नास्ति कश्चिदित्यस्य दर्शनं' माझ्यासारखा



धर्माची परीक्षा.

[ पृ. २२८

सुंदर पुरुष दुसरा कोणीच नाहीं, या त्याच्या गर्वाचा हा परिणाम आहे, असें मागें न पहातां सांगून धर्म पुढें चालूं लागला. कांहीं वेळानें अर्जुनहि मृतप्राय होऊन मैदानावर पडला. ' माझ्याइतका शूर कोणीहि नाहीं असें वाटून, सर्व कौरवांचा एका दिवसांत संहार करीन ' अशी प्रतिज्ञा करून त्याप्रमाणें अर्जुनानें केलें नाहीं; त्याचें हें त्यास फळ मिळालें, असें भीमसेनास सांगून धर्म मुकाट्यानें पुढें चालूं लागला. कांहीं वेळानें भीमसेनहि त्या वालुकामय मैदानावर पडला ! **अतिभुक्तं च भवता प्राणेन च विकत्थसे। अनवेक्ष्य परं पार्थ तेनासि पतितः क्षितौ ॥** ' तुला आपल्या बळाचा फार गर्व होता. खादाडपणा व दुसऱ्याविषयीं पूर्ण बेफिकिरी हे दोष तुझ्या अंगीं होते; त्याबद्दल हें तुला शासन झालें आहे ' असें धर्मानें सांगितलें ! याप्रमाणें चारी भाऊ व पत्नी मरून पडल्यावर धर्माबरोबर फक्त कुत्रा मात्र राहिला.

इतक्यांत सर्व पृथ्वी व आकाश आपल्या गंभीर ध्वनीनें दणाणून टाकीत इंद्राचा रथ तेथें आला. रथावर बसून धर्मानें स्वर्गांत यावें, असें इंद्र म्हणाला. तेव्हां आपले भाऊ व बायको अशीं येथें मरून पडलीं असतां त्यास सोडून स्वर्गांत येण्याची आपली मुळींच इच्छा नाहीं असें धर्मानें सांगितलें.

इंद्रः—तुझ्या आधींच तुझे भाऊ व द्रौपदी हीं गेलीं आहेत; तेथें त्यांची तुझी गांठ पडेल. लवकर बसून तिकडे चल.

धर्मः—हा कुत्रा माझा फार आवडता असून मजवर त्याचीहि फार भक्ति आहे. यासाठीं त्यालाहि बरोबर आणण्याची परवानगी असावी.

इंद्रः—अरे, उत्तम यश व कीर्ति, स्वर्गाचें वैभव, अमरत्व व सर्व प्रकारचें स्वर्गसुख हीं तुला मिळालीं आहेत. आतां तूं हें कुत्रें सोडून दे; त्यांत कांहीं दोष नाहीं.

धर्मः—देवराजा, असें करणें **हें आर्यांचें ब्रीद नव्हे. आपल्या भक्ताचा त्याग करून मिळणारें कोणतेंहि सुख मला नको.**

इंद्रः—कुत्री बरोबर घेऊन येणाऱ्या मूढांना कांहीं स्वर्गांत जागा मिळावयाची नाहीं.

धर्मः—**भक्तत्यागामध्यें ब्रह्महत्येइतकें पातक आहे.** यासाठीं कांहीं झालें तरी आपल्या सुखासाठीं, प्राण गेला तरी, याचा कदापिहि मी त्याग करणार नाहीं.

इंद्रः—आपले भाऊ व पत्नी द्रौपदी यांचा तूं त्याग केलास; आणि आतां स्वतःच्या पुण्यानें संपादन केलेला स्वर्ग तूं या यःकश्चित कुत्र्याकरितां टाकीत आहेस; या तुझ्या मूर्खपणास काय म्हणावें ?

धर्मः—माझे भाऊ व बायको हीं मला नकोशीं झालीं नव्हती. तीं जोंपर्यंत जिवंत होतीं तोंपर्यंत कांहीं मी त्यांचा त्याग केला नाहीं. तें मरून पडल्यावर त्यांस सजीव करण्याचें माझें अंगीं सामर्थ्य नसल्यामुळें मी त्यांस सोडलें; याचा मजकडे काय दोष ? ह्या कुत्र्याची आजपर्यंत मजवर भक्ति आहे व तें अजून जिवंतहि आहे. त्याचा त्याग केला असतां स्त्रीवध, मित्रद्रोह व ब्राह्मणधनहरण यांचें पातक मला लागणार असल्यामुळें स्वर्गसुखास मी आंचवलों तरी या कुत्र्याचा मी त्याग करण्यास तयार नाहीं ! ' धर्मानें कुरुक्षेत्राचे रणभूमीवर एकदां खोटें भाषण केलें होतें, त्यावेळीं त्याचें त्यास जें फळ मिळालें व जो बोध त्यास झाला तो त्यास यावेळीं उपयोगी पडला. तो कुत्रा नाहींसा होऊन त्याचे जागीं साक्षात् यमधर्म दिव्य देहानें त्याजसमोर उभा राहिला ! मीं तुझी सत्यप्रीति व कर्तव्यनिष्ठा कसास लावण्यासाठीं असें केलें; व त्या कसास राजश्रेष्ठ धर्मराजा पूर्णपणें उतरला आहेस, असें तो म्हणाला. नंतर इंद्र यमधर्म व युधिष्ठिर रथांत बसून स्वर्गांत गेले. ( महाप्रस्थानपर्व अ० १–३ )

' माझे भाऊ व बायको जेथें असतील तेथेंच मला न्या. ' असें धर्म म्हणूं लागला. तेव्हां, ' स्वर्गांत आल्यानंतर मागल्या मृत्युलोकांतील प्रेमपाशांमध्यें वळेंच अडकून रहाणें योग्य नव्हे; ते तोडूनच टाकिले पाहिजेत ' असें इंद्रानें सांगितलें. स्वर्गांत गेल्यावर इंद्राच्या सभेंत आपले भाऊ कोठें आहेत म्हणून धर्म पाहूं लागला; परंतु ते त्यास कोठेंच दिसेनांत. इतक्यांत तेथें एका आसनावर बसलेला व तेजानें देदीप्यमान् असलेला दुर्योधन त्याचे दृष्टीस पडला ! तात्काळ आपलें तोंड बाजूला फिरवून तो रागानें म्हणाला:—' लोभी, दुष्ट व मूर्ख दुर्योधनाबरोबर रहाण्यासाठीं मी येथें आलेलों नाहीं. ज्या दुर्योधनानें आमचा लहानपणापासून छळ केला, वडील माणसांदेखत सभेमध्यें आमच्या पत्नीची विटंबना केली; वनामध्यें आम्हांस हांकून दिलें; व सर्व पृथ्वींतील अमचे आप्तइष्ट, ज्ञातिबांधव व क्षत्रियकुलें यांचा युद्धामध्यें संहार केला; त्या दुर्योधनाबरोबर येथें राहण्याची माझी बिलकूल इच्छा नाहीं. जेथें माझे भाऊ असतील तेथें मला घेऊन चला. ' त्यावर नारद म्हणाले:—'अरे हा स्वर्ग आहे; येथें मृत्युलोकांतील द्वेष, वैर, मत्सर हीं मनांत ठेवणें बरोबर नाहीं ' तथापि धर्माच्या

मनाचें समाधान झालें नाहीं. " मूढ व पापी दुर्योधनास स्वर्ग मिळाला आहे, पण माझे पराक्रमी, शूर व सत्यप्रतिज्ञ भ्राते, उदार व शूर कर्ण, साध्वी द्रौपदी आणि विराट्, द्रुपद, धृष्टद्युम्न वगैरे वीर कोठें आहेत? ते जेथें असतील तेथें मला न्या.

**किं मे भ्रातृविहीनस्य स्वर्गेण सुरसत्तमाः ।**
**यत्र ते मम स स्वर्गो नायं स्वर्गो मतो मम ॥**

भाऊ नसतांना मला हा स्वर्ग काय करावयाचा आहे ! हा स्वर्ग मला नको; **ते जेथें असतील तोच माझा स्वर्ग होय.** " यानंतर इंद्रानें एक देवदूत बरोबर देऊन पांडव जिकडे आहेत तिकडे धर्मास घेऊन जाण्यास सांगितलें. पुढें देवदूत व मागें धर्म याप्रमाणें जातां जातां कांहीं वेळानें अतिशय खडकाळ वाट लागली. चोहोंकडे गर्द अंधार, प्रेतांच्या मांसरक्तांचा चिखल; हाडांच्या राशि व दुर्गंधी जिकडे तिकडे पसरली होती! अत्यंत रसरशीत होऊन आधण येऊन कढणाऱ्या पाण्याची नदी; तरवारीच्या पानांचें वन, तापलेल्या वाळूचें मैदान, लोखंडी शिला, तापलेल्या कढया, हींहि त्यास पुढें लागलीं. तथापि तें सर्व सहन करून आपल्या भावास पहाण्याच्या उत्कंठेनें तो तसाच पुढें चालला. माझे भाऊ येथेंच आहेत काय ? कां असल्याच मार्गानें आणखी पुढें जावयाचें आहे ? असें त्यानें विचारलें. त्यावर देवदूत म्हणालाः—'येथपर्यंत तुला न्यावयाची मला आज्ञा आहे; तूं दमला असशील तर परत चल.' तेथील दुर्गंधि, अंधार व प्रेतांचा खच हा अंगावर शहारे आणणारा प्रकार पाहून धर्म परत फिरूं लागला' इतक्यांत 'धर्मराजा, क्षणभर येथेंच थांब. तूं येथें असल्यामुळें आमच्या यातना थोड्या कमी झाल्या आहेत व थोडेसें अम्हांस सुख होत आहे' असा चोहोंकडे गोंगाट झाला ! तें ऐकून दयाळू धर्म तसाच तेथें उभा राहिला. तुम्ही कोण आहा, येथें तुम्हांस कां टाकलें आहे, असें त्यानें मोठ्या कळवळ्यानें त्यांस विचारलें. तेव्हां **'कर्णोऽहं भीमसेनोऽहं अर्जुनोऽहमिति प्रभो । नकुलः सहदेवोऽहं धृष्टद्युम्नोऽहमित्युत ! द्रौपदी द्रौपदेयाश्च'** याप्रमाणें सर्वांनीं एकच भयानक आरडाओरड करून सांगितलें ! तें ऐकून त्यास उद्वेग, दुःख, द्वेष व संताप आला. तो म्हणालाः-- त्या धृतराष्ट्र पुत्र दुर्योधनानें असें कोणतें महत्पुण्य केलें कीं, त्याला स्वर्गांत स्थान मिळावें ? आणि या शूर व खरे क्षत्रिय असलेल्या माझ्या भावांना, बायकोला आणि पुत्रांना या भयानक व घोर स्थलीं यमयातना भोगावयास लागाव्या असें त्यांनीं कोणतें पातक केलें आहे ? ' अति संतापानें तो

त्या देवदूतास म्हणालाः--' माझ्या भावांच्या या दुःसह यातना जर माझ्या येथें रहाण्यानें थोड्याशा कमी होत आहेत, तर मी येथेंच राहाणार. मी साफ, तिकडे परत येत नाहीं. ज्यांचा दूत आहेस त्यांना तूं जाऊन असें सांग.' धर्माचें हें भाषण ऐकून दूत निघून गेला. इतक्यांत जिकडे तिकडे एकदम उज्ज्वल प्रकाश पडला आणि इंद्रासह सर्व देव, सिद्ध, यक्ष, रुद्र, मरुद्गण वगैरे तेथें आले! नंतर इंद्र म्हणालाः----' धर्मराजा, द्रोणाचार्यांस मारतांना जें एकदां तूं असत्य भाषण केलेंस त्याबद्दल तुला व तुझ्या भावांना दुःख देण्यासाठीं ह्या मायानिर्मित नरकांतील यातना तुम्हांस पहाव्या लागल्या. युद्धांत मेलेले सर्व योद्धे व तुझे भाऊ स्वर्गसुखाला पात्र झाले आहेत. आतां तुम्हीं सर्व येथें आनंदानें रहा. तूं आपल्या महत्पुण्यानें हा लोक प्राप्त करून घेतला आहेस.' ह्या तिसऱ्या परिक्षेंतहि धर्मराजा कसास उतरलेला पाहून अर्थात् यमधर्मास फारच आनंद झाला. नंतर इंद्राचें सांगण्यावरून धर्मानें तेथील आकाश-गंगेंत स्नान केलें. तों त्याचें मृत्युलोकींचें शरीर नाहींसें होऊन त्यास दिव्य देह प्राप्त झाला! नंतर सर्वजण स्वर्गांतील इंद्रसभेंत आले. तों तेथें धर्मास आपले सर्व बांधव वगैरेंचें दर्शन झालें. ब्रह्म-तेजानें युक्त असलेले श्रीकृष्ण, त्यांचें जवळच अर्जुन, द्वादशादित्याजवळ तेजःपुंज कर्ण, मरुद्गणांसह भीमसेन. अश्विनीकुमाराजवळ नकुल-सहदेव, कमलांची उत्तम माला धारण करणाऱ्या स्वर्गश्रीचें रूपानें द्रौपदी, गंधर्वांमध्यें द्रौपदीचे पांच पुत्र सोमाजवळ अभिमन्यु, वसूंमध्यें भीष्म, बृहस्पतीजवळ द्रोण, कुंती-माद्रीसह पांडु याप्रमाणें बसलेल्या सर्वांस धर्मानें पाहिले. अशा रीतीनें कौरव पांडवांची मृत्युलोकांतील एकंदर भांडणें, दुःखें व क्लेश या सर्वांचा सख्य, शांति, आनंद व अक्षय स्वर्गसुख यांत शेवट झाला. ( स्वर्गारोहणपर्व अ० १–५ )

